KAVYASANGRAHA. 61.

# THE YATHÂRTHADÎPIKA,

(A COMMENTARY ON THE BHAGAVADGÎTA)

OF

## VÂMAN PANDIT.

### PART IV.

CHAPTERS XV-XVIII.

*EDITED WITH NOTES*

BY

BÂLKṚISHṆA ANANT BHIDE, B. A.

PUBLISHED

BY

TUKÂRÂM JÂVAJÎ,

PROPRIETOR, "NIRṆAYA-SÂGAR" PRESS,

Bombay.

PRINTED BY B. R. GHANEKAR AT THE "NIRṆAYA-SÂGAR" PRESS, FOR THE PUBLISHER.

1909.

*Price 2 Rupees.*

काव्यसंग्रह.

वामनपंडितकृत

# यथार्थदीपिका.

जय मोहमहिषमर्दिनि ! जय भगवति ! गेयगुरुगुणे ! **गीते** ! ।
जरि झाली नसतीस प्रकटा तू, यतिहि बहु भवा भीते. ॥ १ ॥
तव सचिव द्वैपायनशंकरमधुसूदनादि योगी ते, ।
ज्ञानेश प्रतिनिधि, हें वर्णन तुझिया मनास यो, **गीते** ! ॥ २ ॥
युवराज तुझा **वामन**, वाम न मानू, तुवांचि मानावें, ।
गुरुलघु कविंनीं प्रभुतें नित्य यथामति विशक वानावें. ॥ ३ ॥
—मोरोपंत.

## भाग चवथा.

अध्याय १५–१८.

हा

**बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए.,**

यांनीं

टीपा देऊन तयार केला,

तो

निर्णयसागर छापखान्याचे मालक **तुकाराम जावजी** यांनीं प्रसिद्ध केला.

**मुंबईंत,**

बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं 'निर्णयसागर' छापखान्यांत
प्रकाशकांकरितां छापिला.

१९०९.

किंमत २ रुपये

## विषयानुक्रम.





# प्रस्तावना.

१. आज रोजीं वामनपंडितकृत यथार्थदीपिकेचा शेवटचा भाग प्रसिद्ध करून आम्हीं हातीं घेतलेलें काम ईश्वरकृपेनें तडीस नेत आहों. खुद्द वामनपंडितांचीं व त्यांच्या नांवावर मोडणारीं इतर वामनकवींचीं स्फुट प्रकरणें यापूर्वी काव्यसंग्रहमालेंत ग्रथित झालीं आहेत. आतां आमच्या संग्रहीं वामनकवींच्या नांवाचीं प्रकरणें मुळींच शिल्लक नाहींत.

२. यथार्थदीपिका हा एकंदर २२ हजारांवर ग्रंथ आहे, म्हणजे हा ग्रंथ ज्ञानेश्वरांच्या भावार्थदीपिकेच्या अडीच पटीहून जरासा मोठाच आहे. गीतेमध्यें नानातऱ्हेचे शेंकडों आध्यात्मिक व व्यावहारिक विषय आले.असल्यामुळें, तिजवरील या पंडितकृत विस्तृत टीकेंत पंडितांचीं मतें, मनोरचना, लेखनशैली, थोडेंबहुत जीवनवृत्त व तत्कालीन समाजस्थिति हीं समजण्याचा बराच संभव आहे, अशी अपेक्षा असणें साहजिक आहे.

३. पंडितांचें कुलवृत्त व इतिवृत्त जाणण्याच्या उद्देशानें हा अगाढव्य ग्रंथ चाळणाऱ्या जिज्ञासूची पूर्ण निराशा झाल्याशिवाय राहणार नाहीं, कारण आपलें कुल, कुलदैवत, मातापितरें, जन्मस्थान, अध्ययन, इत्यादिकांचा पंडितांनीं कोठेंही यत्किंचितसुद्धां थांगपत्ता लागूं दिला नाहीं. त्यांनीं आपला स्वतःचा उल्लेख अथपासून इतिपर्यंत 'वामन' याच साध्या एकेरी नांवानें केलेला आहे. ज्या अर्थी यथार्थदीपिकेसारख्या बिनमोल महत्त्वाच्या अचाट ग्रंथांतही पंडितांनीं आपल्या कुलवृत्ताचा वगैरे निर्देश केलेला नाहीं, त्या अर्थी या गोष्टीचा दांडोरा पिटणें पंडितांना मुळींच आवडत नव्हतें, असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय आहे, असें वाटत नाहीं. ग्रंथकर्त्यानें विषय-प्रतिपादनाला अवश्य असेल, तितक्याचपुरता स्वतःच्या व्यक्तिविषयक अनुभवाचा उल्लेख करावयाचा, यापलीकडे आपली कुळकथा सांगण्यांत कांहीं हंशील नाहीं, असाच जणूं काय पंडितांचा बाणा सर्वत्र आढळून येतो. प्रस्तुत ग्रंथांत त्यांनीं स्वतःविषयींच्या एका गोष्टीचा मात्र तीन ठिकाणीं उल्लेख केला आहे, ती गोष्ट म्हणजे[१] त्यांना ब्रह्मविद्यारहस्याची प्राप्ति कोणापासून व कशी झाली ही होय.

१ जी श्रीसच्चिदानंद गुरू ! । जें जें वदलास कल्पतरू ।
निर्गुण सुवर्ण, सगुण मेरू, । तो भेटलासी यतिरूपें. ॥ ७८ ॥
श्रीगुरुरूपें देवा । मज भेटलासी वासुदेवा ! ।
तें हें रहस्य देवाधिदेवा ! । बोलिलासी. ॥ ७९ ॥

तुझीं वचनें तुजप्रती । यालागीं बोलिलों श्रीपती ! ।
कीं श्रोते तुझ्याच मूर्ती । तूं विश्वरूप भगवंत. ॥ ८० ॥
अध्याय

२ जय जय देव गीताकार! । जय जय देव टीकाकार! ।
जय जय देव सर्वाकार! । वामनगुरो! वामनात्मन्! ॥ ७ ॥
अध्याय १६

३ सृष्टिस्थितिप्रलयादि कार्य । ज्याच्या संकल्पमात्रें, तो तूं विधीचा आर्य,
तोची तूं स्वयें माझा आचार्य, । ऐश्वर्य माझें अतर्क्य देवा! ॥ १५ ॥
नामें आणि रूपें । सच्चिदानंदस्वरूपें ।
मजनिमित्त रूप अरूपें । प्रकट केलें मलयपर्वतीं. ॥ १६ ॥
दों मुहूर्तांची संगती, । परी अनाद्यनंत अनन्यगती ।
आलासी, आणि बहुता जनांनें सद्गती । यामुळें देसी तूं विश्वतोमुख. १७
अध्याय १८.

वरील तीन अवतरणांवरून इतकें स्पष्ट आहे कीं, मलयपर्वतावर पंडितांना ईश्वरी साक्षात्कार होऊन, त्यांस अद्वैतत्व व सगुणभक्तिरहस्य यांचा बोध झाला व त्यांनीं त्या ज्ञानप्राप्तीचा उपयोग यथार्थदीपिकादि ग्रंथांच्या द्वारें आपल्या बांधवांना करून दिला आहे. पंडितांपुढें भगवंत यतिरूपानें प्रकट झाले. या यतीचें रूपाप्रमाणें नामही सच्चिदानंदच होतें. या यतीश्वरांनीं अवघ्या दोन मुहूर्तांच्या अवधींतच ब्रह्मविद्यारहस्याचा उलगडा केला व या ज्ञानप्रकाशानेंच गीतेवर यथार्थ व्याख्या करण्याचें पंडितांना सामर्थ्य आलें. समग्र यथार्थदीपिकेंत याव्यतिरिक्त अन्य गुरूचा किंवा गुरुपरंपरेचा पंडितांनीं कोठेंही निर्देश केला नाहीं हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. हीच गोष्ट पंडितांनीं आपल्या निरनिराळया चार पांच ग्रंथांत नमूद केली आहे, व तींत असंबद्धता कोठेंच आढळत नाहीं. तेव्हां या प्रकाराशीं विसंवादी असणाऱ्या सर्व दंतकथा एकतर बनावटच मानिल्या पाहिजेत, किंवा त्या यथार्थ-दीपिकाकाराविषयीं नसून, त्यांचा संबंध दुसऱ्या कोणत्या तरी वामनकवीशीं मानला पाहिजे. यावांचून सुटका नाहीं.

४. यथार्थदीपिका रचण्याचें काम पंडितांनीं आपल्या शिरावर ईश्वरी प्रेरणेनें व साधुसंतांच्या सूचनेनें घेतलें. ते ग्रंथारंभींच परमेश्वरास उद्देशून म्हणतात, कीं, "आणि तुझ्या कृपेचे विभागी । शिष्य, संत, भक्त, योगी, । ते म्हणती कीं, जगदुपयोगी । ऐसी टीका करावी. ॥" ( १।१३२ ). यथार्थदीपिका रचण्याचा हेतु पंडितांनीं पहिल्या अध्यायांत स्पष्ट सांगितला आहे. निरनिराळे मतवादी

आपापल्या मतांस अनुकूळ असा गीतेचा अर्थ करीत असत; त्यामुळें अर्थाचा अनर्थ होऊन सर्वच घुथडा झाला होता, तो मोडून गीतेचा खरा अर्थ प्रकट करण्या-करितां या दीपिकेचा अवतार झाला. पंडितांचा निर्गुणवाद्यांवर फारच कटाक्ष होता. एकदां अद्वैत कळून निर्गुणसाक्षात्कार झाल्यावर सगुणभक्तीचें प्रयोजनच नाहीं, हें निर्गुणवाद्यांचें प्रमेय, व ते स्वमतानुसार गीतावचनांचा अर्थ लावीत. यावर पंडित इतकेंच म्हणतात कीं ज्याला रुचेल व साधेल त्यानें केवळ निर्गुणचिंतनानें मोक्ष गांठावा, परंतु गीतेंत जेथें तेथें सगुणभक्तीच उपदेशिली आहे. तेव्हां निर्गुणवाद्यांनीं भगवद्वचनांचा विपर्यास करून आपल्या मतांचें मंडण करण्याच्या भरीस पडूं नये. निर्गुणचिंतनापेक्षां ज्ञानयुक्त सगुणभक्ति हाच मोक्षसाधनाचा सोपा व अधिक श्रेयस्कर मार्ग आहे. निर्गुणज्ञानाचें सगुणभक्तीनें दृढीकरण करावें असें गीता म्हणते. चार्वाकाचें नास्तिकमत खोडून टाकण्यासाठीं गौतमानें तर्कशास्त्र काढिलें. पण निर्गुणवाद्यांनीं त्याच तर्कशास्त्राचा आश्रय करून ज्ञानयुक्त सगुणभक्तीवर प्रहार करणें अत्यंत अश्लाघ्य आहे. वस्तुतः गौतमाचे सिद्धांत व अद्वैत यांत फरक नाहीं, आणि अद्वैताला सगुणभक्तीनें बाध येत नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्यास उलट दृढता येते (अ० १ ओवी ८७ ते १११ पहा). ज्ञानयुक्त सगुणभक्तीचा द्वेष करणाऱ्या व भगवद्वचनें विरुद्ध स्वतःला अनुकूळ असा अर्थ त्यांतून गाळूं पाहणाऱ्या निर्गुणाभिमान्यांवर पंडितांनीं जेथें तेथें अशा तऱ्हेचे कोरडे ओढले आहेत. ( यासंबंधें ११।१०२९-५३; ११।११३८-४४; १२।२६७-७२; १२।१८००-१८४१; १८।२८७०-२९९२; १८।३०४३-३०४५; ४।४००-४०६; ३।५०१-५०६ इत्यादि स्थळें पहावीं ). भगवद्गीतेंत ज्ञानयुक्त भक्तीचें गौरव अथपासून इतीपर्यंत आहे, असें पंडित वारंवार कंठरवानें सांगत आहेत. ( १।७६, १२।१७८४-१७८६, १५३; १५।१११; १८।१८७५; हीं स्थळें पहावीं. ) अंधभक्ति किंवा अद्वैत ज्ञान-रहित भक्ति मात्र मोक्ष देणारी नव्हे. द्वैतभाव ठेऊन जी भक्ति करण्यांत येते, ती पशुतुल्य होय—यासंबंधें १।७०; ४।२२९; १२।१८९,१९०,१९५. हीं स्थळें पहावीं. ) ज्ञानयुक्त भक्तीनें पुण्य संग्रहीं पडून, त्याचें फल जें सुख तें प्राप्त होईल. परंतु पुण्य सरतांच पुन्हां 'येरे माझ्या मागल्या' असा प्रकार सुरू होणार. ज्ञानहीन भक्तीनें अढळ मोक्षपद मिळणार नाहीं, तत्प्राप्तीस्तव अद्वैतज्ञान व सगुणभक्ति यांचा मिलाफ झाला पाहिजे. यावरून पंडितांचा भागवतधर्म व हल्लींच्या पंढरीच्या वार-कऱ्यांचा धांगडधिंगी भागवतधर्म यांतील भेद लक्षांत येईल. निव्वळ भक्ति ही ब्रह्मी-भूत होण्याचा मार्ग नव्हे. ज्ञानावांचून भक्ति पंगू होय, अशी भगवद्वाणी आहे. हठयोगादिकांनींही मुक्तिलाभ होऊं शकत नाहीं, असें पंडितांचें मत आहे. ज्ञाना-वांचून व भक्तीवांचून हठयोग फुकट आहे. ( ४।९२९-९३५,९४१; पहा. )

तेव्हां या निरनिराळ्या॰ वादींच्या अभिमानरोगावर भगद्गुक्तीच्या ' यथार्थमात्रेचे वळसे देऊन त्यांचा भ्रम उतरण्यासाठींच पंडितांनीं हें दीपिकारसायन तयार केलें. शिवाय कित्येक ज्ञाननिष्ठ भागवतांनाही गीतेवर टीका करितांना कित्येक महत्त्वाच्या शब्दांचा अर्थ न कळून, त्यांनीं त्यांविषयीं मुग्धता स्वीकारिली आहे. किंवा कांहीं तरी लटपटपंची करून वेळ मारून नेली आहे, हीही गोष्ट पंडितांच्या ध्यानांत आली होती.

५. यथार्थदीपिकेची भाषा सर्वत्र अगदीं प्रयोगशुद्ध, सरळ, ज़ोरदार व कसलेली आहे. समयानुरूप ती रसाळ, कोमळ, सणसणीत, रंगेल, भाविक व हृदयंगम अशी दिसून येते. हा ग्रंथ तयार झाल्याला आजमितीस जरी अडीचशेंहून अधिक वर्षें झालीं आहेत, तरी भाषारचनेंत कोठेंही जुनाटपणा, अपरिचितपणा किंवा शिथिलत्व आढळत नाहीं, हें एक आश्चर्यच म्हणावयाचें. विषयप्रतिपादनाच्या आवेशांत सरस्वतीचा प्रवाह अस्खलित घोंगावत चाललेला आहे, त्याला जबरीनें कृत्रिम वळण दिलेलें कोठेंही भासत नाहीं. वाक्यरचना इतकी सरळ व बिनघोटाळ्याची आहे, कीं, ती बहुतेक गद्या-सारखीच भासते. किंबहुना गद्यग्रंथ लिहिण्याचा जर पंडितांच्या वेळीं प्रघात असता, तर हजार हिश्यांनीं त्यांनीं आपली दीपिका गद्यरूपानेंच प्रकट केली असती, असा आमचा होरा धांवतो. टीकेला ओवी छंद स्वीकारल्यामुळें, अक्षरवृत्तांच्या शृंखलेंतून सुटलेली पंडितांची वाणी स्वच्छंद रीतीनें विहार करितांना पाहून ठिकठिकाणीं वाचकांचें चित्त रंगून गेल्यावांचून रहात नाहीं. पंडितांच्या ओवीला अक्षरमात्रांचा फारसा ताळमेळ आढळत नाहीं. मनांतला अर्थ सरळपणें व्यक्त करावयाचा या तत्वावरच एकंदर सर्व रचना आहे. ओवींत यमकांचीच काय ती अटक आहे, परंतु त्यां-करितां कवीनें कोठेंही आटापेट केलेला दिसत नाहीं. सूर्यबिंब क्षितिजावर आरूढ होतांक्षणींच जशीं पद्मवनें आपोआप विकसित होतात, तद्वतच पंडितांच्या मनांत विचार प्रादुर्भूत होतांक्षणींच त्यांची वाणी यमकांनीं प्रफुल्लित झालेली भासते. जागोजाग 'हातच्या कंकणास आरसा', 'काडीचोर तो पाडी चोर', 'पोट दुखणें,' 'आपलेच दांत, आपलेच ओंठ,' 'अंगांत वारें भरणें,' 'दांत चावणें,' 'पिशाचाचे हातीं कोलीत,' 'वारा मुठींत धरणें,' 'लेंकराचे खेळ,' 'नख लागे ज्याला कां कुन्हाडी हाणणें त्याला,' 'चोराचे मनीं चांदणें,' 'कांडा कांडणें,' खाऊ मागणें,' 'ज्या मापानें घ्यावें, त्या मापानें फेडावें,' 'मनाचा घोडा,' अशासारख्या म्हणी व लौकिक शब्दसमूह यांचा प्रसंगानुसार उपयोग करून, पंडितांनीं आपल्या वाणीला साधें पण मोहक स्वरूप आणिलें आहे. सरस दृष्टांत, उपमा व रूपकें यांच्या साह्यानें गहन विषयही सर्वांस सुगम केले आहेत. आतां सामान्यतः बऱ्याच

ठिकाणीं गीतेंतील श्लोकाचा खरा अर्थ न समजल्यामुळें दपटशाही करून इतर टीकाकारांनीं कशी तरी वेळ मारून नेली आहे, किंवा भगवद्वाक्यांचा अर्थविपर्यासही झाला आहे, असें पंडितांना वाटलें, त्यामुळें त्या ठिकाणीं अर्थात् एक एक शब्द घेऊन त्यावर मल्लिनाथी करणें त्यांना भागच पडलें आहे. अशा स्थळीं त्यांची टीका पाल्हाळिक व रूक्ष वाटते आणि सामान्य काव्यवाचकांना ती वाचणें म्हणजे एक प्रकारची शिक्षाच होईल, हें खरें आहे. परंतु इतर ठिकाणीं अद्वैताचें प्रतिपादन करितांना, सगुणभक्तीची महती गातांना, भगवंताला आळवीत असतांना, किंवा अशा तऱ्हेच्या मनाला उमळऊन टाकणाऱ्या इतर प्रसंगांचें वर्णन करीत असतांना, पंडितांची वाणी ईश्वरी प्रसादानें विकसलेली व काव्यप्रतिभेनें अगदीं रसरसलेली आढळते.

६. पंडितांची चतुरस्रता, जबर निरीक्षणशक्ति, व्यवहारज्ञान, विशाल अनुभव, हींही या ग्रंथांत बिंबलीं आहेत. वसंताच्या अमदानींत उद्यानभूमीमध्यें झाडांवर शोभणाऱ्या फुलांचे घोंस व त्यांखालीं पसरलेला फुलांचा पेर ज्याप्रमाणें अत्यंत मोहक वाटतो, तद्वत् यथार्थदीपिकेंत इतस्ततः अशा प्रकारचे उत्कृष्ट रचनेचे शेंकडों नमुने मनाला अगदीं दंग करून टाकितात. तरी पण हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं दीपिका रचण्यांत पंडितांचा हेतु काव्य निष्पन्न करण्याचा नव्हता, तर भगवद्गीतेचा शब्दशः खरा खरा अर्थ प्रकट करून, लोकांना ज्ञानयुक्त भक्तीचा मार्ग निभ्रांत रीतीनें दाखवावयाचा होता. तेव्हां हा आद्य हेतु असल्यामुळें आपल्या काव्यस्फूर्तीला पूर्ण वाव न देतां, अनेक वेळां त्यांना शब्दार्थावर मल्लिनाथी करावी लागली आहे, यास त्यांचा नाइलाज होता. गीतेवर टीका करावयाची म्हणजे कांहीं नुसतें कानाला व मनाला गोड लागेल असें काव्य निर्माण करावयाचें नाहीं. काव्यदृष्टीनें एखादी टीका कितीही गोड असली, तरी जर ती भगवदुक्तीचा यथार्थ आशय प्रकट करीत नसेल, तर ती पंडित टाकाऊच ठरवितात. ऐकायला अत्यंत गोड व रसाळ, पण भगवदुक्तींच्या संदर्भाशीं विसंगत असा अर्थ करणाऱ्या किंवा अनुचित दृष्टांतांनीं त्यांची फोड करणाऱ्या टीकांविषयीं पंडित एके ठिकाणीं म्हणतात—

भगवंत म्हणा वेडा, । अथवा त्या टीकेची श्रद्धा सोडा, ।
गीता सोडोनी व्यर्थ पवाडा । गोष्टींचा वाचणें, तरी वाचा गोड गोष्ट. ६५४
गीता जाते पश्चिमेकडे, । टीका चढे पूर्वदिशापर्वताचे कडे, ।
दोहींस हात लाविती बापुडे । अर्थ सांपडे केंवी तयां? ॥ ६२५ ॥

—अध्याय १

भगवदुक्तीचा खरा खरा अर्थ लोकांना अगदीं स्पष्ट करून सांगण्याचेंच त्यांनी

कंकण बांधल्यामुळें, त्यांनीं कल्पनेच्या उड्यांना फारसा वाव दिलेला नाहीं. प्रत्येक दृष्टान्त, रूपक, उपमा, हीं केवळ अर्थ व्यक्त करण्याच्याच उद्देशानें योजिलीं असल्यामुळें, पंडितांनीं त्यांची अगदीं फोड करून टाकिली आहे. कोणतीही गोष्ट जराशी गुलदस्तांत ठेऊन वाचकांच्या कल्पनाशक्तीस वावरण्यास बिंदुमात्रही जागा ठेवलेली नाहीं. नेहमीं अनुभवास येणाऱ्या गोष्टी व मूर्तपदार्थ यांविषयींच सर्व दृष्टान्त वगैरे आहेत. केवळ कल्पनागम्य, अमूर्त, किंवा अपरिचित उपमादृष्टान्तादिकांनीं वाचकांच्या मनोवृत्ति व जिज्ञासा या चाळविल्या जातात व ग्रंथांत एक प्रकारची विलक्षण जादू उत्पन्न होते. केवळ अभ्यासानेंच मन आनंदांत पोहूं लागतें. पण जादुगाराच्या खेळांत जशी प्रेक्षकांची, तशीच अशा तऱ्हेच्या मनमोहन ग्रंथांत वाचकांची कल्पना स्वैर भरारूं लागते व यथार्थज्ञानाला वारंवार एक प्रकारची संदिग्धता व भ्रामकता येऊं लागते. काव्याचें जीवन व मर्म हेंच आहे. परंतु पंडितांना काव्य रचावयाचें नव्हतें, किंवा केवळ कल्पनागम्य गोष्टींनीं वाचकांना भ्रमवून त्यांचें चित्तरंजन करावयाचें नव्हतें. पंडितांनीं मनोरंजकता किंवा कवित्व यांवर मुख्य कटाक्ष न ठेवितां, आपलें पांडित्य, शास्त्रप्रावीण्य, व्याकरणज्ञान, यांच्यावरच विशेषतः भार टाकून मोठ्या भक्तिभावानें गीतेचा शब्दशः अर्थ करून ज्ञानयुक्त सगुणभक्तीच्या पक्षाचें समर्थन आपल्या परीनें केलें आहे. हाच पंडित व ज्ञानेश्वरी यांतील मुख्य भेद आहे. भावार्थदीपिका काव्यमय आहे तर यथार्थदीपिका पांडित्यमय आहे. एकीचा विहार जर विरळ व उच्च वातावरणांत, तर दुसरीचा सखल व घन वातावरणांत. एक पदार्थास अस्पष्ट व मोहक रंग देणारी चंद्रिका, तर दुसरी प्रत्येक पदार्थ स्पष्ट व वास्तवरूपानें प्रकट करणारी रविप्रभा. पहिली मनाला चकित करिते, व दुसरी त्यास शहाणें करिते: पहिलीनें मनाला चमत्कार वाटतो, तर दुसरीनें गीतावाक्यार्थासंबंधें मनाला समाधान प्राप्त होतें.

७. पंडित हे एकंदरींत फार धोरणी, सारासारविचारी, कल्पक, निस्पृह, सत्याभिमानी, व वाणीचे खंबीर असे होते. सत्याचें प्रतिपादन करितांना त्यांनी कोणाचीही भीडभाड धरलेली दिसत नाहीं. आपले ग्रंथ कोणी वाचोत वा न वाचोत, दुसऱ्याच्या आराधनेसाठीं, लौकिकासाठीं किंवा लोकप्रियतेसाठीं सत्यास धाब्यावर बसवून दंभ किंवा मुग्धता स्वीकारावयाची नाहीं हा त्यांचा दृढ संकल्प होता. सत्यनिष्ठेनें उचंबळून हा आपला बाणा पंडितांनीं अनेक ठिकाणीं स्पष्टपणें निर्दिष्ट केलेला आहे. गीतेमध्यें केवळ एकट्या भगवंताची—अनन्य अव्यभिचारिणी—भक्ति उपदेशिलेली आहे. श्रीकृष्ण म्हणजे गीताकार हाच या भगवंताचा, परब्रह्माचा, परंधामाचा सर्वश्रेष्ठ

ईश्वरोपाधियुक्त अवतार. ज्याला ज्याला म्हणून गीता पूर्णपणें समजली व मान्य झाली, त्याच्या त्याच्या अंतःकरणांत अद्वैत व श्रीकृष्णाविषयीं अव्यभिचारिणी सगुणभक्ति बाणलीच पाहिजे. सर्व जीवात्मे-हें सर्व विश्व-जरी एकाच परमात्म्याचे-एकाच चैतन्याचे-अंश आहेत, तरी त्यांत उपाधियोगानें उच्चनीच भाव उत्पन्न झालेला आहे. ज्यांना अद्वैतज्ञान प्राप्त झालें नाहीं, ज्यांना गीतेचा बोध झाला नाहीं, ज्यांना श्रीकृष्णविभूतीचें सर्वश्रेष्ठत्व मान्य नाहीं, किंवा ज्यांना अव्यभिचारिणी सगुणभक्तीचें तत्त्व समजलें नाहीं, त्यांनीं श्रीकृष्णाव्यतिरिक्त अनेक देवतांचें भजनपूजन केलें तर तें कांहीं तरी क्षम्य आहे; परंतु गीतार्थ ज्यांच्या चित्तांत पूर्ण बाणला आहे, जे प्राकृत जनांसाठीं गीतेवर टीका करण्याची महत्वाकांक्षा धरून आपल्या वाणीला चाळवितात, त्यांनीं 'सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज । अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि भारत ॥' असें असंदिग्ध वचन देणाऱ्या परमात्म्या श्रीकृष्णाला सोडून, मंगलाचरणीं इतर देवांच्या भजनीं लागणें, आणि पुन्हा अव्यभिचारी भक्तीचे गोडवे गाणें, यासारखें दुसरें अश्लाघ्य खूळच नाहीं, असें पंडित म्हणतात. गीतेवरील टीकाकाराला मंगलाचरण करणें असेल तर श्रीकृष्णाचेंच केलें पाहिजे, नाहीं तर त्याचा भगवद्गीतेंतील वचनावर अनन्य विश्वास नाहीं, असें सरळ सिद्ध होतें. गीताभक्ताला जर ग्रंथार्पण करणें असेल तर तें श्रीकृष्णासच केलें पाहिजे, कारण त्याहून अधिक पराक्रमी, अधिक ईश्वरोपाधियुक्त, अधिक तेजस्वी, व अधिक मंगल, असें कोणतेंही सगुण दैवत असणें शक्य नाहीं, असें गीता स्पष्ट सांगते. गीताटीकाकारांनीं कृष्णाशिवायइतर क्षुद्रदेवतांच्या भजनीं लीन होणें म्हणजे आपल्या अज्ञानाची किंवा दंभाची टिमकीच वाजविणें आहे, भगवंताच्या उक्तींस हरताळ लावणें आहे, व श्रेष्ठ गुरूला सोडून क्षुद्र बटकीची सेवा करणेंच आहे, असें पंडित समजतात. (९।६७९-६८५; १२।१८१४-१८१८; १८२४-१८२६, १८३०-१८३५,१८३९, पहा.)

८. दांभिक, बोकेसंन्यासी, ढोंगीसोदे, आणि ज्ञानीपणाचा व निस्पृहपणाचा आव घालून लोकप्रियता व लौकिक यासाठीं धडपडणारे छद्मी लोक यांसंबंधें पंडितांच्या मनांत किती तिटकारा बाणला होता, हेंही वर निर्दिष्ट केलेल्या स्थळांवरून स्पष्ट होतें. सत्यापुढें व भगवद्वचनापुढें आपण कोणाचीही चाड धरणार नाहीं ही भीष्मप्रतीज्ञा तडीस नेण्यांत पंडितांनीं आपल्या आंगचें अतुल नीतिधैर्य जगाच्या निदर्शनास आणून दिलें आहे, यांत तिळमात्र शंका नाहीं. जेथें जेथें भगवदुक्तीचा विपर्यास झाला असें त्यांना खात्रीनें वाटलें, तेथें तेथें प्रतिपक्षावर तीव्र प्रहार करण्यांत त्यांनीं मुळींच कसुर केली नाहीं, मग तो प्रतिपक्षी भाष्यकार असो, एकादा

लोकप्रिय सिद्ध असो, वा व्यासपीठावरून गीतेची व्याख्या करणारा एखादा आपला समकालीन महापंडित असो! टिळेमाळा करून, भागवतधर्माचा टेंभा मिरवून, भक्तिहीन बुद्धीनें एकादशीचे उपासतापास करून सर्व वेळ •गप्पाष्टकांत घालवि-णाऱ्या कर्मठांचाही पंडितांनीं चांगला समाचार घेतला आहे. एकादशीला उपवास करण्याला ऋषींनीं सांगितलें आहे. परंतु लोक त्या शासनाचें खरें मर्म ध्यानांत न ठेवितां केवळ बाह्य कसरती व दिखाऊ कामें कशीं करितात व एकंदरींत त्यांच्या कडून निर्जीव देहाला आलिंगन देण्याचे हास्यास्पद प्रकार कसे घडतात तें पंडितांनीं नवव्या अध्यायांत वर्णिलें आहे. (९।१०७९–१०९३ पहा.) या ठिकाणच्या ओव्यांत, पंडितांचा भागवतधर्माविषयींचा सदभिमान व हरिनामकीर्तनावरील अकृ-त्रिम प्रेम, हीं मारखीं प्रस्फुरत आहेत. भक्तिहीन कर्मठांचीही अडीचशें वर्षांपूर्वीची स्थिति आजकालही तंतोतंत तशीच दृष्टीस पडते आहे. अशा कर्मठांचाच समाजांत असंख्य भरणा आज जर आपल्याला प्रत्यक्ष दिसत आहे, तर आपली धर्मबुद्धि निःसत्व झाली आहे व भागवतधर्म निर्जीव झालेला आहे, असें म्हणणें वावगें होईल काय? भागवतधर्माची व्याख्या १२।८०२–८०५ व १८।२५४५–२५४७ मध्यें पहावी.

हा भागवतधर्म पाळण्याला, ईश्वराची तादात्म्यानें भक्ति करण्याला, व मन निवांत आणि निश्चल राहण्याला, एकांत स्थळें किंवा गिरिगुहाच पाहिजेत असें नाहीं. परंतु विषयी, आळशी, लोभी, विलासी, अशा प्रकारची मंडळी मात्र टाळली पाहिजे; कारण अशी मंडळी स्वतः पुण्यसाधन न करितां, दुसऱ्या साधुसंतांचीं मनें चंचळ व दूषित करण्याचा मात्र प्रयत्न करिते. प्रेमळ भगवद्भक्तांची संगती सोडून भगवच्चिं-तनाकरितां किंवा ध्यानसमाधीकरितां विविक्त प्रदेशांत जाण्याची जरूरी नाहीं. भागवत धर्माचें संगोपन भक्तसभांतच झालेलें आहे व अशा सभा टाळणें म्हणजे केवळ अज्ञान होय. तेराव्या अध्यायाच्या दहाव्या श्लोकांतील 'जनसंसदि' या पदाचें विवरण करितांना पंडितांनीं हे विचार नमूद केले आहेत. भक्तसभेंत जातिभेद किंवा अन्य भिन्नभावही राहूं शकत नाहींत, असेंही पंडितांनीं त्याच स्थळीं सुचविलें आहे.

९. पंडितांना आपल्या ज्ञानाची व पांडित्याची घमेंड होती; दुसऱ्याची अवहे-लना करण्यांतच ते पुरुषार्थ मानीत; ते द्वैतवादी होते; संस्कृत भाषाच कायती बोलावयाची व लिहावयाची, पण मराठी म्हणजे केवळ अस्पर्श्यच असें त्यांना वाटत असे; त्यांचे संस्कृत ग्रंथ पुष्कळच आहेत; वगैरे अनेक दंतकथा या महा-पंडितांविषयीं लोकांत प्रचलित आहेत. पंडितांना द्वैतमार्गांतून परावृत्त करून, अद्वैताकडे व भक्तियोगाकडे वळविण्याचें आणि त्यांजकडून प्राकृतजनोद्धारार्थ प्राकृत रचना करविण्याचें श्रेय रामदासस्वामींकडे देण्यांत येतें. पण मराठीचे कट्टे अभिमानी जे

मोरोपंत यांची सुद्धां संस्कृत कृति पंडितांच्या संस्कृत कृतीपेक्षां अधिक आहे ही गोष्ट लक्ष्यांत घेण्यासारखी आहे. पंडितांचे एक दोनच संस्कृत ग्रंथ उपलब्ध आहेत, परंतु त्यांत त्यांनीं संस्कृताविषयीं आढ्यता किंवा प्राकृताविषयीं तिरस्कार प्रकट केलेला आढळत नाहीं. पंडित द्वैतमार्गी होते, असेंही त्यांच्या ग्रंथांवरून आढळून येत नाहीं; उलट द्वैतवादानें समाधान होत नाहीं, म्हणून आपण अनेक गुरू केले, अद्वैताचा अनुभवयुक्त बोध व्हावा म्हणून अनेक संस्कृत व प्राकृत ग्रंथांचें परिशीलन केलें, पण सर्व निष्फळ गेलें; अखेर मलयपर्वतावर सच्चिदानंदयतिरूपानें भेट देऊन, ईश्वरानें उपदेश केला, तेव्हांच समाधान झालें व अद्वैत आणि सगुणभक्ति यांचें खरें खरें ज्ञान प्रत्ययास आलें, असें पंडितांनींच आपल्या एका ग्रंथांत स्पष्ट सांगितलें आहे. रामदासस्वामींचा पंडितांनीं कोणत्याही ग्रंथांत उल्लेख केला नाहीं; अद्वैतरहस्य व सगुणभक्ति यांचा उपदेश समर्थांकडून झाला असता. तर त्याचा उल्लेख न करितां, सच्चिदानंदयतीची बनावट कहाणी सांगण्याइतका अधमपणा पंडितांच्या अंगीं होता, असें निदान आमचें मन मानूं शकत नाहीं; पंडितांना षट्शास्त्रें व अठरा पुराणें केवळ हातचा मळ होतीं; तरी पण ते महान् भगवद्भक्त होते. भगवद्भजनाला कोणतीही भाषा चालते, संस्कृतांतच काहीं ज्यास्त आहे असें नाहीं, असेंच वामनपंडितांचें मत होतें. पंडितजन अभिमानानें व दुराग्रहानें बुडाले आहेत, असें ते स्पष्ट म्हणतात. गीतेवरील टीकेंत अगदीं सुलभ शब्द वापरावयाचे, अर्थ स्पष्ट करावयाचा, अगडबंब संस्कृत शब्द किंवा समास योजावयाचे नाहींत, हा पंडितांचा बाणाच होता, व तो त्यांनीं अगदीं कसोशीनें पाळला आहे. जे जे म्हणून खरे व ज्ञानी भगवद्भक्त होते, त्यांविषयीं पंडितांना फार फार आदर व अभिमान वाटत असे. मग भाषाभेद व जातिभेद यांना ते मुळींच मानीत नसत. बरोबरच आहे, भक्तीपुढें संस्कृत व प्राकृत यामधील भेदभाव कोठें टिकणार? या संबंधानें ९।१०-२० हें स्थळ पहावें.

१०. पंडितांचा काळ ठरविण्याचें साधन यथार्थदीपिकेंत नाहीं. परंतु त्यांनीं यथार्थदीपिकेंत (१५।१६०३) आपल्या 'निगमसार'नामक ग्रंथाचा उल्लेख केला आहे. निगमसाराच्या शेवटीं ग्रंथसमाप्ति शके १५९५ म्हणजे इ० स० १६७३ सालीं झाल्याचें आहे.

यथार्थदीपिकेंत पंडितांनीं 'निगमसार, कर्मतत्व व ब्रह्मस्तुति' या तीन स्वकृत प्रकरणांचा उल्लेख केला आहे. शिवाय हरिनामसुधा, योगवासिष्ठ, श्रुतिसार (संस्कृत), गीतार्णवसुधा, निगमसार, चित्सुधा, चरमगुरुमंजरी, उपादान, अनुभूतिलेश (संस्कृत), याप्रमाणें हे तेरा ग्रंथ निःसंशय यथार्थदीपिकाकारांचेच आहेत, असें प्रमाणसिद्ध आहे.

मुरुड-जंजिरा,
१५ आक्टोबर १९०८.

काव्यसंग्रहकार.

## ॥ अथ गीतामाहात्म्यप्रारंभः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीराधारमणाय नमः ॥ ॥ धरोवाच ॥ भगवन्परमेशान भक्तिरव्यभिचारिणी ॥ प्रारब्धं भुज्यमानस्य कथं भवति हे प्रभो ॥ १ ॥ विष्णुरुवाच ॥ प्रारब्धं भुज्यमानो हि गीताभ्यासरतः सदा ॥ स मुक्तः स सुखी लोके कर्मणा नोपलिप्यते ॥ २ ॥ महापापादिपापानि गीताध्यानं करोति चेत् ॥ क्वचित्स्पर्शं न कुर्वंति नलिनीदलमंबुवत् ॥ ३ ॥ गीतायाः पुस्तकं यत्र यत्र पाठः प्रवर्तते ॥ तत्र सर्वाणि तीर्थानि प्रयागादीनि तत्र वै ॥ ४ ॥ सर्वे देवाश्च ऋषयो योगिनः पन्नगाश्च ये गोपा गोपिका वापि नारदोद्धवपार्षदैः ॥ ५ ॥ सहायो जायते शीघ्रं यत्र गीता प्रवर्तते ॥ यत्र गीताविचारश्च पठनं पाठनं श्रुतम् ॥ तत्राहं निश्चितं पृथ्वि निवसामि सदैव हि ॥ ६ ॥ गीताश्रयेऽहं तिष्ठामि गीता मे चोत्तमं गृहम् ॥ गीताज्ञानमुपाश्रित्य त्रीन्लोकान्पालयाम्यहम् ॥ ७ ॥ गीता मे परमा विद्या ब्रह्मरूपा न संशयः ॥ अर्धमात्राक्षरा नित्या स्वानिर्वाच्यपदात्मिका ॥ ८ ॥ चिदानंदेन कृष्णेन प्रोक्ता स्वमुखतोऽर्जुनम् ॥ वेदत्रयी परानंदा तत्त्वार्थज्ञानमंयुता ॥ ९ ॥ योऽष्टादशजपो नित्यं नरो निश्चलमानसः ॥ ज्ञानसिद्धिं स लभते ततो याति परं पदम् ॥ १० ॥ पाठेऽसमर्थः संपूर्णे ततोऽर्धं पाठमाचरेत् ॥ तदा गोदानजं पुण्यं लभते नात्र संशयः ॥ ११ ॥ त्रिभागं पठमानस्तु गंगास्नानफलं लभेत् ॥ षडंशं जपमानस्तु सोमयागफलं लभेत् ॥ १२ ॥ एकाध्यायं तु यो नित्यं पठते भक्तिसंयुतः ॥ रुद्रलोकमवाप्नोति गणो भूत्वा वसेच्चिरम् ॥ १३ ॥ अध्यायं श्लोकपादं वा नित्यं यः पठते नरः ॥ स याति नरतां यावन्मन्वंतरं वसुंधरे ॥ १४ ॥ गीतायाः श्लोकदशकं सप्त पंच चतुष्टयम् ॥ द्वौ त्रीनेकं तदर्धं वा श्लोकानां यः पठेन्नरः ॥ १५ ॥ चंद्रलोकमवाप्नोति वर्षाणामयुतं ध्रुवम् ॥ गीतापाठसमायुक्तो मृतो मानुषतां व्रजेत् ॥ १६ ॥ गीताभ्यासं पुनः कृत्वा लभते मुक्तिमुत्तमाम् ॥ गीतेत्युच्चारसंयुक्तो म्रियमाणो गतिं लभेत् ॥ १७ ॥ गीतार्थश्रवणासक्तो महापापयुतोऽपि वा ॥ वैकुंठं समवाप्नोति विष्णुना सह मोदते ॥ १८ ॥ गीतार्थं ध्यायते नित्यं कृत्वा कर्माणि भूरिशः ॥ जीवन्मुक्तः स विज्ञेयो देहांते परमं पदम् ॥ १९ ॥ गीतामाश्रित्य बहवो भूभुजो जनकादयः ॥ निर्धूतकल्मषा लोके गीता याताः परं पदम् ॥ २० ॥ गीतायाः पठनं कृत्वा माहात्म्यं नैव यः पठेत् ॥ वृथा पाठो भवेत्तस्य श्रम एव ह्युदाहृतः ॥ २१ ॥ एतन्माहात्म्यसंयुक्तं गीताभ्यासं करोति यः ॥ स तत्फलमवाप्नोति दुर्लभां गतिमाप्नुयात् ॥ २२ ॥ सूत उवाच ॥ माहात्म्यमेतद्गीताया मया प्रोक्तं सनातनम् ॥ गीतांते च पठेद्यस्तु यदुक्तं तत्फलं लभेत् इति ॥ २३ ॥ श्रीवाराहपुराणे श्रीगीतामाहात्म्यं संपूर्णम् ॥

# वामनपंडितकृत यथार्थदीपिका

(ओवीछंद.)

## भाग चवथा.

### अध्याय पंधरावा.

जय जय जगदश्वत्थमूलमूल ! । जय जयानाद्यमूल ! । जय जय मायाभवाब्धिकूल ! । भक्तजनानुकूल ! सर्वात्मन् ! ॥ १ ॥ जय जय जगदश्वत्थरूप ! । जय जयाव्यय ! चित्स्वरूप ! । जय सरूप ! जय जयारूप ! । स्वेच्छाकल्पितरूप ! पार्थगुरो ! ॥ २ ॥ जय जयाद्यपुरुष ! । जय जय द्वयाद्वय पुरुष ! । जय जय द्वयाद्वयातीत ! परम पुरुष ! । सर्ववित्सेव्य ! सर्व ! भगवन् ! ॥ ३[1] ॥ जय जयोत्तमश्लोक ! । जय जय सजीवजीवलोक । जय जय संकल्पकल्पिताशेषलोक ! । पुण्यश्लोकसेवितांघ्रे ! ॥ ४ ॥ जय जय षडूर्मिबोधसिंधो ! । जय जय मुकुंद ! करुणासिंधो ! । जय जय देव ! दीनबंधो ! । वासुदेव ! ॥ ५ ॥ जय विजयरथाद्रिभास्कर ! । जय विजयाश्वरश्मिकर ! । जय विजयोपदेशकर ! । जगद्गुरो ! ॥ ६ ॥ बोलोनिया त्रिगुणशोध । पूर्वाध्यायीं गुणातीतबोध । बोधूनी, हरला अबोध । आत्मकर्तृत्वाविपर्यी जो होता. ॥ ७ ॥ त्याची यथार्थ टीका । तूंची करिसी यथार्थदीपिका । गीतार्थबीजें स्वानंदपिका । मेघश्याम पिकविसी. ॥ ८ ॥ तें सविस्तर बोलों जरी । बुद्धि चाळिसी गीतार्थावरी । आतां श्रोतयांप्रति हरी । पंचदशाध्यायार्थ बोलतो. ॥ ९ ॥ तूंची बोलणार । आणि तूंची बोलवणार । तें असो, आतां संगतिविचार । बोलतों, जे त्वद्रूप श्रोते, तयांतें. ॥ १० ॥ पूर्वाध्यायांत गुण तिन्ही । द्रष्टा पाहे वेगळे करूनी । आपण अकर्ता म्हणोनी । पाहे, ऐसें श्रीकृष्ण बोलिला. ॥ ११ ॥ जो ऐसा गुणातीत । तो तों जीवन्मुक्त निश्चित । त्यास गुणतरंगांसहित । दिसे नुसता चित्सिंधु. ॥१२॥ परी त्याचा व्यतिरेक अनुभव । तोची वर्णिला म्हणे पांडव ! आणि जे स्वहिततत्पर मानव । तेही ऐसेंची मानिती. ॥ १३ ॥ जो ते लक्षूनी वेगळे गुण । पाहेल द्रष्टेपणाची खूण । मग सर्वात्मबोधीं निपुण । कोण नव्हे ? ॥१४॥

---

१. या अध्यायाचें 'पुराणपुरुषोत्तमयोग' असें नांव आहे.

कीं आपण गुणावेगळा । व्यतिरेकें कळे इतकी कळा । मग कां पाहावें प्रपंचा सकळा । ब्रह्मची म्हणोनी? ॥ १५ ॥ मोक्ष गुणातीतपणें । हें ऐसें बोलिलें देवें आपणें । आतां अन्वयबोधलक्षणें । कां ब्रह्मत्वें पाहावें प्रपंचा? ॥ १६ ॥ परी हें न कळे वर्म । कीं जो जाणेल सर्वही ब्रह्म । तो प्रारब्धयोगें घडतां कर्म । गुणातीतत्व आपलें पाहतो. ॥ १७ ॥ जो सर्वात्मबोधावांचूनी । युक्त जडसत्यत्वभ्रमेंकरूनी । त्यास ज्ञानची नाहीं जालें, म्हणोनी । मुक्ति नाहींच सर्वथा तयातें. ॥ १८ ॥ कीं अविद्याच गेली नाहीं । आत्मा देहद्रष्टा कळला जरी कांहीं । तो साधकची आहे प्रवाहीं । जडभ्रमाच्या. ॥ १९ ॥ तो मोक्ष जरी दृष्टीं पडला । दारवंट मोक्षाचा न सांपडला । जडभ्रमांचा नाहीं उपडला । अविद्याकंद. ॥ २० ॥ [1]उगेंची मिथ्या म्हणती जड । परी सत्य त्या असत्यांत कळणें अवघड । जडीं चैतन्य देखती सुघड । पटीं तंतु, घटीं माती, ये रीती. ॥ २१ ॥ ऐसें असोनी जो गुणातीत । वर्णिता जाला भगवंत । तो तों जीवन्मुक्तची निश्चित । प्रारब्ध वर्ततां वर्ते ये रीती. ॥ २२॥ तेव्हां सर्वही ब्रह्म । हें ठाउकेंची त्यातें वर्म । परंतु प्रारब्धें घडतां गुणकर्म । गुणातीतत्व पाहे आपुलें. ॥ २३ ॥ परी हें न समजती जन । प्रस्तुत न समजला अर्जुन । जरी उपदेश भवभंजन । करिता जाला मागें स्थळस्थळीं. ॥ २४ ॥ प्रस्तुतीं कमलेक्षण । मुख्यत्वें गुणातीतलक्षण । बोलतां, इतकेंची विचक्षण । पाहेल सोडूनी सर्वात्मता. ॥ २५ ॥ म्हणोनी आतां मागुती । अन्वय बोलों पाहे संतांचा पती । प्रपंच अश्वत्थ या प्रसंगसंगती । बोलों म्हणे. ॥ २६ ॥ कीं एकची पिप्पल । मूळ, शाखा, पल्लव, फळ । तोही वृक्ष शेवटीं केवळ । बीजची असे आपुलें. ॥ २७ ॥ याबरूनी श्रुती । प्रपंच अश्वत्थ वर्णिती । तें आतां बोलेल श्रीपती । कीं गीता मथितार्थ सर्व वेदांचा. ॥२८॥ मग एकापुढें एक । प्रसंगें चालती श्लोक । प्रस्तुत अश्वत्थ वर्णितो उत्तमश्लोक । या श्लोकापासूनी श्रीभगवान्. ॥ २९ ॥

श्रीभगवानुवाच:—ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥

'ऊर्ध्व कालेंकरूनी । जैसा पिता ऊर्ध्व पुत्राहुनी । तैसें प्रपंचापूर्वी ब्रह्म म्हणोनी । ऊर्ध्वशब्दें परब्रह्म. ॥ ३० ॥ त्या ऊर्ध्वी ब्रह्मीं । मूळ अश्वत्थाचें म्हणे जगत्स्वामी । तें मूळ तों माया म्हणूनी निगमागमीं । प्रसिद्ध असे. ॥ ३१ ॥ माया ब्रह्मीं प्रगटते । ते माया ब्रह्मींच असते । त्याच्या

---

१. 'उपजला' असा पाठ आढळतो. परंतु तो चुकीचा दिसतो. २. 'मूळ माया' असा पाठ आढळतो.

प्रकाशें प्रकाशते । अनंतब्रह्मांडरूपिणी. ॥ ३२ ॥ किरणीं उठे जळाभास । ठाव त्यावांचूनी कैंचा तयास? । किरणावांचूनी कवणास । दिसेल उदकभास तो?॥ ३३ ॥ मध्यान्हीं कार्यरूपें दिसे । सायान्हीं कारणत्वें किरणीं वसे । पुन्हा दुसरे दिवशीं गवसे । मध्यान्ह होतां. ॥ ३४ ॥ प्रातःकाळीं सायान्हीं । न म्हणवे किरणीं नाहीं म्हणोनी, । जरी नाहींच, तरी कोठूनी । मध्यान्ह होतां प्रगटे? ॥ ३५ ॥ तरी कां मध्यान्हावांचूनी न दिसे? । म्हणूनी पुसतील जे ऐसें । त्यांस सांगावें, कीं वसे । किरणींच कारणरूपें इतर काळीं. ॥ ३६ ॥ परंतु कारणरूपेंकरूनी । किरणींच आहे अरूप होऊनी । कार्यरूपें त्याचपासूनी । प्रगटे, असे त्याचमध्यें. ॥ ३७ ॥ दुधीं दिसेना घृत । तथापि आहे निश्चित । कीं निघे होतां मथित, । न दिसे, तरी आहे म्हणावें. ॥ ३८ ॥ तैसी माया प्रलयकाळीं । असे निर्धर्मी केवळीं । सृष्टिकाळीं त्याच निष्कळीं । ते प्रगटते, असते, लय पावते. ॥ ३९ ॥ ब्रह्मींच ते वसे । प्रपंच तीपासूनी होतसे । यालागीं तेची माया येथें गवसे । प्रपंचाश्वत्थमूळही. ॥ ४० ॥ ऐसी माया अश्वत्थमूळ । ते ऊर्ध्वी असे म्हणे मेघनीळ । ऊर्ध्वशब्दें तीपरतें पलीकडे केवळ । अधिष्ठान तें मायेचें. ॥ ४१ ॥ तें ऊर्ध्व म्हणावें ब्रह्म । काळें पाहतां तें अनादि परम । होतां मायानदीचा उगम । जीव नाना प्रगटती आलीकडे. ॥ ४२ ॥ अधःशब्दें खालते । नीच काळेंकरूनी ते । सर्वही जीव या अर्थी बोलते । अधःशब्दें वाणी देवाची. ॥ ४३ ॥ प्रपंच केला पिप्पल । ब्रह्मीं माया त्याचें मूळ । अधःशब्दें जीव सकळ । देहशाखा बोलतो तयातें. ॥ ४४ ॥ एवं अध ऊर्ध्व दों शब्दींकरूनी । एका चैतन्याचे भेद दोनी । ऊर्ध्वबिंब अधःप्रतिबिंब म्हणोनी । त्यांत ऊर्ध्व मूळ, शाखा या जीवांकडे. ॥ ४५ ॥ मायाच अश्वत्थ, मायाच मूळ । मायाच शाखा देह सकळ । ज्यांत माया तें ब्रह्म केवळ । देहशाखा जीवातें. ॥ ४६ ॥ हा प्रपंच अवघा ये रीती । त्यास अश्वत्थ म्हणती । म्हणोनी म्हणे जगत्पती । कीं वेदींही अश्वत्थ बोलती प्रपंचातें. ॥ ४७ ॥ अश्वत्थ शब्दाचा अर्थ । पोटीं धरूनी बोलतो समर्थ । कीं अर्थानुरूपें यथार्थ । अश्वत्थ म्हणती प्रपंचातें. ॥ ४८ ॥ आजी देखिला जैसा । उद्यां दिसेना हा तैसा । म्हणजे नश्वर, क्षणभंगुर, जैसा । अर्थ अश्वत्थशब्देंकरूनी. ॥ ४९ ॥ ब्रह्मयाच्या पूर्वदिनीं । त्रैलोक्य होतें, तें गेलें नासोनी । किंबहुना क्षणामधूनी । पालट होय ज्याच्या पदार्थाचा. ॥ ५० ॥ शरीर वाढलें । अथवा क्षीण जालें । तें क्षणक्षणा पालटलें । नाश जाला अवस्थेचा. ॥ ५१ ॥ बालत्व गेलें क्षणक्षण । प्रसूतिकाळींचें

बाललक्षण । गेलें, जळें प्रक्षाळण । केलें जेघवां. ॥ ५२ ॥ दिवसेंदिवस रूप पालटे । गेलें रूप आहे तें कोठें ? । तथापि तोच देह वाटे । जळ काल-चेंच वाटे प्रवाहीं. ॥ ५३ ॥ हेंची जळ प्रतिदिनीं । आम्हीं पितों म्हणोनी । हात दावी जेथें, तें वाहुनी । गेलें, जों तो बोल पुरता नाहीं बोलिला. ॥५४॥ तें रूप गेलें, परी । देह आहे म्हणावा जरी । तरी पांचभौतिक देह हा गेलि-यावरी । भूतें असती, कां नासला म्हणावा ? ॥ ५५ ॥ पंचभूतांचा पसारा । देहादि आकार सारा । तथापि भूतें असोनी आकारा । नाश दिसतो. ॥ ५६ ॥ जो पदार्थ आजी देखिला । तो उद्यां नाहीं राहिला । ऐसा प्रपंच बोलिला । अश्वत्थशब्दें. ॥ ५७ ॥ तैसा जरी देह असे । तरी तें रूप न. दिसे । यालागीं नाश गवसे । प्रतिक्षणीं. ॥ ५८ ॥ जो पदार्थ आजी देखिला । तो उद्यां नाहीं राहिला । ऐसा प्रपंच बोलिला । अश्वत्थशब्दें. ॥ ५९ ॥ काल जीवंत देखिला । तो आजी भस्म केला । हें अश्वत्थपण तों भलतियाला । कळलेंची आहे. ॥ ६० ॥ 'श्व' म्हणिजे उद्यां म्हणावें । 'त्थ' उद्यां राहील तें गणावें । न राहील उद्यां तें जाणावें । 'अश्वत्थ'शब्देंकरूनी. ॥ ६१ ॥ प्रपंच अश्वत्थवृक्ष ये रीती । या अर्थी वेदवेदांत बोलती । तथापि अव्यय म्हणती । कार्यकारणैकत्वें. ॥ ६२ ॥ नाशाचें नांव व्यय । अविनाशी अव्यय । नश्वर आणि त्याचा नित्य निर्णय । मनन करूनी समजावा. ॥ ६३ ॥ सोनेंची आहे अलंकार । हा शब्द साच वारंवार । तथापि नश्वर आकार । नित्य सोनें. ॥ ६४ ॥ जेव्हां अलंकार प्रसंग । तेव्हां वदों ये उत्पत्ति आणि भंग । परी जें कनक त्या आकाराचें अंग । तें अव्ययची कीं. ॥ ६५ ॥ ऐसें जडत्व नश्वर । अश्वत्थशब्दरूपें ईश्वर । आणि वेदही प्रकर्षें वदती, ऐसें सर्वेश्वर । बोलोनी अव्यय म्हणतसे. ॥ ६६ ॥ एवं प्रपंच ब्रह्म एक । त्यांत मायाभाग जड अनेक । तो नश्वर, त्या भागाचा प्रकाशक । अधिष्ठान भाग अव्यय बोलिला. ॥ ६७ ॥ कार्यरूपें अनित्य । कारणरूपें नित्य । कार्य मिथ्या कारण सत्य । ये रीती. ॥ ६८ ॥ नश्वर अश्वत्थरूपें । अव्यय तत्प्रकाशकस्वरूपें । नश्वररूपेंकरूनी आणि अव्ययरूपें । कार्यकारणीं मागुती नसे भेद. ॥ ६९ ॥ तरंगां जळा वेगळेपण । करूनी दावी ऐसा कवण ? । घट मृत्तिकेवेगळाकरूनी खूण । घटची दावी ऐसा कोण असे ? ॥ ७० ॥ करूनी नाना खटपट । दावी तंतूवेगळा पट । ऐसा तो जगीं एकही निपट । आढळेना. ॥ ७१ ॥ ऐसा अश्वत्थ होऊनी अव्यय । कीं प्रपंच ब्रह्मची अद्वय । म्हणूनी आपण जगन्मय । दोन्ही रूपें तेथें दाखवी.

॥ ७२ ॥ पिके अनुभवाचें पीक । वाखाणितां पद एक एक । करूनी क्षीर-नीरविवेक । क्षीरची नीर करीं गुरु परमहंसांचा. ॥ ७३ ॥ आतां अश्वत्थशब्दें नश्वर आणि अव्यय । ज्ञान ऐसें अद्वय । वेदेंकरूनी होय । तीं पर्णे जयाचीं. ॥ ७४ ॥ कीं अंधकारीं वृक्ष न दिसे । तों पर्णध्वनिश्रवणें वाटे असे । ऐसा प्रपंचाश्वत्थ नश्वर तथापि गवसे । तत्त्वता अव्ययपणीं वेदींच. ॥ ७५ ॥ आतां हाची अर्थ । दृढतर समजो पार्थ । म्हणोनी बोलतो समर्थ । चतुर्थचरणीं. ॥ ७६ ॥

चतुर्थचरणः—**यस्तं वेद स वेदवित् ॥**

जो त्या अश्वत्थातें जाणे । त्यास नश्वरत्वीं अव्ययत्व बाणे । तोची वेद-वेत्ता म्हणे । गीताकार भगवंत. ॥ ७७ ॥ कीं वेदवेदांतेंकरूनी जाणावें । तें तत्त्व हेंची म्हणावें । हें न कळतां कोठोनी आणावें । वेदवेत्तेपण ? ॥७८॥ नश्वर होऊनी पिप्पल । अव्यय मागुती केवळ । हें वेदांवांचूनी अकळ । कीं अविद्यातमीं न कळे पर्णध्वनिविना वृक्षरचना. ॥ ७९ ॥ आणि अश्वत्थ नश्वर होऊनी । अव्यय कारणपणीं म्हणोनी । याच मुख्य अद्वयानुभवें-करूनी । वेदवेत्ता जाणावा. ॥ ८० ॥ कीं वेद वर्णिती प्रलय । तेव्हां सर्वांचाही व्यय । आणि 'सर्वं खलु' निश्चयें 'अद्वय-। ब्रह्म', ऐसें ते वदती. ॥ ८१ ॥ हें कार्यकारणपण । त्रिगुण नश्वर, नित्य निर्गुण । जैसे अलंकार नश्वर आणि सुवर्ण । नित्य देखावें आकारीं. ॥ ८२ ॥ ऐशा मननेंकरूनी । सर्वत्र चैतन्य देखे ज्ञानी । तो वेदवेत्ता म्हणोनी । म्हणों ये, म्हणे श्रीकृष्ण. ॥ ८३ ॥ जो युक्तीनेंची ऐसे बोल । बोले तेही फोल । जडतरंगमात्रीं सखोल । आत्मप्रत्यय असावा. ॥ ८४ ॥ तो म्हणावा वेदवेत्ता । जो जडीं सर्वत्र देखे आत्मसत्ता । जडत्व नाहींच ऐसें चित्ता । जयाचिया बाणे. ॥ ८५ ॥ तो नश्वरीं देखे नित्य । तो असत्यांत देखे सत्य । कीं तोची जाणे म्हणावा पांडित्य । सकळां वेदांचें. ॥ ८६ ॥ काय बोलोनी बहुत ? । दुर्लभ बोल अद्भुत । सप्तमीं बोलिला स्वयें भगवंत । 'वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः' ॥ ८७ ॥ ऐसा या श्लोकाचा अर्थ । आतां यापुढें समर्थ । काय बोलतो परमार्थ । तो आइका. ॥ ८८ ॥ ऐसा अश्वत्थ बोलिला । त्यांत ऊर्ध्वशब्द ब्रह्मीं लागला । अधःशब्दें सिद्ध जाला । जीवांचा कदंब. ॥ ८९ ॥ त्यांत ऊर्ध्व मायाप्रपंचाचें मूळ । आणि जीव प्रतिबिंबांश

---

१. जितेंद्रिय यतिश्रेष्ठांचा गुरु. (पक्षी) राजहंसश्रेष्ठ. २. अ० ७, श्लो० १९. ३. समुदाय.

सकळ । देहरूप शाखा, कर्म फळ । त्या अधःशब्दवाच्यां जीवांतं. ॥ ९० ॥ ऐसें प्रथमश्लोकीं बोलिला । यांत बोलायाचा अंश राहिला । तो आतां बोलों आरंभिला । या श्लोकीं. ॥ ९१ ॥

पूर्वार्ध:—**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।**

अगा! त्या अश्वत्थाच्या शाखा जाल्या । त्या दोहींकडे पसरल्या । त्यांत अधःशब्दें जीवातें बोलिल्या । परी ऊर्ध्वासही असतीच. ॥ ९२ ॥ अध ऊर्ध्व दोहींवरी । शाखा अश्वत्थाच्या परी । अधःशाखा म्हणूनी वैखरी । इतकीच पूर्वश्लोकीं बोलिलों. ॥ ९३ ॥ परंतु ऊर्ध्व जें काळें पलीकडे । आणि अधः जें काळेंची अलीकडे । शाखा या दोहींकडे । अश्वत्थाच्या पसरल्या. ॥ ९४ ॥ शाखास्थानीं शरीरें । जीवांस असती नानाकारें । जीं अधःशब्दें निर्धारें । घेतलीं अलीकडे म्हणोनी. ॥ ९५ ॥ कीं मायेचपासूनी । गुणत्रयात्मक महत्तत्त्व म्हणोनी । प्रगटतां अनेक भेदेंकरूनी । जालीं चैतन्यें अनेक अलीकडे. ॥ ९६ ॥ हीं अधोभागीं काळें अलीकडे । ऊर्ध्व याहूनी उंच बिंब याचें पलीकडे । यांत शाखाशब्दें रोकडे । देह बोलले जीवांतें. ॥ ९७ ॥ आतां ऊर्ध्वशब्दें ब्रह्म निर्गुण । तेंची मायायोगें सगुण । अवलंबूनी शुद्ध सत्त्वगुण । अवतार करीतसे शाखाच ते देहही. ॥ ९८ ॥ परंतु जीवमात्रांचें शरीर । त्यांत जीव असती कर्मानुसार । ते शाखारूपें देह भगवदवतार । ब्रह्मची असे त्या देहीं. ॥ ९९ ॥ एवंच अधःशब्दवाच्यापरी । शाखा देहरूप ज्या वरी । ऊर्ध्व ब्रह्म त्यासही त्या त्या अवतारीं । देह असती त्या शाखा. ॥ १०० ॥ याकागीं 'अधश्चोर्ध्वं' म्हणोनी । या चकारेंकरूनी । अवतार सगुणाचे सुचवूनी । त्या शाखाच म्हणतसे. ॥ १०१ ॥ एवंच जीव प्रतिबिंब । अधःशब्दवाच्य हा कदंब । आणि ऊर्ध्वशब्दवाच्य बिंब । देह दोघांचेही शाखा या वृक्षाचिया. ॥ १०२ ॥ कीं जरी बंध मोक्ष करणार । सर्वेश्वराचे अवतार । आणि हे कर्मबंधानुसार । तरी शाखाच या अश्वत्थाच्या. ॥१०३॥ कीं लोखंडाचेंच शस्त्र, परी । लोहशृंखलेपासूनी मुक्त करी । तथापि भलता म्हणेल लौकरी । कीं दोन्ही एकची लोखंड. ॥ १०४ ॥ कीं अधिष्ठान दोहीं शाखांचें एक । जरी प्रतिबिंबांश त्या जीवदेहीं अनेक । दोहीं देहांचें एक प्रकाशक । शस्त्रांत शृंखलेंत एकची लोखंड जेरीती. ॥ १०५ ॥ देह जीवांचे त्रिगुण । ईश्वराचे शुद्ध सत्त्वगुण । त्या दोही देहांतही एकची निर्गुण । जें ब्रह्म ऊर्ध्वशब्दें बोलिलें. ॥ १०६ ॥ या भावें गुणप्रवृद्धा । कीं गुणेंच दोन्ही वाढल्या प्रसिद्धा । त्रिगुणशाखा गुणबद्धा । सत्त्वशाखा गुणमुक्ता तरी गुण.

॥ १०७ ॥ आणि त्या शाखा दोन्ही । विषयप्रवालेंकरूनी । समुद्रा म्हणोनी । गूढभाव येथें सुचविला. ॥ १०८ ॥ देह जीवांचे ईश्वराचे । दोन्ही शाखा आणि त्या शाखांचे । फांटे विषय, ऐसें स्ववाचे । गूढभावें बोलतो. ॥ १०९ ॥ कीं विषयेंद्रियप्रतीती । जीवास सत्यत्वें वाढती । आणि मिथ्याकल्पना जगत्पती । सर्व आपली पाहतो. ॥ ११० ॥ म्हणोनी इंद्रियें आणि विषय । दोहीं वेगळा जगन्मय । तथापि रूपादि प्रत्यय । जनास रामकृष्णावतारीं. ॥ १११ ॥ परी विषयप्रत्यय जें रीती । जनास जीवदेहीं होती । ऐसेच अवतारदेहीं प्रत्यया येती । विषयप्रत्यय दर्शनें स्पर्शनें जनातें. ॥ ११२ ॥ त्यांत अन्योन्य विषयप्रत्यय । दर्शनें स्पर्शनें जीवास होय । तैसे ईश्वरदेहीं विषय । जन देखती, परंतु नसती तयातें. ॥ ११३ ॥ सर्व आपली कल्पना । इतकेंची वाटे जगजीवना । परंतु दर्शनें स्पर्शनें जना । सत्य अवताराचें वाटतें. ॥ ११४ ॥ यालागीं विषय उभय देहीं असती । जरी इंद्रियें ईश्वरास नसती । यालागीं विषय दोहींतें श्रीपती । बोले येथें. ॥ ११५ ॥ त्यांत अधःशब्दें, अलीकडे । अविद्योपाधींत रोकडे । प्रतिबिंब त्यांकडे । न बोलतां इंद्रियें लागलीं. ॥ ११६ ॥ आणि विषयांच्या प्रतीती । जीवास इंद्रियांवीण न होती । विषय बोलतांच लागती । इंद्रियें तयां. ॥ ११७ ॥ कीं जे अधःशब्दें अलीकडे । ते इंद्रियद्वारा भोक्ते हें घडे । ऐसें पुनःपुन्हा निवडे । मुखें देवाचिया. ॥ ११८ ॥ नवल कीं जनदृष्टीकरूनी । विषय ईश्वरदेहीं म्हणोनी । वाटे, यालागीं विषय दोहींकडे लावुनी । विषयप्रवाळ शाखा दोन्ही म्हणतसे. ॥ ११९ ॥ शाखांस फांटे जैसे । देहास विषय तैसे । त्यांत शाखा देह, त्यांचे भेद ऐसे । कीं एक जीवांचे, एक ते ईश्वराचे. ॥ १२० ॥ एवं पूर्वश्लोकीं ऊर्ध्वाकडे । मूळ आणि अधःशब्दें अलीकडे । जीव प्रतिबिंबले रोकडे । शाखा तयातेंची बोलिल्या. ॥ १२१ ॥ ऊर्ध्वासही शरीरें । शाखाशब्दें सर्वेश्वरें । या श्लोकीं बोलिलीं निर्धारें । आणि त्या अधःशब्दवाच्या जीवांसही. ॥ १२२ ॥ तरी काय देह ईश्वराचे । जे अखंडानंदानुभवाचे । ते आणि देह जीवांचे । सारखे म्हणावे ? ऐसी शंका. ॥ १२३ ॥ येथें शंका ये रीती । म्हणोनी आतां जगत्पती । कर्मबंधें जीवांचे देह होती । ऐसें बोलोनी परिहरितो. ॥ १२४ ॥ सांगतां बंध यांचे । नित्यमुक्त देह ईश्वराचे । हें सिद्ध होतें, म्हणोनी जीवांचे । कर्मबंध उत्तरार्धें बोलतो. ॥ १२५ ॥

**उत्तरार्धः—अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥२॥**

अगा ! अधःशब्दें जीवगण । जे बोलिलों मी आपण । त्यांचे ठायीं

बंधलक्षण । मूळें असती शाखांचीं. ॥ १२६ ॥ जें वृक्षाचें मूळ । त्या मूळा-चेच अंश पुष्कळ । अधःशब्दवाच्यांश असती म्हणे मेघनीळ । तीं हीं मूळें म्हणावीं. ॥ १२७ ॥ प्रारब्धमूळें अवांतर । त्यांसही शाखा फुटती अपार । जें ऊर्ध्वी मूळ, त्या वेगळीं सर्वेश्वर । हीं मूळें बोलतसे. ॥ १२८ ॥ त्या मूळांस आश्रय ऊर्ध्व केवळ । तैसीं अधःशब्दवाच्यांमध्यें मूळें जीं सकळ । म्हणून त्याची सांगे कीं कर्मफळ । बंध करी मनुष्यदेहातें. ॥ १२९ ॥ तीं मूळें अत्यंत वाढलीं । होऊनी दृढ पसरलीं । तीं कोण म्हणोनी नाहीं कळलीं । तरी म्हणून सांगतों, आइक. ॥ १३० ॥ जे मनुष्यजन्मीं । बंध पावती नाना कर्मी । तीं दुसरीं मूळें बोलतों मी । अधःशब्दें जीव त्यांमध्यें. ॥ १३१ ॥ आतां तीं कर्मबंध मूळें । जरी म्हणावीं शरीरें स्थूळें । तरी हीं कर्मांचींच फळें । त्यांस बंध तीं मूळें स्थूलाचीं. ॥ १३२ ॥ एवं अनादि माया जैसी । अनादि लिंगदेहरचना तैसी । बंध देहीं कर्में तयासी । स्थूळ देह फळ त्या कर्माचें. ॥ १३३ ॥ कर्म उपजे स्थूळीं मनुष्यदेहीं । बंध सूक्ष्मीं लिंगदेहीं । अधःशब्दवाच्य जीव जे देही । त्यांस कर्मानुरूपें स्थूळीं फलभोग. ॥ १३४ ॥ क्रियमाणाचें होतें संचित । प्रारब्ध त्या संचिताचेंची निश्चित । तें मनुष्यदेहा-विरहित । क्रियमाण न घडे. ॥ १३५ ॥ मनुष्यदेहेंची मनुष्यलोक । या अर्थी बोले उत्तमश्लोक । त्या कर्माचींच फळें अनेक । स्थूलदेहीं आणि नाना मनुष्यदेहीं. ॥ १३६ ॥ मनुष्यदेहीं क्षणक्षण । कर्म होय तें क्रियमाण । जेव्हां प्राणासवें करी प्रयाण । तें संचित होय लिंगदेहीं. ॥ १३७ ॥ अग-णित ऐसीं संचितें । परी क्रियमाण नरदेहींच होतें । तें पूर्वसंचितामध्यें मिळतें । प्रारब्ध होतें त्यामधूनी. ॥ १३८ ॥ ऐसी अनादि सांखळी कर्माची । परंतु लिंगदेहीं वसती तयाची । जेंवी जागृतीं संस्काराची । वसती मनांत. ॥ १३९ ॥ मनीं जागृतीचे संस्कार । तेची स्वप्नीं नानाकार । परंतु होणार जो स्वप्नीं विस्तार । त्याचें मूळ त्या मनामध्यें सांपडे. ॥ १४० ॥ जागृतीं संस्काराविण । स्वप्न देखेल कवण ? । जो जागृतिप्रपंच विलक्षण । तोही संस्कार जागृतीचा. ॥ १४१ ॥ पांचां तोंडांचा नर । कीं दहा हातांचा वानर । अथवा शीतळ वैश्वानर । तेही संस्कार जागृतीचे. ॥ १४२ ॥ कीं जैसें जागरीं देखिलें मुख एक । एकास तैसीं मुखें अनेक । जैसे एकास दोन दोन करचरणादिक । तैसेची दहा दहा स्वप्नीं देखतो. ॥ १४३ ॥ अग्नि उष्ण वाटला जागरीं । परी शैत्य देखिलें जैसें नीरीं । तैसें शैत्य त्या वैश्वानरीं । देखिलें नवल काय ? ॥ १४४ ॥ मनुष्याच्या डोईवरी । पर्वत अघटित जागरीं ।

तथापि मनुष्य पर्वत दोन्ही अंतरीं । जागरींचा होतां संस्कार. ॥ १४५ ॥ मनुष्य आणि पर्वत । जागरीं देखे जागृत । स्वप्नीं भ्रांत निद्रित । कल्पी मनुष्याच्या शिरावरी. ॥ १४६ ॥ परी आजी रात्रीं स्वप्नरचना । होणार त्याचे संस्कार जना । दिवसा धुंडूनी पाहतां मना । आढळेना कोणासी. ॥ १४७ ॥ स्वप्नीं जें दिसणार । जागरीं त्याचा न स्फुरे संस्कार । तथापि जागृत्यनुसार । स्वप्न दिसे. ॥ १४८ ॥ ऐसें मनुष्यदेहीं क्रियमाण । लिंगदेहींच देखती सुजाण । कीं पूर्वसंस्कार संचितांत मिळोनी निर्माण । प्रारब्ध होतसे तयाचें. ॥ १४९ ॥ ज्ञानानळें लिंगदेह होतां भस्म । त्यासवें जळे संचित कर्म । क्रियमाण होतें मग अकर्म । अकर्तेपणें आणि ईश्वरार्पणेंही. ॥ १५० ॥ इतरांचें क्रियमाण । होतां प्राणप्रयाण । संचित होऊनी, मग निर्माण । करी प्रारब्ध. ईश्वर त्यामधूनी. ॥ १५१ ॥ तें भोगिल्याविण । सुटे ऐसा असे कवण ? । एवं कर्माचें बंधकपण । लिंगदेहीं. ॥ १५२ ॥ ऐसे लिंगदेह नाना । ते जीव शाखामूळें अर्जुना ! । त्या मूळापासूनी स्थूलरचना । ते मनुष्यदेहाची कर्माची. ॥ १५३ ॥ म्हणूनी म्हणे कीं "**अधश्च मूलानि**" । आणि तीं म्हणे "**अनुसंततानि**" । तीं कैसीं ? म्हणे तरी "**कर्मानुबंधीनि**" । कोठें कर्मबंध ? तरी "**मनुष्यलोके.**" ॥ १५४ ॥ मनुष्यदेहाविण । अन्य देहीं नसे क्रियमाण । येविषयीं पुराणें वेद स्मृति प्रमाण । तें सर्वशास्त्रमयी गीताही येथें बोलते. ॥ १५५ ॥ आतां **अश्वत्थ**शब्दें व्यय । बोलोनी मागुती तोची अव्यय । म्हणूनी जडचैतन्य अद्वय । प्रथमश्लोकीं बोलिलें. ॥ १५६ ॥ परंतु ज्याचा होय व्यय । त्यातेंची म्हणतां अव्यय । येथें उपजेल संशय । सर्वांसही. ॥ १५७ ॥ आतां कार्य आणि कारण उपादान । त्याच्या एकत्वें हें समाधान । टीकेंत या वाखाणिलें विज्ञान । परंतु देव नाहीं बोलिला. ॥ १५८ ॥ कीं ऊर्ध्वीं मूळ सांगितलें । आणि शाखा अधोभागीं बोलिलें । तेथें ऊर्ध्वासही शाखा बोलाव्या तें राहिलें । आणि अधोभागीं मूळें बोलावीं. ॥ १५९ ॥ हें राहिलें बोलतां । तें दुसरिया श्लोकीं बोलिलें तत्त्वतां । नश्वरास अव्ययत्व कैसें ? तें आतां । बोलेल देव. ॥ १६० ॥ ते बोल ये रीती । कीं अनुभवींच मग्न होय मती । आणि अर्थही त्याचा तेच समजती । जे अनुभवी सर्वात्मबोधाचे. ॥ १६१ ॥ दृश्या प्रपंचरूपा । आणि अदृश्या अरूपा । एक होतां, त्या चित्स्वरूपा । सहजची अव्ययत्व. ॥ १६२ ॥ कीं ज्यास रूप असे । तेंची दृष्टीस दिसे । 'जें दिसे, तें नासे' । श्रुति बोलती. ॥ १६३ ॥ तरी ज्या

अश्वत्थास अंत नाहीं । रूप दिसोनी रूप नाहीं । ऐसें अनुभवगम्य तत्त्व जें कांहीं । तदर्थ प्रवर्तला हा श्लोक. ॥ १६४ ॥

न रूपमस्येह तथोपलभ्यते नांतो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्त्वा ॥ ३ ॥

'न रूपमस्य' म्हणे समर्थ । नाहीं रूप यास ऐसा याचा अर्थ । जे दृश्य, ते नश्वर पदार्थ । शंका मानील, तरी रूपची नाहीं म्हणतसे याला. ॥ १६५ ॥ हें बोलणें सखोल । परंतु तत्काळ तों हा विरुद्ध बोल । जरी अनुभवा ये, तरी अमोल । बोल हा. ॥ १६६ ॥ कीं रूप दिसतें प्रत्यक्ष । कैसा अरूप मानावा हा वृक्ष ? । याकारणें बोलतो कमलपत्राक्ष । कीं "इह तथोपलभ्यते". ॥ १६७ ॥ इह म्हणिजे यामध्यें, आतां । रूपवंत दिसत असतां । रूप नाहीं, म्हणिजे पाहतां । रूप कार्याचें, नसेच पावलें उपादान. ॥ १६८ ॥ तरी याचें उपादान । कोणे खुणें कळे त्याचें ज्ञान ? । तरी तें शुद्ध विज्ञान । "तथोपलभ्यते" या वचनें बोलतसे. ॥ १६९ ॥ 'तथा' म्हणिजे त्या कारणाकरितां । 'उपलभ्यते' म्हणजे प्रपंच जाणिजे तत्त्वता । यांत उपशब्दें उपादानकारणता । अर्थ सुचवी. ॥ १७० ॥ मातीकरितां घट । जाणिजे तो अतिनिकट । तंतूकरितां पट । 'उप' समीपची जाणिजे तो. ॥ १७१ ॥ उप म्हणिजे समीप । लभ्यते पाविजेतें रूप । जडाचें उपादान चित्स्वरूप । तें जडींच दिसतें, अर्थ ऐसा. ॥ १७२ ॥ तें जडीं अतिसमीप । तैसें अतिसमीप त्यास जडरूप । त्या जडरूपीं तें अरूप । अतिनिकट जैसें. ॥ १७३ ॥ पटीं तंतु, घटीं माती । कार्यांत कारण ये रीती । ऐशा कारणास म्हणती । उपादान. ॥ १७४ ॥ 'उप' आणि 'आदान' । दों शब्दीं होतें उपादान । या उपादानशब्दाचें व्याख्यान । उप समीप आदान म्हणिजे घेणें जयाचें. ॥ १७५ ॥ कार्यांत अतिसमीप ज्याचें । घेणें घडे, नांव त्याचें । 'उपादान', म्हणूनी तें साचें । कार्य मिथ्या. ॥ १७६ ॥ समीपग्रहण मातीचें घटीं । समीपग्रहण तंतूचें पटीं । ऐशा कोटिदृष्टांतें शेवटीं । कार्य नाहीं, असे उपादान. ॥ १७७ ॥ उपादानीं आकार नाहीं । कार्य त्यावेगळें नसेची कांहीं । तैसें जड चैतन्य असतांही । तें अरूप तरी हेंही अरूप. ॥ १७८ ॥ सुवर्णांचा अलंकार । त्यानेंची तो आकार । इत्यादि दृष्टांतें निर्धार । "न रूपमस्येह तथोपलभ्यते" या वाक्याचा. ॥ १७९ ॥ या अलंकारास आकार नाहीं । ऐसें दिसतें आतांही । त्यामध्यें ऐसें म्हणतां जें कांहीं । तें सोनें

समीपची देखिजेतें. ॥ १८० ॥ जैसें कार्यामध्यें कारण समीप । कारणाकरितां निकटची दिसे कार्यरूप । जडीं समीपची चित्स्वरूप । चित्स्वरूपास्तव समीपची रूप दिसे. ॥ १८१ ॥ कीं त्याचें उपादान कारण । तें त्यामध्यें समीपची देखिजेतें सुवर्ण । त्या सुवर्णास आकारपण । कधींच नसे. ॥१८२॥ उपलभ्यते या शब्देंकरूनी । उपादान कारण सुचवूनी । जडीं चैतन्य कारण ऐसें म्हणोनी । नश्वरपणींही अव्यय अश्वत्थ. ॥ १८३ ॥ कीं आकार होय जाय । तो आकाराचा व्यय । पुन्हा अलंकार सोनें एकची हा निर्णय । अव्यय म्हणावा यालागीं. ॥ १८४ ॥ तैसें जडीं उपादान । ज्यावांचूनी न घडे त्याचें ज्ञान । तें असतांही त्यांतची विज्ञान । 'उपलभ्यते' म्हणजे अतिसमीप पाविजेतें. ॥ १८५ ॥ म्हणजे आधीं दिसे माती घटीं । आणि आधीं दिसे तंतु पटीं । ऐसें उपादान अतिनिकटीं । कार्यामध्यें सांपडे. ॥ १८६ ॥ जैसा मातीकरितां घट । दिसे मातीच अतिनिकट । निकट म्हणिजे निपट । तेंची तें. ॥ १८७ ॥ तें तों आहे अरूप । आतांही दिसतां अश्वत्थरूप । तें तो केवळ अव्ययरूप । तेंच प्रपंचाश्वत्थरूपें दिसतसे. ॥ १८८ ॥ तेंची अश्वत्थ असे । सोनेंची नगरूप दिसे । नश्वरपणीं अव्ययत्व गवसे । त्याचमध्यें त्याचें ये रीती. ॥ १८९ ॥ एवंच दृश्य तितकें नश्वर । तरी अरूप अदृश्य इंद्रियां अगोचर । तें त्याचें उपादान म्हणे सर्वेश्वर । त्याचमध्यें अतिसमीप जाणिजेतें. ॥ १९० ॥ त्यांत जें अतिसमीप । तें उपादान त्याचेंची रूप । तैसें जड वस्तुतः असे चित्स्वरूप । मिथ्या जडत्व, मिथ्या नश्वरत्वही. ॥ १९१ ॥ "अश्वत्थं प्राहुरव्ययं" म्हणोनी । अर्जुना ! । बोलिलों या अभिप्रायेंकरूनी । "यदृष्टं तन्नष्टं" श्रुति म्हणती यावरूनी । शंका येविषयीं धरूं नको. ॥ १९२ ॥ एकची कार्यकारण । कार्यनश्वरपणीं कारणास नित्यपण । हे तूज सांगितली ऐसी खूण । आतां आयीक. ॥ १९३ ॥ यासी नाहीं आदि अंत । कीं कारण याचें अनादि अनंत । कधींपासूनी, कोठूनी, कोठपर्यंत, । हेंही नाहीं या प्रपंचवृक्षातें. ॥ १९४ ॥ कीं जेथवरी जळ । तेथूनी तेथवरी कल्लोळ । अधिष्ठान आद्यंतरहित केवळ । विवर्तही तैसा. ॥ १९५ ॥ पसरला मोठा नाडा । तो नाडा असे जेव्हढा । सर्पाभास भासे तेव्हढा । परी या अधिष्ठाना नसे आदि अंत. ॥ १९६ ॥ थोरा दोराही आदि अंत । सर्प भासे तो असे जेथपर्यंत । तैसें अधिष्ठानीं जड भासे, परी तें अनाद्यनंत । म्हणोनी आदि अंत नसे विवर्तासही. ॥ १९७ ॥ दोंपरी आदि अंत । दोन्ही बोलतो भगवंत । कीं कवण काळापासूनी, कोण काळ-

पर्यंत, । एक आदि आणि अंत ये रीती. ॥ १९८ ॥ दुसरें कोणत्या स्थळा-पासूनी आदि असे? । आणि कोठें अंत जेथूनी हें पुढें न दिसे? । ऐसा द्विविधही आदि अंत न गवसे । या प्रपंचवृक्षाचा. ॥ १९९ ॥ एक कालकृत आदि अंत, एक आदि अंत देशकृत, ।दोन्ही नाहीं म्हणतो भगवंत। या प्रपंचवृक्षातें, हे टीका. ॥ २०० ॥ कीं एक प्रकारच असता । प्रकार दुसरा न दिसता । तरी भगवंत नेमून बोलता । परी कोणी प्रकार दुसरा न वाखाणिती.॥२०१॥ कीं पुन:पुन्हा सृष्टि होत आली। हे न कळे कधीं झाली। प्रपंचानादित्वाची बोली। बहुतांस्थळीं बोलिली असे मागें. ॥ २०२ ॥ पुढेंही हा प्रवाह । अखंड ऐसा निर्वाह । हा प्रकृतिपुरुषांचा विवाह । आद्यंतावेगळा. ॥ २०३ ॥ हा एक कालकृत । सर्वेही वर्णिती आदि अंत । दुसरा न बोलती, तरी भगवंत । नेमूनी एकचीं बोलेना. ॥ २०४ ॥ दुसरा जो देशकृत । तो विरळा निषेधिती आदि अंत । कीं ब्रह्मांड सप्तमावरणपर्यंत । बुद्धि चाळितां त्यापुढें गवसेना. ॥ २०५ ॥ उंबराचा वृक्ष एक । फळें उंबरें ज्याचीं अनेक । त्या फळांतील जे कीटक । त्यास फळ दुसरें दिसेना. ॥ २०६ ॥ आतां ज्यांस शास्त्रदृष्टि आणि अनुभव । ते अनुभविती हें वैभव । वेदीं पुराणीं हें अभिनव । वर्णिलेंची असे. ॥ २०७ ॥ श्रीमद्भागवतीं । वत्सापहरणीं ब्रह्मस्तुती । त्या स्तुतींत देवांप्रती । ब्रह्मा वदे हा श्लोक. ॥ २०८ ॥

**क्वाहं तमोमहदहंखचराग्निवार्भूसंवेष्टितांडघटसप्तवितस्तिकायः ॥**
**क्वेदृग्विधाविगणितांडपराणुचर्यावाताध्वरोमविवरस्य च ते महत्त्वम् ॥**

ब्रह्मा म्हणे, मी किती? । एक ब्रह्मांड सात विती । तो देह माझा इतकी स्थिती । माझी सातां आवरणांसमवेत. ॥ २०९ ॥ कीं थोर अथवा लहान । हात विनी त्याचिया त्यासमान । साडेतीन हात मान । त्याच्या हातें तयाचें. ॥ २१० ॥ हाताच्या दोन्ही विती । सातं ऐशा विती होती । जे आपला देह मोजिती । तो सात विती त्यांच्या वितीनें. ॥ २११ ॥ ब्रह्मांड सगळें ये रीती । देह ब्रह्मयाचा सात विती । सातां आवरणांसहित ऐसीं किती । वत्सापहरणीं देखिलीं चतुर्मुखें? ॥ २१२ ॥ वत्सें मुलें जीं जैशीं नेलीं । तैशीं तितकीं रूपें आपलीं केलीं । वर्ष भरां तितकीं देखिलीं । चतुर्मुखें. ॥ २१३ ॥ वत्सें मुलें जीं जैशीं नेलीं । तैशीं तितकीं रूपें आपलीं केलीं । वर्षभरां तितकीं देखिलीं । भगवद्रूपें ब्रह्मयानें. ॥ २१४ ॥ पावे शृंगिया अलंकार । एक एक भगवदाकार । चतुर्भुज शंखचक्रगदाधर । एक एक मूर्ती. ॥ २१५ ॥

एका एका रूपापाशीं । देखे एक एक चतुर्मुखासी । तें देखोनी या लोकीं गोष्टी ऐसी । ब्रह्मा बोलतो. ॥ २१६ ॥ कीं ब्रह्मांड माझें शरीर । परी तूं ऐसा सर्वेश्वर । कीं एक एक तुझे रोमविवर । अनंत ब्रह्मांडें, त्यामध्यें. ॥ २१७ ॥ ब्रह्मा यास दृष्टांत । बोले तें वर्णितां असे अत्यंत । वामनरूपेंच भगवंत । टीकाकार या स्तुतीचाही. ॥ २१८ ॥ इतकेंच बोलणें प्रस्तुत । कीं ब्रह्मांडें ऐसीं अनंत । तीं कोठोनी कोठपर्यंत । ऐसा देशकृतही आदि अंत असेना. ॥ २१९ ॥ ऐसीच भागवतीं । दशमीं शेवटीं वेदस्तुती । तेथें ऐसें बोलिल्या श्रुती । कीं आकाशीं रेणु इतकीं ब्रह्मांडें. ॥ २२० ॥ तीं होती एकेची काळीं । एकदांच लय पावती केवळीं । असती तों नभीं उडतां धुळी । रेणु जितके, तितकीं ब्रह्मांडें. ॥ २२१ ॥ ते वेदस्तुतीचे श्लोक । अनादि अलौकिक । भेद जाणती लोक । तैसे नसती. ॥ २२२ ॥ अर्थ त्यांचा बहु सखोल । अर्थ बहुत, अल्प बोल । त्या श्लोकांतील जो शेवटील । हें प्रमेय त्याच्या तीं चरणीं. ॥ २२३ ॥

> द्युपतय एव ते न ययुरंतमनंततया
> त्वमपि यदंतरांडनिचया ननु सावरणाः ।
> ख इव रजांसि वांति वयसा सह यच्छ्रुतय-
> स्त्वयि हि फलंत्यतन्निरसनेन भवन्निधनाः ॥

श्रुति म्हणती, तूं अनंत । स्वर्गादिपतिही न पावले तुझा अंत । आणि तूं सर्वज्ञ भगवंत । परी अंत आपला न जाणसी. ॥ २२४ ॥ तरी सर्वज्ञता गेली यावरूनी । शंका ऐसी होते म्हणोनी । श्रुति म्हणती अनंतत्वेंकरूनी । तूंही न जाणसी तुझा अंत. ॥ २२५ ॥ कीं देखिलें सर्वही । आणि वंध्यापुत्र देखिला नाहीं । तरी न म्हणवे तयातें कांहीं । कीं सर्वदर्शी हा नव्हे. ॥२२६॥ एवं तूं अनंत । म्हणूनी नाहींच जो अंत । तो न जाणतां तूं भगवंत । सर्वज्ञ नव्हेसी म्हणवेना. ॥ २२७ ॥ याकारणें अंत नाहीं म्हणोनी । तूं अनंत नेणसी अंत अनंतत्वेंकरूनी । सिद्ध जालें यावरूनी । अनंतत्व. ॥ २२८ ॥ परी हें लागे निर्गुणीं । अनंतत्व न घडे जेव्हां सगुणीं । तेव्हां सगुणास आणी । अंतवंतपण लागेल. ॥२२९॥ तरी तें सगुण साक्षी । साक्षित्व तरी दृश्य कक्षीं । दृश्यास अंत ज्या पक्षीं । अंत साक्षित्वासही लेखावा. ॥ २३० ॥ साक्षित्व बोलावें जेथवरी । दृश्य मानावें तेथवरी । साक्षी अनंत तरी, कीं जरी ।

१. वामनपंडितांनी ब्रह्मस्तुतीवर मराठींत श्लोकबद्ध टीका केलेली आहे.

त्र्यमही असे अनंत. ॥ २३१ ॥ म्हणूनी म्हणती श्रुती । कीं ब्रह्मांडपंक्ति अनंत तुजमाजीं असती । आवरणासहित जी! जगत्पतीं ! । कोटि अनंत ब्रह्मांडांच्या तुजमध्यें. ॥ २३२ ॥ त्या अंडसमूहांची गणना । श्रुति • म्हणती करवेना । रज धुळीचे उडतां नाना । नभीं जैसे. ॥ २३३ ॥ ऐसें बोलिल्या श्रुती । परी शंकित जाल्या मागुती । कीं देह मरती, एक उपजती । तैसीं कोणी क्षणी मा-नितील ब्रह्मांडें. ॥ २३४ ॥ जे वदावी वैखरी । ते अबाधित आणि खरी । ती वैखरी नव्हे खरी । जे बाधित आणि अनृत. ॥२३५॥ म्हणौनी सर्व जनसंमत । तेंची बोलणें बोलती संत । वेदवाणी तों अत्यंत । वचनें सर्वज्ञ सर्वेश्वराचीं. ॥ २३६ ॥ जेव्हां ब्रह्मप्रलय । तेव्हां योगनिद्रा करी अव्यय । साक्षित्वाचा • प्रत्यय । तेव्हां नसे. ॥२३७॥ कांहीं ब्रह्मांडें नासती । आणि कांहीं असती । तेव्हां योग-निद्रेची स्थिती । वेद वदती ते घडेना. ॥ २३८ ॥ कीं उरलियाचें साक्षिपण । तोंवरी जागृत म्हणावा सगुण । योगनिद्रेची खूण । ऐसी कीं तेव्हां निर्गुणीं असेना. ॥ २३९ ॥ सरे योगनिद्रेचा अवसर । जागा होय साक्षी ईश्वर । तेव्हां अनंत ब्रह्मांडें चराचर । करी, पाळी, गिळी, एकसरें. ॥ २४० ॥ नसे सृष्टिसमयापूर्वीं कांहीं । आणि कांहीं लयानंतर उरत नाहीं । यास्तव अनंत ब्रह्मांडांसही । सृष्टि, स्थिति, प्रलय, एकसरें. ॥ २४१ ॥ या गोष्टीस नये विरोध । ऐसा करूनी दीर्घ दृष्टि शोध । श्रुति बोलती रहस्यबोध । कीं सांगा-तेंची ऐसीं ब्रह्मांडें एकाच काळेंकरूनी. ॥ २४२ ॥ म्हणिजे एका ब्रह्मांडाचा लय । तेव्हां सर्वांचाही व्यय । उरसी तूंची निर्गुण अद्वय । ते सगुणपणाची योगनिद्रा.॥२४३॥ पुन्हा मायेचा अंकुर । अधिष्ठानबीजापासूनी होतां, ईश्वर । सृष्टिसंकल्प करितां, निरंतर । ब्रह्मांडपंक्ति उपजती. ॥ २४४ ॥ सांगातेंची सर्वही होती । सांगातेंची असती । सांगातेंची लय पावती । काळेंकरूनी सर्वदा. ॥ २४५ ॥ एवं स्वरूपें अनंत जैसा । साक्षित्वेंही अनंत तैसा । दृश्य प्रपंचही ऐसा । वर्णिला अनंतत्वें. ॥ २४६ ॥ दृश्य तोंवरी द्रष्टृत्व । आणि तेथवरी सा-क्षित्व । या दोहींस अनंतत्व । कीं अधिष्ठानरूप विवर्तही. ॥ २४७ ॥ सत्त्वयुक्त त्या विवर्ताचा द्रष्टा । त्रिगुणविवर्तोचा स्रष्टा । तरीच प्रस्तुतीं गीतेचा उपदेष्टा । "नांतो नचादिर्नच संप्रतिष्ठा" म्हणतसे. ॥२४८॥ आदि अंत नसोनी । प्रतिष्ठाही नाहीं म्हणोनी । बोले भगवंत यावरूनी । विवर्तपण बोले प्रपंचवृ-क्षाचें. ॥ २४९ ॥ कीं प्रतिष्ठा रज्जूस असे । तैसी मिथ्या भुजंगातें नसे । जें नसोनी इतरांच्या आश्रयें दिसे । प्रतिष्ठा कैंची तयाला ? ॥ २५० ॥ अश्वत्थ हा यावरूनी । विवर्त जाणावा म्हणोनी । बोलिला भगवंत ये रीतीकरूनी ।

कीं प्रतिष्ठाही याला नसे. ॥ २५१ ॥ ऐसा अश्वत्थ वर्णिला । तो वर्णितां चांगला वाटला । परी हा दुःखरूपची नव्हे भला । नाहींसा होय तरी बरें. ॥२५२॥ म्हणोनी याउपरी येथूनी । याच्या उत्तरार्धांपासूनी । हा छेदावा ज्या शस्त्रेंकरूनी । तें आर्धीं बोलतो उत्तरार्धें. ॥ २५३ ॥

उत्तरार्धः—अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्वा ॥

अगा! हा अश्वत्थ ये रीती । मूळें ज्याचीं पसरलीं असती । जीं लिंगदेहरूपें तुजप्रती । "कर्मानुबंधीनि मनुष्यलोके" म्हणूनी पूर्वश्लोकीं बोलिलों. ॥ २५४ ॥ तीं मूळें जों जों कर्मबंध होती । तों तों चौऱ्याशीं लक्ष रूपें पसरती । हा अश्वत्थ जो ये रीती । तो असंगशस्त्रें छेदावा. ॥२५५॥ त्यास छेदावया शस्त्र । एकची बोले मोक्षशास्त्र । जो मेघश्याम विद्युद्वस्त्र[1] । आत्मज्ञान या शास्त्रीं उपदेशितो. ॥ २५६ ॥ नाम त्या शस्त्राचें असंग । त्या शस्त्रें म्हणे श्रीरंग । अश्वत्थ हा छेदावा, कीं भंग । याचा नव्हे यावांचूनी. ॥ २५७ ॥ असंग शब्दाचा अर्थ । वैराग्य म्हणती तोही यथार्थ । परी या प्रसंगीं होतो व्यर्थ । कीं हा न छेदवे ज्ञानावांचूनी. ॥ २५८ ॥ सर्वही सोडिला संग । तरी देह आपण हाची प्रसंग । तेव्हां मुख्य संग आपलें अंग । अज्ञ निःसंग कैसा म्हणावा? ॥ २५९ ॥ शब्दज्ञानेंकरूनी । आणि मृतशरीरीं आत्मत्व न दिसे यावरूनी । म्हणेल मी देह नव्हे म्हणोनी । परी मी म्हणे हा अहंकार मागुती सुटेना. ॥ २६० ॥ देहावेगळा मी म्हणे । परी त्या मीपणाचा द्रष्टा वेगळा कैसा? हें नेणे । त्यास कैंवी म्हणती शाहणे । 'हा असंग' म्हणोनी? ॥२६१॥ आतां ऐसा अज्ञही असला । आणि ममतास्पद संग सोडिला । तोही असंगची मानिला । परी कामा नये तो येथें. ॥ २६२ ॥ कीं फोडावया नेत्र । पुरे गवताची काडी मात्र । त्या काडीस म्हणों ये शस्त्र । कीं रक्त काढी फोडोनी नेत्रातें. ॥२६३॥ परंतु सुविरूढमूल । साधारण ऐसा जरी पिंपळ । तो छेदावयाचा प्रसंग करी कोणी कुशळ । तेथें काडी कैसी शस्त्र होते? ॥ २६४ ॥ हा सुविरूढमूल । छेदावया प्रपंचपिंपळ । शस्त्र आत्मज्ञानावेगळ । कामाच नये. ॥ २६५ ॥ जो जीवोपाधीवेगळा । तोची असंगशस्त्रें या पिंपळा । छेदील येथें पांडित्यकळा । व्यर्थ सकळा होतील आणिकी. ॥ २६६॥ ज्या जीवोपाधीनें संसार । तो छेदिजे अहंकार । त्यापरता चिदात्मा त्याचा साक्षात्कार । तरी तो म्हणावा असंग मुक्त अहंसंगापासूनी. ॥ २६७ ॥ तो असंगसंगापासूनी ।

१. विजेप्रमाणें (तेजस्वी व पिंवळें) वस्त्र ज्याचें असा, पीतांबरधारी, कृष्ण.

सुटला म्हणावा ज्ञानी । ज्ञान तें त्याचें शस्त्र, जेणेंकरूनी । छेदिला प्रपंच अश्वत्थ. ॥ २६८ ॥ एवं असंगशस्त्र म्हणिजे ज्ञानेंकरूनी । अथवा असंगाचें शस्त्र त्या शस्त्रें[1] छेदूनी । म्हणिजे असंगाचें शस्त्र आत्मज्ञान, त्या ज्ञानेंची.म्हणोनी । अर्थ होतो. ॥ २६९ ॥ असंगची शस्त्र म्हणिजे ज्ञान स्वयें । अथवा असंग ज्ञानियाचें शस्त्र यांही निर्णयें । शस्त्र ज्ञानची निश्चयें । एवं ज्ञानची असंगशस्त्र जाणावें. ॥ २७० ॥ जो जडावेगळा जाला । अश्वत्थ त्याणें छेदिला । मूळ छेदूनी पाडिला । जो जाला स्वयें ब्रह्म, जें ऊर्ध्व. ॥ २७१ ॥ अनादि ऊर्ध्व तें जें केवळ । त्या केवळीं अश्वत्थमूळ । मायेवेगळें ओळखिलें निष्फळ । अश्वत्थमूळ ते माया तेव्हां छेदिली. ॥ २७२॥ ऐसा असंगशस्त्राचा निर्णय । परंतु उत्तरश्लोकीं उपजतो संशय । कीं अश्वत्थ तोडूनी पद अद्वय । देव म्हणेल धुडावें. ॥ २७३ ॥ त्या विरोधभयेंकरूनी । असंगशस्त्र ज्ञान नव्हे म्हणोनी । वाखाणितां, अश्वत्थछेदनीं । समर्थ नव्हे इतर शस्त्र. ॥ २७४ ॥ याचा विरोधपरिहार । हाची कीं ज्ञानाचे दोनी प्रकार । व्यतिरेक, अन्वय, दोंपरी निर्धार । अद्वैत तत्त्वाचा. ॥ २७५ ॥ त्यांत अश्वत्थाचा छेद । तो विवेकें जडचैतन्याचा वदे भेद । मग जडा अश्वत्थामध्यें धुंडणें पद । अन्वयबोध तो म्हणावा. ॥ २७६ ॥ व्यतिरेकें आधीं चैतन्य । जडावेगळें समजती ते धन्य । मग जड जे वेगळें वाटे अन्य । त्यांत पद धुंडितां, अनन्य मग तेंही. ॥ २७७ ॥ याकारणें असंगशस्त्रेंकरूनी । अश्वत्थ हा छेदूनी । मग काय करावें तें येथूनी । बोलेल आतां या श्लोकीं. ॥ २७८ ॥

पूर्वार्धः—**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तंति भूयः ।**

अगा! असंगशस्त्रें छेद । करूनी अश्वत्थाचा, तें पद । त्याच अश्वत्थामध्यें धुंडावें म्हणे गोविंद । तें पद म्हणिजे जें पूर्वी बोलिलें. ॥ २७९ ॥ कीं अहंकारादि संग । तोची अश्वत्थ जो ज्ञानावीण अभंग । तो छेदूनी तें धुंडावें म्हणतां आला प्रसंग । पूर्वश्लोकीं ओळखिलें व्यतिरेकें तयाच्या. ॥ २८० ॥ कीं असंगशस्त्रें तेव्हां छेदिला । जेव्हां असंग आत्मा ओळखिला । या अर्थी तें पद म्हणूनी बोलिला । धुंडावे म्हणूनी या श्लोकीं. ॥ २८१ ॥ अगा! जें पद । ओळखिलें करितां अश्वत्थाचा छेद । तें पद त्याचमध्यें म्हणे गोविंद । धुंडावें त्याउपरि म्हणोनी. ॥ २८२ ॥ कीं अश्वत्थ नश्वर । कार्यपणीं म्हणूनी सर्वेश्वर । आधीं बोलोनी मग परात्पर । कारणपणीं अन्वय बोलिला. ॥ २८३ ॥ तें कारण उपादान । शुद्ध ज्ञान त्याचेंही ज्ञान । त्याचमध्यें व्हावें

---

१. 'वेद' असा पाठ आढळतो. २. चैतन्य पद.

ऐसें व्याख्यान । "ततः पदं तत्परिमार्गितव्यं" या चरणाचें. ॥ २८४ ॥ की आधीं गुरुवर । जडावेगळा आत्मा परात्पर । उपदेशी मग अन्वयें कृपासागर । तोची आत्मा दाखवी त्या जडींही. ॥ २८५ ॥ त्यां क्रमेंकरूनी । म्हणे असंगशस्त्रें छेदूनी । जें ओळखिलें अश्वत्थच्छेदनीं । तें पद त्याउपरी त्यामध्यें धुंडावें, ॥ २८६ ॥ तें धुंडुनी काय फळ ? । तरी म्हणे मेघश्यामळ । कीं ज्यामाजी पावले ते तेंची जाले केवळ । त्यामधूनी मागुती न फिरती. ॥ २८७ ॥ ऐसें याच्या प्रातीचें फळ । तें धुंडावें केवळ । छेदूनी जड पिंपळ । त्यामध्यें. ॥ २८८ ॥ आधीं जडावेगळें केलें । तें जाणों छेदूनी 'पाडिलें । मग त्या जडामध्येंच धुंडिलें । क्रमदृष्टांतीं ये रीती. ॥२८९॥ दृष्टांतावरूनी । दार्ष्टांतिकीं त्याचमध्यें धुंडावें म्हणोनी । बोलिजेतें कीं अश्वत्थांत धुंडिल्यावांचूनी । तत्त्व न सांपडे अद्वैत. ॥ २९० ॥ प्रथमश्लोकीं चतुर्थचरणीं । "यस्तं वेद स वेदवित्" म्हणे चक्रपाणी । कीं त्या अश्वत्थातें जाणे, तोची वेदज्ञाणी । जाणे म्हणावा अनुभवें. ॥ २९१ ॥ तरी पट ओळखिला त्याणें । पटींच तंतु ओळखिला ज्याणें । तो तंतु ओळखिला कोणें । पटाचमध्यें न धुंडितां. ॥ २९२ ॥ घट ओळखिला त्याणें । घटींच माती ओळखिली ज्याणें । तो घटाकार तत्त्वें ओळखिला कोणें । काय घटामध्यें न धुंडितां ? ॥ २९३ ॥ तंतु आधीं ओळखावा । मग पटीं तोची देखावा । तेव्हां वेगळा ओळखिला तोची लेखावा । तंतु पटीं तरी ओळखिला पटांत. ॥ २९४ ॥ उदक ओळखावें केवळ । मग तरंगीं धुंडावें तें जळ । तैसा आत्मा ओळखावा, प्रपंचपिंपळ । छेदूनी, मग त्याच प्रपंचीं तो धुंडावा. ॥ २९५ ॥ यालागीं दृष्टांत । येविषयीं येती बहुत । एवंच तें पद धुंडावें त्याच अश्वत्थांत । जें सांपडलें असंगशस्त्रें छेदितां. ॥ २९६ ॥ ऐसें अश्वत्थाचें छेदणें । आणि त्यांत तें पद धुंडणें । अद्वैतबोधाकारणें । व्यतिरेक अन्वय ऐसे बोलिले. ॥ २९७ ॥ कीं वेगळें जड ओळखिलें । तथापि द्वैतरूपें राहिलें । मिथ्या म्हणोनी मानिलें । काय समजोनी ? ॥ २९८ ॥ मिथ्या सर्प, रज्जु खरा । परंतु तरी रज्जु दृष्टीं पडे बरा । उगाची मिथ्या म्हणेल त्या नरा । कळलें नाहीं म्हणावें मिथ्यात्व. ॥ २९९ ॥ एवंच आधीं पाहावी दसोडी । मग तंतु सत्य, मिथ्या पासोडी । तंतु ओळखोनियां सुघडी । पटाभास मिथ्या मानावा. ॥ ३०० ॥ एवं अश्वत्थ ऐसा छेदुनी । म्हणजे आधीं वेगळें आत्मत्व ओळखोनी । मग त्याच वृक्षीं तेंच पद धुंडावें म्हणोनी । अन्वयबोधप्रकार दाखविला. ॥ ३०१ ॥ ऐसें धुंडितां पद । सांपडे सच्चिदानंद । तें

प्राप्त होतां कोण फळ? तें गोविंद । सांगे कीं "यस्मिन् गता न निवर्तंति भूयः" ॥ ३०२ ॥ कीं ज्या पदीं जे पावले । ते पुनरपि नाहीं परतले । सागरीं मिळाले ते काय आले । परतूनि ओघ गंगेचे?[1] ॥ ३०३ ॥ ऐसी ज्याची प्राप्ती । ज्यास पावतां नसे पुनरावृत्ती । तें पद अगा! सुभद्रापती! । छेदूनी अश्वत्थ, मग त्यांतही तेंची धुंडावे. ॥ ३०४ ॥ आतां ऐसें जे धुंडणार । त्यांचे दोनी प्रकार । एक निर्गुण जाणोनी सगुण सोडणार । एक सर्वभावें भजणार सगुणातें. ॥ ३०५ ॥ त्यांत जे भजणार नुसते निर्गुण । ते धुंडिती नुसतें निर्गुणपण । ज्यांस नाहीं सोडणें सगुण । ते सगुणत्वेंची निर्गुण धुंडिती. ॥ ३०६ ॥ तरी धुडणें निर्गुणाचे । सिद्ध जालेंची साचें । जेव्हां कार्यात कारणाचे । धुडणें बोलिलें अतिस्पष्ट. ॥ ३०७ ॥ आतां धुडावें कैसें सगुण । ते सगुणपण वाखाणावया म्हूण । बोलेल सर्वज्ञ निपुण । उत्तरार्धी. ॥ ३०८ ॥

उत्तरार्ध—**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥**

"तो त्याच आद्य पुरुषाते । मी पावेन म्हणे सगुणाते । आद्य म्हणावे त्यातें । कीं आदिकाळीं आधीं प्रगटतो. ॥ ३०९ ॥ भाऊ दहा सहोदर असती । त्यांत वडिलास आद्य म्हणती । कीं मातेपासूनी प्रसूती । आधीं ज्याची, तो आद्य. ॥ ३१० ॥ ब्रह्मीं मायेचा उगम । होता ते निर्गुणच सगुण ब्रह्म । आदिकाळीं आधीं प्रगटे परम । तो आद्य अनादि निर्गुणची, परी सगुण ऐसा. ॥ ३११ ॥ अनादि म्हणावे निर्गुण । तेंची आद्य म्हणावें, होतां सगुण । की अधिष्ठूनी मायेचा सत्त्वगुण । आधीं सगुण जगत्कारण प्रगटतें. ॥ ३१२ ॥ दशमीं बोलता विभूती । "न मे विदुः सुरगणाः प्रभवं" या श्लोकीं श्रीपती । म्हणे माझा प्रादुर्भाव कोणी न जाणती । तो आद्य जगत्कारण. ॥ ३१३ ॥ त्यापासूनी जीवोपाधी । नी पुरें, त्या पुरीं प्रवेशतो आधीं । तो पुरुष हा अर्थ साधी । आद्यशब्दापुढें पुरुषशब्दें. ॥ ३१४ ॥ "तमेव" म्हणजे त्यातेंची आपण । पावेन जो पुरुष आद्य सगुण । तरी तो न कळे न कळतां निर्गुण । म्हणोनी म्हणतो "तमेव च" म्हणोनी. ॥ ३१५ ॥ चकारे एवाक्षरेंकरूनी । निर्गुणातेही म्हणोनी । म्हणे कीं निर्गुण चैतन्येंकरूनी । पावेन त्याच सगुणातें. ॥ ३१६ ॥ आधीं चैतन्य आत्मत्वें कळे जरी । सगुणभक्तीही घडे तरी । कीं प्रीति एकची खरी । आत्मवाची. ॥ ३१७ ॥ तो आत्माच सर्वेश्वर । ऐसें ओळखेल जेव्हां नर ।

---

१. अ० १०, श्लो० २.

तेव्हां अद्वैतभक्ति प्रेमादर । यालागीं निर्गुण पावोनी सगुण पावेल; म्हणतसे. ॥ ३१८ ॥ तरी या अश्वत्थामध्यें तो निर्गुण । यांत कैसा धुंडावा? आणि पावावा सगुण? ।.तरी त्या सगुणा जगत्कारणाची खूण.। चतुर्थचरणीं बोलतसे. ॥ ३१९ ॥

चतुर्थचरण—**यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ।**

ज्या जगत्कारणसगुणापासूनी । प्रवृत्ति हे पसरली पुराणी । नटापासूनी सोंग ये रीतीकरूनी । ज्या ईश्वरापासुनी अनादि प्रवृत्ति हे ॥ ३२० ॥ मायेची जितकी प्रवृत्ती । ते शुद्ध सत्त्वोपाधी ईश्वराची कल्पनावृत्ती । यावरूनी अर्थाची प्रवृत्ती शब्दाची ये रीतीं । कीं ईश्वराची प्रकृष्ट कल्पना. ॥ ३२१ ॥ कल्पनारूप वृत्ती । ते ईश्वराची म्हणूनी बोलावी प्रवृत्ती । कीं सृष्टि आणि स्थिती । प्रलयही प्रकर्पे कल्पितो. ॥ ३२२ ॥ प्राकृत एक कल्पना करी । तों कल्पना उठे दुसरी । पूर्वी इच्छिली ते वरिच्या वरी । उडे नश्वर पूर्वापर. ॥ ३२३ ॥ ईश्वर यथापूर्व । कल्पी आदि मध्य अंत सर्व । लटिकें खरेंमेंची दावी हें अपूर्व । प्रकृष्ट ऐसी कल्पनावृत्ति ते प्रवृत्ती. ॥ ३२४ ॥ आतां कल्पना किमर्थ । अवाप्तकाम करितो समर्थ? । तरी तो नित्यतृप्त निष्काम यथार्थ । परी कल्पनावृत्ति प्रवृत्ति हे पुराणी. ॥ ३२५ ॥ म्हणिजे अनादि विश्वाची खाणी । सगुण सर्वेश चक्रपाणी । जेव्हां सृष्टि तेव्हां पुराणी । म्हणिजे या सृष्टीहूनीही पूर्वी होतीच हे. ॥ ३२६ ॥ हे सृष्टि ऐसी पुराणी प्रवृत्ती । म्हणिजे ईश्वराची अनादि कल्पनावृत्ती । ऐसेंची वदते श्रुती । "**धाता यथापूर्वमकल्पयत्**". ॥ ३२७ ॥ विश्व धरी तोची धाता । त्याच्या एका शक्तीनें चतुर्मुख विधाता । सृष्टि करितो म्हणोनी मुख्यत्वें रमाकांता । श्रुति बोलती. ॥ ३२८ ॥ मुख्य धाता सर्वेश्वर । तो यथापूर्वक चराचर । कल्पिता जाला ऐसें सादर । श्रुति म्हणती. ॥ ३२९ ॥ यालागीं ईश्वरकल्पना । हे चतुर्दशभुवनरचना । सगुणप्रसंगीं या वचना । वाखाणावें ये रीती. ॥ ३३० ॥ कीं प्रकृष्ट उत्कृष्ट कल्पनावृत्ती । ज्यापासूनी ऐसा आद्य जगत्पती । प्रपंचाश्वत्थीं निगुती । त्यातें पावेन म्हणोनी धुंडावें. ॥ ३३१ ॥ उगेंची धुंडावें म्हणे पूर्वार्धी । सगुणभक्तीनें धुंडावें ऐसें म्हणे उत्तरार्धी । आद्यशब्दें पुरुषशब्दें ज्ञानवृद्धी । सगुण येथें ये रीतीं जाणावें. ॥ ३३२ ॥ सगुणाची कल्पना । हे सकल अश्वत्थरचना । आपणास आपण नाना । चराचररूपें तो कल्पी. ॥ ३३३ ॥ चतुर्भुजादि हे अवतार । अवतारी तो अपाणिपाद सर्वेश्वर । तो

स्वयें होतसे चराचर । आपण आपणातें कल्पूनी. ॥ ३३४ ॥ पुरुष आपणातें आपण सचेतन । जनदृष्टी दाखवी काष्ठरूपें अचेतन । तैसा नित्य चित्स्फूर्ति जगज्जीवन । जड प्रपंचरूपें कल्पूनी दाखवी जीवातें. ॥ ३३५ ॥ पुरुष वाटला स्तंभ । परी तो पुरुषची आहे स्वयंभ । ऐसा प्रपंचरूपें श्रीवल्लभ । कल्पूनी दावी आपणातें. ॥ ३३६ ॥ सृष्टिकाळीं तो अरूप । ज्यास अखंड आपण चित्स्वरूप । ऐसा प्रत्यय तोची नानारूप । आपण आपणातें कल्पितो. ॥ ३३७ ॥ आधीं पद्मनाभमूर्ती । होतां आद्य सगुण चित्स्फूर्ती । त्यापासूनी आपणची आकृती । चतुर्मुखत्वें आपणातें कल्पितो. ॥ ३३८ ॥ त्यापासूनी कल्पना । मानस सनकादि पुत्र नाना । स्वायंभुव मनु, शतरूपा, या मिथुना । मनंची ब्रह्मा कल्पितो. ॥ ३३९ ॥ ब्रह्मयास कैचें वेगळेपण । त्या रूपें आपणातें आपण । कल्पूनी मनु चतुर्दश सगुण । स्वयेंची स्वायंभुव मनु, शतरूपा स्त्री, होतसे. ॥ ३४० ॥ येथवरी मानसकल्पना । वेदप्रसिद्ध सृष्टिरचना । मग शुक्रशोणितद्वारा जना । उत्पत्ति तेही तैसीच. ॥ ३४१ ॥ तैसाच धान्यरूपेंकरूनी । आपणास आपण कल्पूनी । स्त्रीपुरुषरूपें अन्नें भक्षूनी । स्वयेंची शुक्र शोणित कल्पूनी होतसे. ॥ ३४२ ॥ स्वयेंची शुक्र-शोणित । स्वयेंची गर्भी असे वाढत । स्वयें प्रगटतो अत्यंत । ज्या स्वरूपें, तेंही भगवंत कल्पूनी आपण होतसे. ॥ ३४३ ॥ आत्मस्वरूपीं स्फुरणें मन । करी नाना रूपाचें चिंतन । ऐसाची चिच्छक्तीकरूनी निरंजन । कल्पितो सर्वही. ॥ ३४४ ॥ स्वयेंची जीवांची वासना । स्वयेंची वासनारूपें कर्मे नाना । स्वयेंची त्यांची फळरचना । स्वयेंची जन्म, स्वयेंची त्याचें मरणही. ॥ ३४५ ॥ स्वयें मन, स्वयें वासना । स्वयेंची कर्म, स्वयेंची फलभोग नाना । प्रवृत्ति, निवृत्ति, फलरचना । स्वयेंची जाला सकळही. ॥ ३४६ ॥ त्या वासनेनें मन । जें करी, जें पावे, तें तो जगज्जीवन । म्हणोनां मागुती करुणाघन । विषम नव्हे कोठेही. ॥ ३४७ ॥ इत्यादि कल्पनावृत्ती । ती प्रकर्षे प्रवृत्ती । ज्यापासूनी त्यास पावेन ऐसी वृत्ती । करूनी त्यास धुडावें. ॥ ३४८ ॥ ऐसें सगुणची सकळ । हें नवमीं वर्णिलें प्रांजळ । येथें अनुकारमात्र बोलिलें कीं निवळ । सगुणपर वाक्यार्थ समजावे. ॥ ३४९ ॥ एवंच जडीं चैतन्य । योगी भक्त पाहती धन्य । तेंची निर्गुण तेथेंही अन्यत्वीं अनन्य । त्याची स्फूर्तीनें सगुणातें पाहती. ॥३५०॥ नसोनी भासे जड आकार । तोची सगुण,

१. मनःप्रेरणेनें उद्भवलेले. २. हें स्वायंभुव मनूच्या स्त्रीचें नांव. ३. जोडप्याला. ४. रेत व रक्त यांच्या योगानें. ५. 'त्या' असा पाठ आढळतो.

तोची त्याचा कल्पनाप्रकार । भक्त भजती सगुण साकार । सर्वत्र या अनुभवें-करूनी. ॥ ३५१ ॥ जे इतर टीकाकार । ज्यांस सगुणीं अनादर । त्यांस येथें निर्गुणत्वें निर्धार । वाटतो, तो सुखें वाटो. ॥ ३५२ ॥ या श्लोकीं पूर्वार्धपर्यंत । आपलेंची बोलिला भगवंत । उत्तरार्धे सगुणभक्तियुक्त अत्यंत । बोलणें त्याचें वर्णिलें. ॥ ३५३ ॥ कीं त्या आद्या पुरुषा पावेन । सर्वात्मभावें शरण धांवेन । हें त्याच्या भावनेचें वचन । कीं जो, छेदूनी अश्वत्थ, पद धुंडितो. ॥ ३५४ ॥ त्यांत *निर्गुणोपासक । त्यांस पावणें निर्गुणची एक । सगुण सेविती ज्ञानी सगुणसेवक । त्यांचें वचन या अर्थी बोलिलें. ॥ ३५५ ॥ आतां जे ऐसे सज्जन । त्यांचीं लक्षणें भवभंजन । बोलतसे हें केवळ आपलेंची वचन । या श्लोकीं. ॥ ३५६ ॥

**निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।**
**द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥**

अगा ! ते **निर्मान** । म्हणजे निरभिमान । अहंकारमूल अभिमान । निर्मा-नशब्दें निरहंकारी. ॥ ३५७ ॥ ज्यांस नाहीं अहंता । त्यांस कैंची ममता ? । म्हणोनी म्हणे पांडुसुता । ते **निर्मोह** म्हणोनी. ॥ ३५८ ॥ मोह अविवेक । न कळे आपपरविवेक । जडदेह आणि आपण एक । तत्संबंधी आपलीं. ॥ ३५९ ॥ इत्यादि मोहाचे विकार । यावेगळे ते निर्विकार । परंतु तरी हे साजती इतके प्रकार । कीं जरी विषयवासना असेना. ॥ ३६० ॥ तरी ते पुरुष । "**जितसंगदोष**" । म्हणे परमपुरुष । कीं वासनादोष जिंकिले. ॥ ३६१ ॥ **संग** म्हणजे विषयसंग । मनीं विषयवासनाप्रसंग । या संगाचा होतां भंग । दोष नासती सकळही. ॥ ३६२ ॥ प्रबळ वैरिया मारणें । तोची जय, तेंची त्यानें जिंकणें । या भावें बोलिलें नारायणें । "**जितसंगदोषा**" म्हणोनी. ॥ ३६३ ॥ तगीच "**विनिवृत्तकाम**" । म्हणजे गेला ज्यांचा काम । आणि '**द्वंद्वें**' म्हणोनी ज्यांचें नाम । त्या सर्वांपासूनी सुटले. ॥ ३६४ ॥ त्या द्वंद्वांचें लक्षण । सुखदुःख संज्ञितें कमलेक्षण । एकांत सुख, एकांत दुःख, ऐसीं विलक्षण । एक एक द्वंद्वजोडा ये रीतीं. ॥ ३६५ ॥ सुखसंज्ञित वाटे मान । दुःखसंज्ञित वाटे अपमान । दोंवेगळें होतां समाधान । ते सुटले त्यापासूनी. ॥ ३६६ ॥ लाभ सुखसंज्ञित । हानि दुःखसंज्ञित । ते सुटले म्हणे भगवंत । दोहींपासूनी. ॥ ३६७ ॥ सुखसंज्ञित जय । दुःखसंज्ञित अपजय । त्यांस दोन्ही नसती [illegible] ं. ॥ ३६८ ॥ इत्यादि

द्वंद्ववृंद । त्यापासूनी सुटले ते म्हणे मुकुंद । एकची सुखसंज्ञित भाविती मंद । त्यांस लागलेंच दुसरें लागलें. ॥ ३६९ ॥ शुक्ल पक्ष वाटे चांगला । तों सवेंची कृष्ण पक्ष लागला । जो सन्मानेंची वागला । तो भिऊं तरी लागला अपमाना. ॥ ३७० ॥ कांहीं लाभ होतां । हानि त्याची न हो आतां । म्हणोनी लागलीच चिंता । वाटतां लाभसुख. ॥ ३७१ ॥ इत्यादि विवरण । सुचवी जगद्वंद्यचरण । परी म्हणे प्रस्तुतीं कारण । कीं ते सुटले द्वंद्वापासुनी. ॥ ३७२ ॥ ऐसीं त्यांचीं लक्षणें । तीं चरणीं वर्णिलीं कमलेक्षणें । त्यांतें अध्यात्म म्हणोनि नारायणें । जें बोलिलें, राहिलें तें एक. ॥ ३७३ ॥ कीं इतके दोष ज्यांचे गेले । ते कोण्या सुखें निवाले? । कोणत्या रसें नाशिले । हे रोग ?- ॥३७४॥ तरी अध्यात्मनिष्ठा । नित्य त्यांसीं पावली प्रतिष्ठा । इतरनिष्ठाप्रतिष्ठा विष्ठा । मानिली जिहीं. ॥ ३७५ ॥ ऐसे ते अमूढ । असंगशस्त्र ज्यांचें दृढ । ते होती आरूढ । त्या अद्वय पदीं. ॥ ३७६ ॥ होतां ब्रह्मांडकोटींचा प्रलय । पदार्थमात्राचा होतां लय । ज्या पदीं नव्हे व्यय तें अव्यय । हें पूर्वाध्यायारंभीं श्लोकीं दुसरिया बोलिला. ॥ ३७७ ॥ कीं जेथें माझे साधर्म्य । पावले माझा समान धर्म । त्यांचे तुज सांगितलें वर्म । कीं "प्रलये न व्यथंति ते"[1] ॥ ३७८ ॥ जेथें नव्हे प्राप्तीचा व्यय । होतांही महाप्रलय । ते पद म्हणावें अव्यय । त्या पदातें पावती. ॥ ३७९ ॥ ते पद म्हणतां पूर्वोक्त । ज्यास पावती ज्ञानी भक्त । ज्या पदीं माझ्या साधर्म्येंकरूनी युक्त । व्यय न पावती, होतां व्यय जगाचा. ॥ ३८० ॥ तें त्रिगुणसृष्टीवेगळें पद । म्हणोनी आणखी विशद । बोलतसे मुकुंद । आतां या श्लोकीं. ॥ ३८१ ॥

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।**
**यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥**

सूर्य, चंद्र, अनल, । हे न प्रकाशिती तें स्थल । ज्यातें पावले ते अचल । त्या अढळ पदीं राहती. ॥ ३८२ ॥ अगा! कोणी न परतती । जे त्या पदातें पावती । तें, म्हणे जगत्पती, । परम धाम माझें, अर्जुना! ॥ ३८३ ॥ पूर्वश्लोकीं म्हणे 'तें पद' । म्हणजे चतुर्दशीं विशद । तुज बोलिलो म्हणूनी गोविंद । तत्पदें पूर्वपरामर्श सुचवी. ॥ ३८४ ॥ त्या पदातें पावले । ते दोंपरी बोलिले । कीं सृष्टिकाळीं न उपजती, जे गेले । त्या पदातें. ॥ ३८५ ॥ आणि बोलिला कीं प्रलयीं व्यथा । ते न पावती सर्वथा । म्हणूनी त्यांत अव्य-

1. अ० १४, श्लो० २.

यपदें **पार्था** । आठवण पूर्वोक्ताची सुचविली. ॥ ३८६ ॥ आतां "**सर्गेपि नोपजायंते**" म्हणोनी । चतुर्दशीं या चरणेंकरूनी। जें बोलिला तें सुचवूनी। न परतती त्या पदापासूनी म्हणतसे. ॥ ३८७ ॥ सृष्टिकाळीं जे उपजती। तेची म्हणावे परतती । जे सृष्टिकाळीं न होती। ते न परतती, हा अर्थ. ॥ ३८८ ॥ चतुर्दशीं "**सर्गेपि नोपजायंते**" । पंचदशीं "**यद्गत्वा न निवर्तंते**" । ऐसें म्हणूनी भगवद्वाणी बोलते । पूर्वश्लोकीं 'तें' म्हणोनी. ॥३८९॥ ऐसें तें माझें धाम । कीं मी चतुर्भुज मेघश्याम । मद्रूप मुक्त आत्माराम । त्यांमध्यें तेथें राहती. ॥ ३९० ॥ आतां तें धाम माझें म्हणोनी । म्हणतां निर्गुणं या **धाम**शब्देंकरूनी । बोलतां निर्गुणाहुनी । सगुण त्यावेगळा कोण त्या धामीं म्हणावा? ॥ ३९१ ॥ एक नुसता आकाश । त्यांत सूर्याचा प्रकाश । तो जो सप्रकाश आकाश । धाम त्याचें प्रकाशच म्हणवेना. ॥ ३९२ ॥ प्रकाशयुक्त व्योम । व्योम त्याचें म्हणतां धाम । व्योम दुसरें म्हणावें ज्याचें नाम । धाम या आकाशाचें म्हणोनी. ॥ ३९३ ॥ ब्रह्म माया मिळोनी । जें सगुण त्याचें धाम म्हणोनी । म्हणतां निर्गुण अथवा सगुण कोठुनी । आणावें आतां दुसरें? ॥ ३९४ ॥ मायायुक्त एक ब्रह्म । ब्रह्मची त्याचें म्हणावें जेव्हां धाम । तेव्हां दुसरें ब्रह्म आणावें कीं सगुण परम । ब्रह्म नव्हे, ऐसें म्हणावें. ॥ ३९५ ॥ जरी मायेनेंची ईश्वरपण । म्हणावें, तरी ईश्वर सगुण म्हणों नये सगुण । कीं गुणांसहित निर्गुण । त्यातें सगुण ईश्वर ऐसें म्हणावें. ॥ ३९६ ॥ मी माया म्हणोनी । सगुण अनुभव असे, तरी यावरूनी । धाम माझें म्हणतां, या शब्देंकरूनी । ब्रह्म अधिष्ठान तिचें म्हणों ये. ॥३९७॥ आतां त्याचें तोची धाम । ऐसें बोलती निगम । तें यानिमित्त कीं अंतरहित ब्रह्म । तें असेल कोण्या धामीं आणिका? ॥ ३९८ ॥ येथें मोक्षप्राप्तीचा प्रसंग । तें धाम मीच, म्हणे श्रीरंग । म्हणे माझें धाम आणि सगुणप्रसंग अंतरंग । कां दाटूनी खटपट निर्गुणाची? ॥ ३९९ ॥ आतां वेदश्रुती । "**न तत्र सूर्यो न च चंद्रतारका**" म्हणती । त्यावरूनी येथें मती । जरी निर्गुणाकडे घालावी..॥ ४०० ॥ तरी "**न तत्र सूर्यो**" हे श्रुती । "**यस्य भासा सर्वमिदं विभाति**" । ऐसें म्हणे कीं सर्वही प्रकृती । प्रकाशे त्याच्या चित्प्रकाशें. ॥ ४०१ ॥ कीं तें स्वप्रकाश । त्यास सूर्यचंद्रादि कोणी प्रकाश । न प्रकाशिती तें सावकाश । प्रकाशी सूर्यादि सर्वांतें. ॥ ४०२ ॥ या उपदेशीं

१. अ० १४, श्लो० २.

इत्यादि श्रुती । येथें ज्ञानफळ बोलतां श्रीपती । तें माझें धाम, म्हणे, ज्यातें न प्रकाशिती । सूर्य, शशांक, पावक. ॥ ४०३ ॥ म्हणिजे तें शुद्धसत्त्वरचित । सत्त्व शुभ्र तेजोरूप निश्चित । विश्वरूप देखे कुंतीसुत । सूर्यसहस्रांसारिखें. ॥ ४०४ ॥ तें शुद्ध सत्त्वाचें धाम । तेजोरूप जेथें मी मेघश्याम । मुक्त आपणासारिखे आत्माराम । त्यांसहित त्या धामीं राहतों, भाव ऐसा. ॥ ४०५ ॥ जे सगुणमोक्षास उडविती । गळेचेपीनें जरी नित्य वाखाणिती । ते कां येथें सगुणधाम म्हणती ? । जे दाटुनी वाखाणिती अन्यथा. ॥ ४०६ ॥ ज्ञानियांस नलगे सगुण सर्वथा । म्हणूनी सर्वत्र बोलती अन्यथा । असो त्यांची कथा, आतां जगन्नाथा ! । टीका पुढें चालविणें. ॥ ४०७.॥ आतां जे त्या पदाप्रती जाती । ते न परतती मागुती । ऐसी भगवंतीं गती । श्रीपति बोलिला. ॥ ४०८.॥ तरी आत्मा सर्वगत । जाणें येणें नाहीं निश्चित । आणि ते जाती, न परततां, म्हणे भगवंत । तरी कोण जाणार त्या पदातें.॥४०९॥ देहीं असोनी बद्ध कवण ? । आत्मा तरी नित्य मुक्त निर्गुण । आतां मोक्ष पावला त्याची खूण । कळे, तरी हें सर्व खरें. ॥४१०॥ बंध आत्मयास नसे । तेव्हां मुक्तीही होतां न दिसे । जडास बंध जरी गवसे । तरी मोक्षही जडास. ॥ ४११ ॥ बंध देवभट्टातें । आणि मोक्ष यज्ञभट्टातें । तेव्हां रोग एकास आणि आरोग्य दुसरियातें । निवृत्ति त्या रोगाची. ॥ ४१२ ॥ जरी चैतन्यास मुक्ति घडे । तरी बंधही चैतन्याचकडे । जरी जडची बंधीं पडे । तरी मुक्तीही जडास बोलावी. ॥ ४१३ ॥ आणि दुःखाचा संबंध । त्याचेंची नांव बंध । जडास तों कळेना गंध । भोक्तेपणाचा. ॥ ४१४ ॥ एवंच दुःखाचा भोग । तोची बंधाचा संयोग । म्हणूनी भोक्ता प्रतिबिंबांश, त्याचा प्रसंग । श्रीरंग बोलतो या श्लोकांपासूनी. ॥ ४१५ ॥

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।**

अगा ! माझाच अंश या । जीवलोकीं धनंजया ! । जीव जाला जया, तया । सनातन म्हणावें. ॥ ४१६ ॥ इंद्रियें पांच मनासहित । ऐसीं मिळोनी सा निश्चित । जीं हीं साही असती प्रकृतींत । आकर्षी तयांतें अंश माझा. ॥ ४१७ ॥ या श्लोकीं मुकुंद । बोले ऐसें हेंची विशद । वाखाणितां प्रतिपद । तत्त्वार्थ उघडे. ॥ ४१८ ॥ '**ममैव**' म्हणे भगवंत । कीं माझाच अंश निश्चित । '**जीवलोके**' म्हणिजे जीवोपाधींत । जीव होऊनी नित्य तो. ॥ ४१९ ॥ कीं अंश ज्याचा जीव । तो एकची देवाधिदेव । त्यावेगळे सर्व

देव । अंश त्यांचे. ॥ ४२० ॥ इतर देव अंशाची सकळ । ज्याचे अंश तो मीच केवळ । 'ममैव' म्हणूनी घननीळ । या अभिप्रायें बोलिला. ॥ ४२१ ॥ आतां अंश कैसा म्हणावा ? । एक कीं वेगळा गणावा । त्यांत अंश म्हणतांच जाणावा । भिन्न नव्हे म्हणोनी. ॥ ४२२ ॥ अंश जळाचें स्थळ । आणि स्थळाचा अंश जळ । सुवर्णाचा अंश तांबें, रुपें, पितळ । म्हणतां नये. ॥ ४२३ ॥ जेथें जळाचा अंश असे । म्हणतां आर्द्रता तेथें दिसे । जळांश म्हणतां न गवसे । *लेश तेथें अग्नीचा. ॥ ४२४ ॥ आतां अंश चैतन्याचा । चैतन्यची मानावा साचा । परी अंश आद्यंतरहिताचा । जाणावा कैसा म्हणोनी ? ॥ ४२५ ॥ आकाशाचा अंश आकाश । तरी तो आकाशची सावकाश । अंश म्हणावया अवकाश । न दिसे, वेगळें न दिसतां. ॥ ४२६ ॥ कोठें नाहीं तुटला । जो आकाश, तयाला । अंश कोठे म्हणाल ? बोला । आकाशची असे. ॥ ४२७ ॥ एवं अंश म्हणतां सिद्ध एकत्व । आणि एकत्व असोनीही भिन्नत्व । माझाच अंश म्हणतां इतके तत्व । देवें येथें सुचविलें. ॥ ४२८ ॥ आतां अंश म्हणतां एकत्व । तें सिद्ध जालें तत्त्व । परंतु अंतरहिताच्या अंशाचें भिन्नत्व । कैसें घडे ? ॥ ४२९ ॥ ज्यास नाहीं आदि अंत । जो ऐसा अनंत । तो म्हणतो भगवंत । अंश माझा. ॥ ४३० ॥ त्यावेगळें स्थळ असे । तरी त्याचा तुकडा ते स्थळीं दिसे । आतां ज्याचा अंश त्याचमध्यें वसे । तुटोनी वेगळा जरी म्हणावा. ॥ ४३१ ॥ तरी तो अपरिच्छिन्न । जें तुटे, तें म्हणावें परिच्छिन्न । जो छिन्नची नव्हे, त्याचा भिन्न । अंश कैसा लेखावा ? ॥ ४३२ ॥ आकाशाचा न घडे छेद । परी घटीं घटाकाशरूपें भेद । आणि घटाकाश महदाकाश अभेद । अंश ऐसा जरी म्हणावा. ॥ ४३३ ॥ तरी तो न हाले घट हालतां । घटाकाश न चळे चाळितां । देव जो अंश बोलतो आतां । त्यास उपाधियोगें दुःखभोग. ॥ ४३४ ॥ "अधिष्ठाय मनश्चायं" म्हणोनी । "विषयानुपसेवते" या वचनेंकरूनी । यास भोग बोले भगवंत यावरूनी । अंश ऐसाही न बोलवे. ॥ ४३५ ॥ तरी भगवंतास भोग नसे । आणि त्याच्या अंशासची भोग दिसे । ज्या युक्तीनें भोग ऐसा गवसे । त्या युक्तीनें अंश हाही बोलावा. ॥ ४३६ ॥ तरी घटांत सर्वगत आकाश अचळ । ऐसा सर्वगत देहीं तोही चिदंश केवळ । परी जैसा घट चळतां आकाश नव्हे चंचळ । तैसा सर्वगतही परी कूटस्थ आत्मा देहीं जाणावा. ॥ ४३७ ॥ "तत्त्वमसि" म्हणोनी । श्रुति 'असि' पदेंकरूनी । आयतें ऐक्य त्या कूटस्थाचें लक्षूनी । उपदेशिती. ॥ ४३८ ॥ भोग त्या अंशास न घडे ।

*४ वा० प०

भोग लागेना जडा उपाधीहीकडे । भोगरूपा बंधांतही सांपडे । तो चिदंश भगवदंश येथें बोलावा. ॥ ४३९ ॥ तरी घटीं जे रीतीं व्योम । ऐसें कूटस्थ चैतन्य परम । आणि घटीं उदकासम । सत्त्व जीवोपाधि लेखावा. ॥ ४४० ॥ त्या जळाच्या पुरता आकाश । प्रतिबिंबरूप अवकाश । तैसा सत्त्वाच्या पुरता चित्प्रकाश । प्रतिबिंबला अंश स्वप्रकाशाचा. ॥ ४४१ ॥ हालतां सत्त्वरूप जळ । तो प्रतिबिंब आकाश चंचळ । तें सत्त्व तमाचा होतां कर्दम गढूळ । प्रतिबिंब मिळे कूटस्थीं. ॥ ४४२ ॥ ऐसा सुषुप्तिकाळ' । मागुतीं जेव्हां सत्त्वजळ । तमकर्दम तळीं बैसतां, निर्मळ । प्रतिबिंब मागुती जागरीं प्रगटतें. ॥ ४४३ ॥ हें लक्षण सुषुप्तीचें । रहस्य वेदश्रुतीचें । जे संस्कृत. ग्रंथ नेणती साचें । न मानिती. ॥ ४४४ ॥ सुषुप्ति आणि प्रलयकाळ । तेव्हां ब्रह्मीं मिळती जीव सकळ । परी अविद्योपाधि संसारमूळ । त्याच्या नाशेंची संसार नाशतो. ॥ ४४५ ॥ हें असो, तें सत्त्वजळ । कांहीं गढूळ, कांहीं होय नितळ । ते स्वप्नावस्था प्रबळ । प्रतिबिंब भोगी रजोगुणें स्वप्न तेधवां. ॥ ४४६ ॥ जेव्हां तें सत्त्व ओळखे बिंब । आणि त्यास सर्वदा बिंबाचाच अवलंब । तेव्हां बिंबीं प्रतिबिंब । ऐक्य पावे ते मुक्ती. ॥ ४४७ ॥ बिंबच आत्मा ऐसी गोडी । सत्त्व या भक्तीनें बंध तोडी । तें वैकुंठास जाय तेव्हां सोडी । प्रारब्ध सरतां देहातें. ॥ ४४८ ॥ मुक्ति येथेंची प्रतिबिंबा । सत्त्व धरूनी सर्वगता बिंबा । क्षण आनंदाचिया अवलंबा । न सोडी असे भगवदाकारें वैकुंठीं. ॥ ४४९ ॥ मुक्तिपदास जाणें । तेथूनी मागुती संसारा न येणें । सुचविलें येथें कमलेक्षणें । अंश म्हणतां. ॥ ४५० ॥ "यद्गत्वा न निवर्तंते" । म्हणूनी भगद्वाणी बोलते । न परतती पावोनी मोक्ष जे ऐसे, ते । माझे अंश, येथें ऐसें सूचवी. ॥ ४५१ ॥ या भावें सनातन । म्हणजे तो नित्य ऐसें जगज्जीवन । बोले कीं जेव्हां बिंब नित्य पुरातन । तैसेंची तेव्हां प्रतिबिंब. ॥ ४५२ ॥ कीं आरसां पाहिजे मुख । ऐसा उपाधींत अंश देखे विश्वतोमुख । तें मुखीं मिळे प्रतिमुख । तरी काय नाश पावलें म्हणावें ? ॥ ४५३ ॥ सत्त्व कांचेचा आरसा । त्या कांचेस पाठीसी लेप जैसा । लेप रजतमाचा ऐसा । सत्त्वास. ॥ ४५४ ॥ कांचेस जों नसे लेप । तों न दिसे प्रतिरूप । तैसें सत्त्वीं चित्स्वरूप । विना रजतम प्रतिबिंबेना. ॥ ४५५ ॥ त्या लेपाचा होय नाश । मग न दिसे प्रतिबिंबाचा प्रकाश । प्रारब्ध सरतां नुरे लेश । रजतम भक्त ज्ञानियाचें. ॥ ४५६ ॥ उरे भक्तिप्रसंगें सत्त्व । त्यास आत्मा वाटे सर्वगतत्व । वैकुंठीं भगवत्समानधर्मत्व । भगवद्रूप त्या सत्त्वातें.

॥ ४५७ ॥ जे निर्गुणोपासक केवळ । प्रारब्ध सरतां, सत्त्वकल्लोळ । मुरोनी, उरे चैतन्यजळ । आहे तैसें ब्रह्म असे. ॥ ४५८ ॥ जेव्हां नाहीं सत्त्व । तेव्हां कैंचें प्रतिबिंबत्व? । एवंच अंशास बंधत्व । तो प्रतिबिंबांश भोक्ता बोलावा. ॥ ४५९ ॥ अश म्हणतांच ऐसें प्रतिबिंबत्व । विचारितां सांपडे तत्त्व । तो अंश पावला जीवत्व । जीवोपाधींत भगवंत बोलतो. ॥ ४६० ॥ सप्तमीं अष्टधा 'अपरा' प्रकृती । दुसरी 'परा' बोलिला श्रीपती । ते जीवभूता परा म्हणोनी पार्थाप्रती [1] स्वयें बोलिला. ॥ ४६१ ॥ आणि येथें माझा अंश भगवंत । म्हणे जीवलोकीं जीवभूत । अंश वेगळा, प्रकृति वेगळी निश्चित । जीवत्व दोहींस केंवी घडे? ॥ ४६२ ॥ विवर्त जडाभास प्रकृती । अंश अधिष्ठानवाच्य चित्स्फूर्ती । जीवत्व दोहींस बोले यदुपती । परस्परें विरोध. ॥ ४६३ ॥ दोहींचा विरोधपरिहार । तरीच, जरी प्रतिबिंबत्वीं निर्धार । अशा जीवास घडे, तरी द्विप्रकार । जीवत्व एकातेंची सिद्ध होतें. ॥ ४६४ ॥ जळीं दिसे सूर्यमंडळ । तें जळेंची आहे केवळ । एतद्रूप जें जळ । त्या जळींच प्रतिबिंबांश सूर्याचा. ॥ ४६५ ॥ ऐसी परा प्रकृती । या भावें जीवभूता म्हणे श्रीपती । परी ते ऐसी न म्हणवे नुसती । म्हणूनी अंश जीवभूत या श्लोकीं म्हणतसे. ॥ ४६६ ॥ विना अंश नुसती परा जीवभूता । अंश जीवभूत तीवांचूनी नुसता । दोन्ही न घडती तत्त्वता । एवंच जीव प्रतिबिंबांश याचा अर्थ. ॥ ४६७ ॥ दर्पण अथवा जळ । त्यांत प्रतिबिंबे रविमंडळ । उदक केवळ अथवा सूर्य केवळ । प्रतिबिंब न दिसे आणि दिसे योगें दोहींच्या. ॥ ४६८ ॥ येविषयीं श्रुती । स्पष्ट ऐसेंची बोलती । त्या वदाव्या किती?। श्रुति येथें मागेंही बोलिल्या एक त्यांत.॥४६९॥

**यथा ह्ययं ज्योतिरात्मा विवस्वानापो भिन्ना बहुधैकोनुगच्छन्।**
**उपाधिना क्रियते भेदरूपो देवः क्षेत्रेष्वेवमजोऽव्ययात्मा ॥**

जैसा ज्योतिरूप भास्कर । आणि उदकाचे बहुधा प्रकार । त्या त्या जळीं तदनुसार । एक असोनी तो अनेक होतसे. ॥ ४७० ॥ तैसा उपाधिभेदें करूनी । देव क्षेत्रां अनेकांत ऐसा म्हणोनी । श्रुति म्हणे हेंची विशद करूनी । वाखाणिली मागें याच टीकेंत. ॥ ४७१ ॥ ऐसेंची ब्रह्मांडपुराण । त्यांत अध्यात्मरामायण । तेथें जीव प्रतिबिंब म्हणूनी प्रमाण । मागेंही या टीकेंत वाखाणिलें. ॥ ४७२ ॥

---

१. अ० ७, श्लो० ४–५.

ब्रह्मांडपुराणश्लोकः—**प्रतिबिंबाख्यमपरं दृश्यते त्रिविधं नभः ।**
**बुद्ध्यवच्छिन्नचैतन्यमेकं पूर्णं तथापरं ॥**
**आभासस्त्वपरं बिंबभूतमेवं त्रिधा चितिः ॥**

स्पष्ट पदपदार्थ । मागेंही वाखाणिला हाची अर्थ । एवं जीव प्रतिबिंबांश यथार्थ । ऐसेंची असे श्रीमद्भागवतीं. ॥ ४७३ ॥

श्रीमद्भागवतश्लोकः—**यथा जले चंद्रमसः कंपादिस्तत्कृतो गुणः ।**
**दृश्यतेऽसन्नपि द्रष्टुरात्मनो नात्मनो गुणः ॥**

जैसा निर्मळ जळीं । चंद्रमा जलयोगें डळमळी । ऐसा अनात्मगुणेंकरूनी आत्मा तळमळी । तो प्रतिबिंब ऐसा जीव उपाधींत. ॥ ४७४ ॥ इत्यादि वेद पुराणें । असंख्यात प्रमाणें । अंश म्हणतां नारायणें । प्रतिबिंबांश बोलिला. ॥ ४७५ ॥ त्या चिदंशास भोक्तेपण । हेंची बंधत्वाचें लक्षण । तें बोलतो कमलेक्षण । या उत्तरार्धें. ॥ ४७६ ॥

उत्तरार्धः—**मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥**

पंचेंद्रियें षष्ठ मन । हें भोगाचें साधन । हीं प्रकृतिस्थ म्हणे जगज्जीवन । यातें आकर्षितो अंश माझा. ॥ ४७७ ॥ येथें आकृतीच जाणावी प्रकृती । एवं प्रकृति म्हणजे देहाकृती । त्या देहापासूनी साही विकृती । देहांतराप्रति आकर्षितो, हा अर्थ. ॥ ४७८ ॥ प्रलयकाल सरलियावरी । अथवा सुषुप्ति होतां जागरीं । आकर्षितो भोगाकारणें, यापरी । कोणी म्हणती, हें न घडे. ॥ ४७९ ॥ सृष्टिकाळाआधीं । प्रगट होती उपाधी । त्यांत प्रतिबिंबें पडती तेव्हां विरोधी । हे गोष्टी या सिद्धांतास. ॥ ४८० ॥ सुषुप्तींत तमीं गढूळ । तें सत्त्वजळ होतां नितळ । प्रतिबिंब केवळ । दिसे तयामध्यें. ॥ ४८१ ॥ सृष्टिकाळीं आणि जागरीं । प्रथम मनइंद्रियें प्रगटती बरीं । मग जो सत्त्वांश तदंतरीं । त्यांत चिदंश प्रतिबिंबतो. ॥४८२॥ हा अंश मनइंद्रियें । आकर्षितो स्वयें । हा अर्थ न घडे निश्चयें । देहांतरासी आकर्षितो हाची अर्थ. ॥४८३॥ एवं देहांतरास जातो । तेव्हां बंध आपला आपणासवें नेतो । तोंपर्यंत मन इंद्रियादि बंध घेऊनी असतो । प्रकृतींत म्हणिजे देहाकृतींत. ॥ ४८४ ॥ मन आणि इंद्रियें मिळोनी । लिंगदेह होतो त्यांतुनी । पांच ज्ञानेंद्रियें म्हणतां त्यावरूनी । कर्मेंद्रियें सुचवी जाणावें. ॥ ४८५ ॥ मन म्हणतां चित्त बुद्धी । त्यांचीही जाली अर्थसिद्धी । एवंच जीवोपाधिप्रसिद्धी । देहाकृतींत असे ते तो नेतो. ॥ ४८६ ॥ ऐसें भगवंत बोलिला । परंतु अर्थ विशद नाहीं जाला । म्हणूनी हाची अर्थ बोलों आरंभिला । विशद आतां या श्लोकीं. ॥ ४८७ ॥

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।**
**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥ ८ ॥**

अगा ! प्रकृतिस्थें मनइंद्रियें । बोलिलों या अभिप्रायें । कीं धनी मना इंद्रियांचा हा स्वयें । त्यापासूनी ये शरीरा. ॥ ४८८ ॥ हीं मनइंद्रियें त्या शरीरा । हा घेऊनी जातो पांडुकुमारा ! । आणि जें सोडितो त्यापासूनी एकसरा । घेऊनी निघतो. ॥ ४८९ ॥ कीं हा ईश्वर । राजाच म्हणावा राजकुमार । मनइंद्रियादि परिकर । ईश्वर यांचा तो तोची कीं. ॥ ४९० ॥ म्हणसी कैसा घेऊनी जातो ? । तरी वायु जैसा गंधातें नेतो । तो गंध पुष्पत्राटिकेंत असतो । देहीं असतो तैसा हा कदंब. ॥४९१॥ गंध पुष्पापासूनी तो । जैसा वायु घेऊनी जातो । तैसा एका देहाकृतीपासूनी आकर्षितो । जीव देहांतरासी मनइंद्रियादि. ॥ ४९२ ॥ ज्या शरीरापासुनी । नेतो ते प्रकृति आकृति म्हणोनी । पूर्वश्लोकीं या अभिप्रायेंकरूनी । बोलिली. ॥ ४९३ ॥ ऐसा ज्या देहास नेतो । त्या देहीं काय करितो । तरी त्यातें अधिष्ठूनी भोग भोगितो । ऐसें बोलतो या श्लोकीं. ॥ ४९४ ॥

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥**

अगा ! भोक्ता हा अंश स्वयें । परी अधिष्ठूनी पांचही ज्ञानेंद्रियें । जीं विषयांतें जाणती आणि कर्मेंद्रियें । तींही म्हणे **च**कारेंकरूनी. ॥ ४९५ ॥ मुख्य भोग ज्ञानेंद्रियांतें नेमुनी । **"रसनं घ्राणमेव च"** म्हणोनी । या **एव**शब्दें आणि **च**कारेंकरूनी । **च**कारें कर्मेंद्रियेंही म्हणतसे. ॥ ४९६ ॥ एवंच इंद्रिय आणि मन । यांनें अधिष्ठूनी सेवन । विषयांचें करितो म्हणे मधुसूदन । कीं हें भोगसाधन, हा भोक्ता. ॥ ४९७ ॥ इंद्रियें भोगसाधन । तैसेंची एक मन । परंतु भोक्ता म्हणे जगज्जीवन । अंश माझा. ॥ ४९८ ॥ चाटू[1] अधिष्ठूनी नाना । रस चाटी जेंवीं रसना । तैसा इंद्रियां आणि मना । अधिष्ठूनी अंश माझाची भोगितो. ॥ ४९९ ॥ चाटू नेणे कोण्ही रस । विषयभोग न घडे मनास । परी अधिष्ठूनी तयांस । सेवितो, कीं रस सेवी चाटू अधिष्ठूनी नर जैसा. ॥ ५०० ॥ जे मनास भोक्ता म्हणती । तयांचें मत येथें जगत्पती । स्पष्ट दूषितो ये रीती । कीं भोक्तृत्व न घडे मनइंद्रियांसी. ॥ ५०१ ॥ आणि भोक्ता जो या प्रस्तुतीं । अंश माझा म्हणे रुक्मिणीपती ।

---

१. चमचा.

तो मन अधिष्ठूनी जे रीती। विषय सेवितो तैसाच अधिष्ठितो म्हणे इंद्रियांतें. ॥ ५०२ ॥ कीं इंद्रियें जैसीं, तैसेंची मन । चिदंशास भोगसाधन । म्हणूनी म्हणे जगज्जीवन । भोग मनातेंची, तरी इंद्रियांसही कां न घडे ? ॥ ५०३ ॥ मनइंद्रियांतें अधिष्ठूनी । अंश माझा भोगितो म्हणोनी । देव बोले यास लोहाग्निदृष्टांत आणूनी । अग्नि चिदंश, लोह मन, ऐसें साधावें. ॥ ५०४ ॥ तरी मन आणि इंद्रियें दोन्ही । हा प्रकृतिजडभाग लोहस्थानीं । लेखावा आणि चिदंश वह्नी । लेखावा येथें. ॥ ५०५ ॥ लोहसंगें अग्नि पिटिती । परी घणाचे घाय लोखंडावरी बसती । तैसी मनइंद्रियरूपिणी प्रकृति । भोग भोगी म्हणावें, जेव्हां अभोक्ता मानावा चिदंश. ॥ ५०६ ॥ कीं अधिष्ठूनी इंद्रियें मन । भोगी अंश माझा म्हणे जगज्जीवन । तें विपरीत वाखाणावें वचन । तेव्हां घडतो अर्थ ऐसा. ॥ ५०७ ॥ कीं अंशास माझिया । अधिष्ठूनी अगा! धनंजया! । मन इंद्रियें भोगिती जैसें अधिष्ठूनियां । अग्नीतें सोशी लोखंड. ॥ ५०८ ॥ एवं मन इंद्रियें । दोहींस अधिष्ठूनी अंश स्वयें । भोगितो याच्या विपरीत निर्णयें । भोग मनातें, तेव्हां इंद्रियांतेंही मानावा. ॥ ५०९ ॥ कीं जैसें येथें मन । तैसींच इंद्रियेंही भोगसाधन । देव बोले याचें विपरीतार्थकथन । मनास भोक्तृत्व तरी इंद्रियांस आधीं प्रत्यक्ष. ॥ ५१० ॥ रसना चाखे रस । रूप दिसे नयनास । शब्द कळे श्रवणास । स्पर्श त्वचेस, गंध घ्राणातें. ॥ ५११ ॥ आतां मन जातां अन्यत्र । रूप न देखती उघडेही नेत्र । तेव्हां मनावांचूनी इंद्रियमात्र । विषय आपला नेणे, ऐसें म्हणावें. ॥ ५१२ ॥ तरी धनुष्यावांचूनी बाण । हरूं न शकती प्राण । तैसें त्वक्चक्षुश्रोत्रघ्राण । घेऊं न शकती विषय, ऐसें साधिलें. ॥ ५१३ ॥ एक म्हणे बाण । हृदय भेदूनी हरती प्राण । एक म्हणे देवाची आण । ते बाण व्यर्थ धनुष्यावांचूनी. ॥ ५१४ ॥ ते दोघेही गणावे सत्य। आणि दोघेही म्हणावे असत्य । प्राणहर्ता लेखावा अगत्य । जो हाणितो बाणातें. ॥ ५१५ ॥ बाण म्हणावे अचेतन । तरी धनुष्य काय सचेतन ? । जड इंद्रियें तैसेंची मन । मन धनुष्य, शर इंद्रियें. ॥ ५१६ ॥ आतां इंद्रियें नाना । व्यर्थ होती विना एका मना । तरी शरही अनेक एका धनुष्याविना । व्यर्थ होती.॥५१७॥ आतां सर्वां इंद्रियां मन जाणे । तरी बाण सर्व एक धनुष्य हाणे । चिदंश पुरुषावांचूनी शाहाणे । मन इंद्रियें लेखिती जड धनुष्य बाण. ॥ ५१८ ॥ आतां भोग म्हणतां इंद्रियांतें । भोग न घडावा मनातें । कीं एक जेवितां दुसरियातें । तृप्ति न घडे, ऐसें म्हणावें.॥५१९॥तरी गर्भिणी तृप्त ज्या अन्नें । गर्भही तृप्त त्या

भोजनें। इंद्रियींच्या विषयसेवनें। मन इंद्रियांच्या गर्भीं तृप्त होय. ॥ ५२० ॥ बाळ गर्भाबाहेरी। त्यास मातेचें भक्षिलें अन्न तृप्त न करी। मन इंद्रियांबाहेरी असतें, तरी। तृप्त इंद्रियतृप्तीनें न होतें. ॥ ५२१ ॥ प्रथम भोम इंद्रियांतें। मग इंद्रियद्वारा मनातें। तथापि हीं जड म्हणोनी अंशातें। भोग म्हणे गीताकार श्रीकृष्ण. ॥ ५२२ ॥ तो भोग लेखावा जडा मंना। तरी भोग इंद्रियां कां हो घडेना?। एवंच मनास भोक्तृत्व हे कल्पना। प्रमाणविरुद्ध. ॥ ५२३ ॥ म्हणती देखतां रूप नयन। निवाले आणि गोड वचन। ऐकतां सुखी जाले श्रवण। कां भोग घडे म्हणावा इंद्रियांतें. ॥ ५२४ ॥ आतां भोगची मिथ्या म्हणावा। तरी मनास भोग कां गणावा?। एवं स्वप्न मिथ्या तरी मानावा। सुखदुःखभोग स्वप्नद्रष्ट्यातें. ॥ ५२५ ॥ स्वप्नीं दुःखी अत्यंत। त्यांस जागें करी जो जागृत। तो त्याचे चरण असे वंदित। कीं सोडविलें म्हणे दुःखापासुनी. ॥ ५२६ ॥ स्वप्नीं दुःखप्रद पदार्थ। मिथ्या इंद्रियें, मिथ्या इंद्रियार्थ। परी द्रष्टा सुखी दुःखी जाला यथार्थ। जो स्मरे जागरीं. ॥ ५२७ ॥ सुखदुःख कालचें आजी। तैसेंची आठवे जें पावला स्वप्नामाजी। मिथ्या भुजंग देखोनी डाजी। भय मनीं कंप देहीं द्रष्ट्याच्या. ॥ ५२८ ॥ ज्यास ऐसा भोगसंबंध। त्यातेंची अनादि अज्ञानबंध। जो सुखदुःखभोक्ता अविद्यांध। मोक्षही त्याच भोक्तयातें. ॥५२९॥ त्यास आरोग्य, ज्यास रोग। त्यास मोक्ष, ज्यास भोग। मनास भोग, तरी मनास योग। अंगीकारावा मोक्षाचा. ॥ ५३०॥ मोक्ष मानावा ज्यास। नाश न घडावा त्यास। नाश बोलावा मनास। कैवल्य मोक्ष निर्गुण जे समयीं. ॥ ५३१ ॥ प्रकृतीचे अवघे भोग। आणि भोक्ताही असतां प्रकृतिभाव। तरी अंश माझा भोक्ता ऐसा प्रसंग। कां श्रीरंग मुखपद्मीं प्रकटिता? ॥ ५३२ ॥ प्रकृति विवर्त जडरूप। अंश चित्स्वरूपाचा चिद्रूप। तो बद्ध, तो द्रष्टा, पावे भयकंप। जडभोग मिथ्या सर्प देखोनी. ॥ ५३३ ॥ तो द्रष्टा स्वप्नप्रकृती। भोगी स्वप्नदेहाकृती। जो गुरुकृपें पावे जागृती। मुक्ति त्यास जो बद्ध. ॥ ५३४ ॥ प्रकृतिशृंखला तो बद्ध। खिळा शृंखलेचा मन अशुद्ध। तें सत्त्व मन रजतमावेगळें होतां शुद्ध। त्यास मोक्ष, मन ऐसें कारण बंधमोक्षांतीं. ॥ ५३५ ॥ **"मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः"** म्हणोनी। प्रसिद्ध शास्त्रीं पुराणीं याप्रकारेंकरूनी। मनातेंची भोग मानिती ते याबरूनी। मनातेंची बंधमोक्ष म्हणती व्यर्थ.॥५३६॥अन्न तारी, अन्न मारी। म्हणून म्हणती यापरी। परंतु अन्नें मरे, अन्नें तरे, तो तरी। अन्न नव्हे.॥५३७॥ एवंच बंधास

कारण । मनाचें अशुद्धपण । आणि मनाचें शुद्ध सत्त्वपण । मोक्ष त्याकरितां शास्त्रार्थ ऐसा. ॥ ५३८ ॥ एवंच प्रकृति जडभाग । त्यास न घडे सुखदुःखभोग । आणि बंध न घडे मोक्षयोग । दोन्ही घडती चिदंशातें. ॥ ५३९ ॥ जो "ममैवांशो" म्हणोनी । प्रस्तुतीं स्वमुखेंकरूनी । बोले भगवंत नेमुनी । ऐसेंची वेदशास्त्रपुराणीं सर्वत्र. ॥ ५४० ॥ अंश तरंग सागराचा । म्हणूनी कोणी वाखाणिती वाचा । त्यांस तत्त्वार्थ या अंशाचा । ठावा नसे. ॥ ५४१ ॥ अंश जरी ठाउका असता । तरी कां बोलते मनातें भोक्तृता । तरंग कार्य तत्त्वता । कारण समुद्र. ॥ ५४२ ॥ माती उपादानकारण घटीं । तंतु उपादान जैसा पटीं । उपादान सोनें किरीटीं । तैसें तरंगीं जळ उपादान. ॥ ५४३ ॥ चैतन्य उपादानकारण । कार्य त्याचें जडपण । तरंग म्हणतां गुण । प्रकृतीचा होतसे. ॥ ५४४ ॥ श्रीशंकराचार्य यती । बोलिले अपरोक्षानुभूती । तेथें प्रपंच पाहतां पाहावा आत्मा म्हणती । कीं तरंग पाहतां पाहावें जळ जैसें. ॥ ५४५ ॥

अपरोक्षानुभूतिः—**यथा तरंगकल्लोलैर्जलमेव स्फुरत्यलम् ।**
**पात्ररूपेण ताम्रं हि ब्रह्मांडाद्यैस्तथात्मता ॥**

जैसे तरंगाचे कल्लोळ । पाहों जातां दिसे जळ । तैसें दिसे आत्मत्व केवळ । ब्रह्मांडादिजडपदार्थ पाहतां. ॥ ५४६ ॥ दुसरा दृष्टांत । ऐसा या श्लोकांत । कीं पात्ररूपें पाहतां अत्यंत । तांबेंची दिसे. ॥ ५४७ ॥ ऐसेच दृष्टांत नानाप्रकार । तरंग कार्य, जड विकार । त्यांत जैसा जळरूपें सागर । चैतन्य ऐसें जडमात्रीं. ॥ ५४८ ॥ एवंच जैसा तरंगाकार । तैसा जड प्रकृतीचा विकार । त्यांत जळ जैसें निर्विकार । तैसा जडीं चिदात्मा. ॥ ५४९ ॥ दृष्टांतीं मिथ्या तरंगाकार । दार्ष्टांतीं कीं तैसा जडविकार । अंश चैतन्याचा चैतन्यानुसार । तेथें कोण्हीच न बोलती दृष्टांत ऐसा. ॥ ५५० ॥ अंश अपरिच्छिन्नाचा । प्रतिबिंब म्हणती वेदवाचा । सिद्धांत हा शास्त्रपुराणांचा । कळता, तरी भोग कां मानिते मनातें? ॥ ५५१ ॥ विना शास्त्रश्रवण । परंपरेनें आलें सिद्धपण । बोलिलें अद्वैत मात्र निरूपण । परी भेद गिळूनी अभेद नाहीं बोलिले. ॥ ५५२ ॥ द्वासुपर्णा श्रुती । म्हणे सुपर्ण दोनी असती । ते एकाच वृक्षीं दोघेही वसती । त्यांत एक भोक्ता, दुसरा भोगरहित. ॥ ५५३ ॥ जरी चैतन्यास भोग नसता । तरी जीव कां वेदीं शास्त्रीं दिसता? । जडा मना भोग घडता तत्त्वता । तरी घडतां इंद्रियांतही. ॥ ५५४ ॥ आतां चैतन्यास भोग घडे । तरी भोक्तृत्व निर्गुणाही वरी पडे । म्हणूनी होऊनी वेडे ।

मुरकुंडी घालिती मनावरी. ॥ ५५५ ॥ अंश प्रतिबिंबरूप । चित्स्वरूपाचा चित्स्वरूप । जळ कांपतां दिसे सकंप । जो जळीं प्रतिबिंबला. ॥ ५५६ ॥ सूर्यदृष्टांत बोलती श्रुतीं । चंद्रदृष्टांत भागवतीं । आकाशदृष्टांत हनुमंताप्रती । ब्रह्मांडपुराणीं सांगे श्रीराम. ॥ ५५७ ॥ जे प्राकृत ग्रंथकार । त्यांस हा ठाउका नाहीं विचार । ज्यांस त्याच ग्रंथीं निष्ठा फार । ते न समजती हें तत्त्व सांगतांही. ॥ ५५८ ॥ दावितांही पुराणश्रुती । उमज न धरी त्यांची मती । तत्त्व न कळतां म्हणती । हें न घडे. ॥ ५५९ ॥ तें भेदवादियांस न कळे अद्वैत । म्हणूनी काय सत्य द्वैत? । प्रमाण वेद आणि व्यासादि संत । स्पष्ट बोलती, द्वें न घडे हे म्हणती. ॥ ५६० ॥ हा अध्याय पंचदश । येथें प्रपंच अश्वत्थरूप ऐसा उपदेश । त्या प्रपंचपिंपळीं जीव आणि ईश । सुपर्ण म्हणजे पक्षी दोघे. ॥ ५६१ ॥ त्यांत प्रपंचाश्वत्थ वर्णिला । त्या प्रसंगें "ममैवांशो जीव" म्हणतां जीव पक्षी बोलिला । माझा अंश म्हणतां सुपर्ण दुसरा आला । कीं ईश्वर तो मदंश. ॥ ५६२ ॥ त्यांत भोग न घडे ईश्वरा । जीव भोक्ता सुपर्ण दुसरा । म्हणोनी भोगाची रीति पांडुकुमारा । सांगतो "ममै-वांशो जीव" येथुनी. ॥ ५६३ ॥ भोग बोलतां स्वअंशानें । भोग न घडे आपणानें । न बोलतांही या बोलानें । बोलिला देव. ॥ ५६४ ॥ प्रपंचा-श्वत्थ ये रीती । बोलिला गीतेंत विश्वपती । प्रपंचपिंपळ जैसा वर्णिती । श्रुति, तैसाच वर्णिला. ॥ ५६५ ॥

श्रुति—**द्वासुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्यो अभिचाकशीति ॥**

श्रुति म्हणे सुपर्ण दोनी । असती एकांत एक मिळोनी । दोघे सखे चिद्रूप म्हणोनी । हें तात्पर्य म्हणतां सखे अन्योन्य. ॥ ५६६ ॥ कीं एक जड, एक चैतन्य । तेव्हां सख्य नव्हे अन्योन्य । देह वृक्ष जड, चिद्रूप पक्षी यास अन्य । त्या वृक्षातें आलिंगिती, श्रुति म्हणे. ॥ ५६७ ॥ व्याप्य वृक्ष, दोघे व्यापक । या नावें दोघे आलिंगिती वृक्ष एक । त्यांत एक भोक्ता, एक अभोक्ता, ऐसा विवेक । श्रुति उत्तरार्धें बोलते. ॥ ५६८ ॥

उत्तरार्धश्रुतिः—**तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्यो अभिचाकशीति ॥**

या दोघांत एक सुपर्ण । करी पिप्पल स्वादु भक्षण । दुसरियाचें हें लक्षण । कीं न भक्षून सर्वत्र प्रकाशी. ॥ ५६९ ॥ ऐसें बोले श्रुती । हे श्रुति श्लोक-रूपें श्रीभागवतीं । श्रीकृष्ण उद्धवाप्रती । एकादश स्कंधीं उपदेशितो. ॥ ५७० ॥

भागवत—**सुपर्णावेतौ सदृशौ सखायौ यदृच्छयैतौ कृतनीडौ च वृक्षे ।
एकस्तयोः खादति पिप्पलान्नमन्यो निरन्नोपि बलेन भूयान् ॥**

श्रुतींसारिखाच श्लोक, परी । सदृश शब्दें दोघे सारिखे म्हणे हरी । याची टीका **श्री**धरी । कीं दोघे **चिद्**रूप यास्तव सारिखे. ॥ ५७१ ॥ तोची या प्रस्तुतीं । **"ममैवांशो जीव"** म्हणे **श्री**पती । अंश तो **चिद**ंश ये रीती । स्पष्ट बोले, भोक्तृत्व त्याचें बोलतां. ॥ ५७२ ॥ **अं**शशब्दें प्रतिबिंब । ज्याचा अंश तो स्वयें बिंब । **अं**शशब्दें सकळां संतांचा कदंब [1] । प्रतिबिंब म्हणूनी वाखाणिती. ॥ ५७३ ॥ **भाग**वतस्कंध **ए**कादश । अध्यायही त्यांत एकादश । **"द्वासुपर्णा"** जेथें **श्रु**तीचा उपदेश । **"सुपर्णावेतौ"** या श्लोकीं. ॥ ५७४ ॥ त्याच अध्यायांत **य**दुपती । म्हणे याच अंशातें बंधमोक्ष होती । जो **"ममै-वांशो"** म्हणूनी **अर्जु**नाप्रती । प्रस्तुत वर्णिला पंचदशीं **गी**तेंत. ॥ ५७५ ॥ तेथें टीका **श्री**धरी । त्या टीकेंत **श्री**धर अर्थ करी । ते टीकाही सर्वत्र प्रसिद्ध भूमीवरी । या श्लोकाची. ॥ ५७६ ॥

भागवतश्लोक—**विद्याविद्ये मम तनू विद्ध्युद्धव शरीरिणाम् ।
मोक्षबंधकरे आद्ये मायया मे विनिर्मिते ॥**

**भ**गवंत म्हणे अगा! **उद्ध**वा! । बंध अविद्येंकरूनी जीवा । ऐसें बोलतां क्षणी श्रोता म्हणेल कीं, **दे**वा! । तरी काय तुजही बंध? ॥ ५७७ ॥ कीं जीवास आणि तुज एकत्व । हें तूंची बोलसी तत्त्व । त्यास अविद्येंकरूनी बंध-कत्व । तेव्हां तूजही बंध घडे? ॥ ५७८ ॥ बंध म्हणतां जीवास । शंका ऐशी वाटेल श्रोतयांस । म्हणूनी करी या संशयाचा निरास । **"ममैवांशो"** म्हणोनी. ॥ ५७९ ॥ **अं**शशब्दें प्रतिबिंब म्हणोनी । **श्री**धर बोले विशद करूनी । तो अनुभवी षट्शास्त्रवेत्ता या वचनीं । **अं**शशब्दें चंद्रप्रतिबिंबदृष्टांत तो बोले. ॥ ५८० ॥ कीं **तृ**तीय स्कंधीं **भा**गवतीं । **मै**त्रेयऋषि **वि**दुराप्रती । सांगे भोक्तृत्व येची रीती । या श्लोकीं. ॥ ५८१ ॥

तृतीयस्कंधश्लोक—**यथा जले चंद्रमसः कंपादिस्तत्कृतो गुणः ।
दृश्यतेऽसन्नपि द्रष्टुरात्मनो नात्मनो गुणः ॥**

या श्लोकाची टीका याच प्रस्तुतीं । **"ममैवांशो जीव"** या श्लोकीं संक्षे-परीती । वर्णिली, कीं जळीं प्रतिबिंबला तारापती । जो जलकंपादिगुणें पावे कंपादिक. ॥ ५८२ ॥ जलस्थ चंद्र, तैसा **आ**त्मा । जल जैसें, तैसा उपाधि

१. मागें ओव्या ४७४–४७६ पहा.

जीवाचा अनात्मा । जो जळीं प्रतिबिंबला, तो गगनीं बिंब चंद्र परमात्मा । एवं अंशशब्दें प्रतिबिंबांश तो अंश ईश्वराचा. ॥ ५८३ ॥ "**एकस्यैव ममांशस्य**" म्हणोनी । एकादश स्कंधीं जो अंश भगवद्वचनीं । तो श्रीधरें वाखाणिला प्रतिबिंब म्हणोनी । जाणोनी ऐसें शास्त्ररहस्य. ॥ ५८४ ॥ तो अंश या प्रस्तुतीं । गीतेमध्यें उपदेशी श्रीपती । प्रपंचपिंपळ वर्णितां अर्जुनाप्रती । "**द्वासुपर्णा**" श्रुतिही वर्णिली. ॥ ५८५ ॥ हे गीता महाभारतीं । येथें उपदेशें ये रीती । भागवतीं उद्धवाप्रती । श्रुति वाखाणिली श्लोकरूपें. ॥ ५८६ ॥ कीं आत्मज्ञान जालियाउपरी । भोक्ता न कळे जोंवरी । तोंवरी संदेहाची उरी । जों संदेह, तों न म्हणावें ज्ञानपूर्ण. ॥ ५८७ ॥ एवंच भोक्ता जीव म्हणती श्रुती । तोची अंश भोक्ता म्हणतो श्रीपती । त्रयोदशीं क्षेत्रज्ञ पुरुष अर्जुनाप्रती । भोक्ता म्हणूनी स्पष्ट वर्णिला.[1] ॥ ५८८ ॥ "**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान् गुणान्**" म्हणोनी । प्रकृतिस्थ पुरुष ये रीतीकरूनी । प्रतिबिंबला प्रकृतिजीवनीं । परमपुरुष जो सर्वगत आकाशासारिखा. ॥ ५८९ ॥ तेथेंही अग्निलोहदृष्टांतेंकरूनी । मना जडातेंची भोक्ता म्हणोनी । बोलती त्या मनातें आणि इद्रियांतें अधिष्ठूनी । अंश माझा भोगितो म्हणे येथें श्रीभगवत. ॥ ५९० ॥ येथें विपरीत अर्थ योजावा । तरी इद्रियांमही भोग मानावा । कीं अग्निस्थानीं जेव्हां चिदंश लेखावा । तेव्हां लोहस्थानीं मन आणि इंद्रियें लेखावीं. ॥ ५९१ ॥ हा अग्निलोहदृष्टांत साधेल तेथें । कीं मनाइद्रियांत चैतन्य सर्वगत बोलावें जेथें । भोक्ता चिदंश या प्रसंगीं येथें । जडा मनास भोग बोलों नये. ॥ ५९२ ॥ भोग न घडे सर्वगता । तथापि सर्वत्र त्याची व्यापकता । चिदंशा प्रतिबिंबास भोग स्पर्शतां । तेथें व्यापका बिंबास साक्षित्वें आतळती. ॥ ५९३ ॥ तेथें साक्षी ईश्वर त्यास । भोग आतळती सर्वगतास । जैसे लोहसंगें पावकास । घाय आतळती घनाचे. ॥ ५९४ ॥ अग्नीस घन आतळती । परी ते लोहातेंची आतळती । तैसे भोग आतळोनीही न आतळती । सर्वगत साक्षी ईश्वरातें. ॥ ५९५ ॥ नव्हे सर्वगत चैतन्य । प्रतिबिंबरूपें निवडिलें अन्य । मागुती पाहतां अनन्य । भेद नसे बिंबाप्रतिबिंबातें. ॥ ५९६ ॥ दर्पण अथवा जळ । मुखासंमुख होतां निर्मळ । त्यांत जें प्रतिमुख दिसतें आणि मुख केवळ । भिन्न नसती. ॥ ५९७ ॥ जोंवरी तें उदक असे । तोंवरी त्यांत प्रतिबिंब दिसे । तें उदक जेव्हां नाशतसे । तेव्हां बिंबैक्य, ते

---

१. अ० १३, श्लो० २१.

मुक्ती. ॥ ५९८ ॥ जीवोपाधि जोंवरी । अविद्यायोगें असे, तोंवरी । प्रतिबिंब चैतन्यांश त्या उपाधिनीरीं । उपाधिनाशें मोक्ष घडे. ॥ ५९९ ॥ हें सर्वत्र वेदीं पुराणीं । आणि ऐसीच शास्त्रवेत्त्यां अनुभवियां संतांची वाणी । मनास भोग कल्पित काहणी । प्राकृता ग्रंथीं कल्पिली. ॥ ६०० ॥ शास्त्रीं पुराणीं देह दोनी । तेथें कारण महाकारण म्हणोनी । अधिक देहद्वय कल्पुनी । लाविले चहूं अवस्थांस चार देह. ॥ ६०१ ॥ सच्चिदानंदपद वाखाणिलें जेथें । चित्पदें माया वर्णिली तेथें । ऐसे अपसिद्धांत बोलतां येथें । ग्रंथ अत्यंत वाढेल. ॥ ६०२ ॥ ग्रंथ निगमसार म्हणोनी । भगवंतें याच वामनमुखें-करूनी । प्रगट केला, तेथें अपसिद्धांत हे दूषूनी । वैदिक सिद्धांत ते सिद्ध केले. ॥ ६०३ ॥ कोणी एक इत्यादि बोल । त्या प्राकृत ग्रंथीं बोलिला फोल । तें जनास वाटलें सखोल । मार्ग त्यानें चुकविला. ॥ ६०४ ॥ आलीकडे कोण्ही भले । अनुभवी जरी जाले । त्यांमही मनीं संस्कार राहिले । त्या ग्रंथांचे इत्यादि. ॥ ६०५ ॥ त्यावरूनि भोक्तृत्व । मनास मानिती आणि जीवत्व । प्रतिबिंब चैतन्यास हें तत्त्व । नाहीं आइकिलें. ॥ ६०६ ॥ कीं "तत्त्वमसि" म्हणूनी श्रुती । ऐक्य आयनें उपदेशिती । ते कूटस्थासी ईश्वरासी ऐक्य बोलती । त्यास नसे भोक्तृत्व. ॥ ६०७ ॥ घटाचपुरता घटाकाश जैसा । आत्मा अविद्यातीत देहीं तैसा । तो सर्वगत आत्मा कैसा । भोक्ता म्हणवेल? ॥ ६०८ ॥ परंतु त्याचें होतां ज्ञान । नासे आवरण अज्ञान । कोणी येथें पावेल समाधान । तों भोग न घडे तयातें. ॥ ६०९ ॥ मग भोक्तृत्व मानिलें मना । ग्रंथ रचिले नाना । त्यांच्या श्रेष्ठत्वेंकरूनी जना । मान्य जाले ते ग्रंथ. ॥ ६१० ॥ आलीकडे म्हणविती संत । त्यांस रीघ त्याच ग्रंथांपर्यंत । शास्त्र-हस्य बोलतां अत्यंत । क्रोशी होती. ॥ ६११ ॥ म्हणती प्रतिबिंब कैंवी घडे? । प्रतिबिंब निर्गुणाचें कैंवी पडे? । प्रतिबिंब ईश्वराचे म्हणतां अवताराकडे । धांव घेती. ॥ ६१२ ॥ चतुर्भुजादि ईश्वराचे अवतार । ईश्वर मानिती ते ईश्वराचे आकार । ईश्वर सर्वसाक्षी आणि निराकार । साक्षित्व न घडे निर्गुणीं. ॥ ६१३ ॥ अथवा ब्रह्मादिस्तंबपर्यंत । जो साक्षी सर्वगत । तो कोणत्या रूपें भगवंत । कृमिकीटकीं, पवनीं, गगनीं, लेखावा? ॥ ६१४ ॥ श्रुति म्हणती

१. हा नऊ अध्यायाचा ओवीबद्ध ग्रंथ वामनपंडितानी शा० शके १५९५ या वर्षी लिहिला. या ग्रंथासंबंधें पंडित स्वतः म्हणतातः—"ग्रंथ हा निगमसार, । शब्द थोडे, अर्थ फार, । कृपेकरूनी याचा अर्थविचार । करावा संतीं. ॥ १६१. याचे अध्याय नव, । नवही निधि अभिनव, । अनंत वेदाचें वैभव । या इतुकियामध्ये. ॥ १६२ (निगमसार, अ० ९).

नेत्राविण । पाहतो, ऐकतो विना श्रवण । दर्शनश्रवणयुक्त निर्गुण । न म्हणवे, कीं म्हणावा तो सगुण साक्षी सर्वगत. ॥ ६१५ ॥ निर्गुणास म्हणती अव्यक्त । आणि मायेचेंही नांव अव्यक्त । तें ब्रह्म अव्यक्त मायेंकरूनी युक्त । सगुण साक्षी बोलावें. ॥ ६१६ ॥ ब्रह्म व्यक्तिवर्जित अव्यक्त । तैसेंची आकारवर्जित मायातत्त्वही अव्यक्त । त्या मायेंकरूनी जें युक्त । तें साक्षी आणि आकार त्यासही असेना. ॥ ६१७ ॥ तें बिंब चैतन्य सर्वगत । निर्मूनी जीवोपाधि अनंत । सत्त्व निर्मळ जें उपाधींत । जेंवी जळ, त्या सत्त्वीं प्रतिबिंबलें. ॥६१८॥

श्रुति—तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत् ॥

जें ईश्वर निर्मिता जाला । तें निर्मूनी तो त्यामध्येंच प्रवेशला । प्रवेश सर्वगताचा बोलिला । प्रतिबिंबरूपें. ॥ ६१९ ॥ घट उपजे गगनीं । घटीं गगन त्या आयतें असोनी । पुन्हा प्रवेशलें त्या घटीं म्हणोनी । म्हणणें विरुद्ध अत्यंत असंग वस्तूचें. ॥६२०॥ "गामाविश्य च भूतानि । धारयाम्यहमोजसा" म्हणोनी । प्रवेश बोलिला तो नव्हे चित्स्वरूपेंकरूनी । भूतें धरणे हे धारणाबळशक्ती. ॥६२१॥ प्रवेश जीवरूपेंकरूनी । वेद वर्णिती तो चिद्रूप म्हणोनी । तें अनंत अनंतत्वें असोनी । प्रतिबिंबरूपें प्रवेशे, हा सिद्धांत. ॥ ६२२ ॥ घट गगनीं, त्या घटीं असे जळ । त्या जळीं तें गगन पोकळ । प्रतिबिंबरूपें प्रवेशे हें निवळ । प्रवेशणें गगनाचें. ॥ ६२३ ॥ अतएव दृष्टांत गगनाचा । सर्वत्र बोलती वेदवाचा । श्रीराम मथितार्थ त्याचा । ब्रह्मांडपुराणीं हनुमतास सांगतसे. ॥६२४॥

ब्रह्मांडपुराणश्लोकः—ततो रामः, स्वयं प्राह हनूमंतमुपस्थितम् ।
शृणु तत्त्वं प्रवक्ष्यामि ह्यात्मानात्मपरात्मनाम् ॥ १ ॥
आकाशस्य यथा भेदस्त्रिविधो दृश्यते महान् ।
जलाशये यथाकाशस्तदवच्छिन्न एव हि ॥ २ ॥
प्रतिबिंबाख्यमपरं दृश्यते त्रिविधं नभः ॥
बुद्ध्यवच्छिन्नचैतन्यमेकं पूर्णं तथाऽपरम् ॥
आभासस्त्वपरं बिंबभूतमेवं त्रिधा चितिः ॥ ३ ॥

बोलतां अर्थविस्तार । ग्रंथ वाढतो बहु फार । प्रतिबिंब आकाशाचें हा विचार । स्पष्ट दिसतो दृष्टांतीं. ॥ ६२५ ॥ सर्वगत एक महदाकाश । जळीं व्यापक तो जळाकाश । जळीं प्रतिबिंबला तो प्रतिबिंबाकाश । त्रिविध चैतन्य ये रीती. ॥ ६२६ ॥ आणि जळीं प्रतिबिंबलें गगन जैसें । बुद्धींत आभास

चैतन्य तैसें । आभास आणि प्रतिबिंब ऐसें । नांव सारिखेंचे प्रतिबिंबाचें. ॥६२७॥ ऐसी श्रीरामचंद्राची वाणी । प्रसिद्ध ब्रह्मांडनामक पुराणीं । श्रीमद्ध्यात्मरामायणीं । हनुमंताप्रति हा उपदेश. ॥ ६२८ ॥ वेदपुराणें ये रीती ।.जीव भोक्ता तो प्रतिबिंब म्हणती । प्राकृत ग्रंथीं या गोष्टी नसती । म्हणूनी चित्तीं न धरिती हें लोक ॥ ६२९॥ सिद्धांत ऐसा ये रीती । याच टीकेंत आणखी श्रुती । मागेंही वाखाणिल्या असती । परंतु येथें कांहीं पूर्वपक्ष. ॥ ६३० ॥ प्रमाणसिद्ध पक्ष । अंगीकारितां उडे पूर्वपक्ष । येथें दृष्टांत दावूनी प्रत्यक्ष ।'तत्त्व अनुभवें समजावें. ॥ ६३१ ॥ जीव बोलिला प्रतिबिंब । सगुण आणि निराकार तो बिंब । तरी सगुणीं ज्या मायेस चैतन्यावलंब । शुद्ध विद्या ते माया. ॥.६३२॰॥ विद्यांशयुक्त बिंब । तेव्हां विद्यांशयुक्तच त्याचें प्रतिबिंब । असावें, तेव्हां अविद्याकर्दब । नाशावा विद्यायुक्त प्रतिबिंबेंकरूनी. ॥ ६३३ ॥ तरी माया आणि निर्गुण । दोन्ही अंश मिळतां सगुण । त्या बिंबास दृष्टांत निपुण । या प्रसंगींच ऐसें बोलती. ॥ ६३४ ॥ कीं अग्नि आणि काष्ठ मिळोनी । अंगार होय, त्यांत अंश दोनी । एक प्रकाश, एक काष्ठ, दोन्ही असोनी । प्रतिबिंबीं असे प्रकाशमात्र. ॥ ६३५ ॥ कीं स्फटिकशिळा शुभ्र परी । पुष्प आरक्त ठेवितां वरी । आरक्त दिसे तदुपरी । दर्पणीं न दिसे तें शुभ्रत्व. ॥ ६३६ ॥ शुभ्रत्व राहे स्फटिकीं । रक्तवर्ण दिसों लागे उदकीं । माया विद्यांश बिंबैक्यीं । जीवोपाधींत प्रतिबिंबे चिन्मात्र. ॥ ६३७ ॥ मुख आरसां सचेतनाचें । सचेतन दिसे, तैसें अचेतनाचें । प्रतिबिंब न दिसे शवाचें । उदकांत. ॥ ६३८ ॥ एवंच सचेतन जें रूप । त्यांत चेतनत्वीं जें चित्स्वरूप । तें जीवंतरूपींही स्फुरे अरूप । तैसें स्फुरे प्रतिबिंबही. ॥ ६३९ ॥ परंतु कठिण देह सचेतन । तेथें स्फुरे व्यापूनी तें बिंब कठिण । उदक मृदु जें जीवन । त्यास व्यापूनी स्फुरे तें मृदुच प्रतिबिंब. ॥ ६४० ॥ ऐसें विद्योपाधियुक्त बिंब । अविद्योपाधियुक्त प्रतिबिंब । विद्याशक्तीस बिंबावलंब । प्रतिबिंबावलंब अविद्याशक्तीतें. ॥ ६४१ ॥ म्हणावें चैतन्यरूप कैसें । प्रतिबिंब पावेल? तरी ऐसें । कीं दर्पणीं अचेतनाचें अचेतनत्व जैसें । आणि सचेतनाचें सचेतनत्व. ॥ ६४२ ॥ आतां शवांतही चैतन्य असे । म्हणावें, तरी कां अचेतन दिसे? । एवंच चेतनाशक्तीकरूनी गवसे । चित्स्फूर्ति, ऐसें म्हणावें. ॥ ६४३ ॥ चिच्छक्ति चेतना असे जेथें । सर्वत्र न स्फुरे तेथें । दृष्टांत त्या स्फूर्तीचाच घ्यावा येथें । कीं सजीवीं स्फुरे, न स्फुरे निर्जीवीं. ॥ ६४४ ॥ स्फुरण रूपीं जया अरूपाचें । तें स्फुरे स्फुरण जेथें प्रतिबिंब त्या रूपाचें । ज्या रूपीं स्फुरण न

दिसे त्या चित्स्वरूपाचें । न दिसे त्याच्या प्रतिबिंबींही. ॥ ६४५ ॥ दृष्टांत तितका एकदेशी; । तत्त्व तेंची, जें निगम उपदेशी; । तें जैसें, तैसें दृष्टांतलेशीं. । हृदयीं धरावें. ॥ ६४६ ॥ दृष्टांत बोलती स्वयें वेद । ते सर्वसाम्य पाहतां देती खेद । जैसा मातीस घटादि रचनेसीं अभेद । ब्रह्मप्रपंचअभेद वेद ऐसा बोलती. ॥ ६४७ ॥ मान्य करावे वेद । सर्वत्र अनुभवावा अभेद । विना दृष्टांत न तुटे खेद । परी ते अवघे एकदेशी. ॥ ६४८ ॥ एवंच सचेतनीं स्फुरे चैतन्य जैसें । त्याच्या प्रतिबिंबींही स्फुरे चैतन्य तैसें । कोणी म्हणतील, कीं ओळखावें कैसें ? । म्हणूनी उपमेस आणिले अचेतन शवप्रतिबिंब. ॥ ६४९ ॥ कीं न स्फुरे अचेतनीं । तद्विलक्षण स्फुरे बिंब अवलंबूनी । तैसें रूपीं अरूप स्फुरे अवलंबूनी । प्रतिबिंब. ॥ ६५० ॥ हें दृष्टांतीं जालें जैसें । दार्ष्टांतिकींही सिद्ध जाले तैसें । बिंबीं ईश्वरीं विद्या समरसे । अविद्या समरसे प्रतिबिंबीं जीवीं चैतन्यीं. ॥ ६५१ ॥ हें वेदपुराणांचें रहस्य अत्यंत । विरळ विचार करिती येथपर्यंत । बोलिले व्यासशुकमैत्रेयादि पूर्वील संत । शास्त्रज्ञ अनुभवी कलियुगीं बोलती. ॥ ६५२ ॥ चिदाभासास भोक्तृत्व । म्हणूनी संस्कृत ग्रंथीं ते बोलिलें तत्त्व । प्राकृत ग्रंथीं करिती अप्रमाणत्व । त्यांस आणि वेदास कोण मानी ? ॥ ६५३ ॥ श्रवण नसोनी येथपर्यंत । प्राकृतग्रंथकारांतही जे म्हणावे संत । ते या प्रकरणीं यत्न अत्यंत । करूनी हा प्रसंग वाखाणिती. ॥ ६५४ ॥ हा अंश प्रतिबिंबरीती । न जाणोनी व्यापकत्वेंची वर्णिती । हा देह सोडोनी देहांतराप्रती । उत्क्रमण करितो ऐसें श्लोकीं पुढिलिया. ॥ ६५५ ॥ ते अवघें विपरीत । वाखाणिती कीं मानिला सर्वगत । सर्वगत म्हणतां विरुद्ध अत्यंत । उत्क्रमण त्याचें देहापासुनी. ॥ ६५६ ॥ ते त्यांची वैखरी । प्रतिपद विरुद्ध, परी । ग्रंथ वाढतो, आतां यावरी । बोलों उत्तरश्लोकाची यथार्थदीपिका. ॥ ६५७ ॥

**उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ।**
**विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥**

कैसा देह सोडोनी जातो ? । आणि कैसा देहीं असतो ? । आणि कैसा भोग भोगितो ? । आणि कैसा समवेत त्रिगुणेंकरूनी ? ॥ ६५८ ॥ विमूढ एशातें न पाहती । पाहाती ते ज्यांस ज्ञानचक्षु असती । ऐसें बोले श्रीपती । कीं ज्ञानी तेची जे जाणती भोक्ता चिदंश. ॥ ६५९ ॥ घटजळ घटांतरीं । निघताची त्या घटीं नीरीं । प्रतिबिंबही आकाशही दिसे, यापरी । सत्त्व ज्या देहीं त्या देहीं प्रतिबिंब. ॥ ६६० ॥ प्रारब्ध देहाचें सरतां । पंचभूतांश मात्र

उरतां । उपाधि देहांतरीं रिघतां । उत्क्रम त्यासवें पावे चिदंशीं. ॥ ६६१ ॥ ऐसें उत्क्रमण ज्यातें । त्यांत उत्क्रमणरीती तयातें । न जाणती, जे जडा मनातें । भोक्ता मानिती. ॥ ६६२ ॥ जे व्यापक आत्मा एक मानिती । सुखदुःख मनास वाखाणिती । ते नाना देहीं उत्क्रमणा कैंवी पाहती । चिदंशाचिया ! ॥ ६६३ ॥ हें अज्ञ शरीराचें उत्क्रमण । जे जितांच ब्रह्म आपण । त्यांस न दिसे त्याचें भिन्नपण । तेची उत्क्रमण तें पाहती. ॥ ६६४॥ कीं सर्वगत बिंब । एकेची देहीं प्रतिबिंब । सत्त्व जळाचा अवलंब । ज्या चिदंशातें. ॥ ६६५ ॥ तें सत्त्व अनुभवी जें बिंब । सर्वत्र देखे बिंबावलंब । तेव्हां न लागतां विलंब । प्रतिबिंब बिंबीं मिळतसे. ॥ ६६६ ॥ तट नदीचें बिंब । ज्या जळीं ज्याचें प्रतिबिंब । तें तट न स्पर्शतां जळ विलंब । बिंब प्रतिबिंब एकत्वीं. ॥ ६६७॥ प्रतिबिंब न दिसे जळीं । ऐसा चिदंश केवळीं । ध्यानीं मिळे, जेव्हां सकळीं । चिदात्मा स्फुरे तेंची उत्क्रमण. ॥ ६६८ ॥ असो आतां देहींचि[1] तो । तोंवरी कैसा शरीरीं असतो? । बुद्धीस कैसा दिसतो? । हेंही विमूढां कळेना. ॥ ६६९ ॥ असोनीही ज्ञान । येविषयीं नाहीं समाधान । समाधान मानिले तें अज्ञान । तें विमूढ, विशिष्ट होऊनी मूढ, जाणावे. ॥ ६७० ॥ कीं आत्मा गुरुमुखें समजले । तें चित्स्वरूप समजोनी धाले । ग्रंथ केले, शिष्य प्रशिष्य जाले । आणि भोक्ता म्हणती मना जडा गुणा प्रकृतीच्या. ॥ ६७१ ॥ सुखदुःखबंध आपणा नसे । तरी मोक्ष आपणाते इच्छिती कैसे? । विवेकी होऊनी ऐसे । विचार त्यांला न कळती. ॥ ६७२ ॥ कीं भोग ज्याला । ब्रह्म मानिलें त्याला । त्यास भोग जेव्हां मानिला । तेव्हां उडाले त्याचे ब्रह्मत्व. ॥ ६७३ ॥ म्हणूनी भोग मना । बोलणें लागलें त्या जना । बिंब प्रतिबिंब वेदोक्त रचना । प्राकृता ग्रंथीं नसे यालागीं. ॥ ६७४ ॥ मूळ ग्रंथ वाखाणिती । तेव्हां प्रतिबिंबत्वही वर्णिती । आणि सुखदुःखभोग मानिती । मना, न कळतां प्रतिबिंब. ॥ ६७५ ॥ कीं बिंब प्रतिबिंब दोनी । चैतन्यें सारखीं म्हणोनी । आणि एकची बुद्धीकरूनी । भोग आणि अनुभव. ॥ ६७६ ॥ जें सर्वगत चैतन्य दिसे । त्यास भोग म्हणती कैसें ? । भोक्ता अंश न गवसे । ते विशिष्ट होऊनी, मागुती मूढ. ॥६७७॥ वाटे सासरेंच माहेर । एकची भोगीं अनुभवीं आंत बाहेर । देहींच भोक्ता आणि सचराचर । व्यापी त्याचा अनुभव हें कळेना. ॥ ६७८ ॥ अविद्या होती तोंवरी । कांहींच न कळे आणि तदु-

[1] १. 'देहीं जितो' असा पाठ आढळतो.

परी । आत्मा कळला तरी । भोक्ता न कळला. ॥ ६७९ ॥ तो जरी ठायीं पडे । तरी भोक्तृत्व न जाय जडवृत्तीकडे । मग भोगावरूनी सांपडे । भोक्ता देहीं ऐसा आहे म्हणोनी. ॥ ६८० ॥ देहीं आहे कैसा । भोक्ता न पाहती भोगासरिसा । ते विशिष्ट, परी ठसा । मूढपणाचा असे बुद्धींत. ॥ ६८१ ॥ या श्लोकीं म्हणे श्रीपती । "**स्थितं वापि विमूढा नानुपश्यंति**" । कीं देहीं आहे जे रीती । ते रीती, जे विमूढ, न पाहाती तयातें. ॥ ६८२ ॥ दीपें गृह अवघें प्रकाशिलें । आणि अंधकार त्याच खालें । ऐसें तें विशिष्ट, परी राहिलें । मूढत्व त्यांच्या बुद्धींत. ॥ ६८३ ॥ एवं तेची नव्हती मूढ । जें हें रहस्य जाणती गूढ । भोगी चिदंश लक्षिती प्रौढ । अनुभविती जडतरंगीं चित्सिंधू.॥६८४॥ गृह दीपें प्रकाशिलें सकळ । त्या दीपाखालींच जळ । त्या जळांतही प्रकाश दीपाचाच अचळ । परी त्यामध्यें प्रतिबिंब हाले जळ हालतां. ॥ ६८५ ॥ नेत्रची पाहती दीपातें । नेत्रची पाहती प्रतिबिंबातें । तैसी बुद्धि सर्वत्र अनुभवी बिंबातें । पाहे भोगी प्रतिबिंबा चिदंशास देहींच. ॥ ६८६ ॥ यावरूनी देहीं भोक्ता दिसे । तेव्हां कळे कीं ऐसा असे । मन भोक्ता म्हणतां, केंवी गवसे । ऐसा असे म्हणोनी. ॥ ६८७ ॥ ऐसाच कर्मभोग भोगितां । भोगीं सुखदुःखप्रतीति होतां । बुद्धि प्रतिबिंबयुक्त आहे आतां । कीं मी सुखी, मी दुःखी, या प्रत्यया जाणतसे. ॥ ६८८ ॥ देहींच हे प्रतीती । ज्ञानदृष्टी पाहती । देहीं आणि सर्वत्र त्यांची मती । नुसतेंची अनुभवी आत्मत्व. ॥ ६८९ ॥ अनुभवीं देखे अभोक्ता । भोगीं देखे भोक्ता । चैतन्य दोनी त्या जीवन्मुक्ता । दिसती एकत्वेंभिन्नत्वेंकरूनी. ॥ ६९० ॥ जे मनास भोक्तेपण । मानिती, ते हें लक्षण । नेणती, म्हणे कमलेक्षण । "**भुंजानं वा विमूढा नानुपश्यंति.**" ॥ ६९१ ॥ जे प्रतिबिंबातें न जाणती । ते यातें व्यापक म्हणोनी म्हणती । ते उत्क्रमण आणि भोग येथें वाखाणिती । मन घे म्हणोनी.॥६९२॥ म्हणती उत्क्रमण याला नसे । देह सोडूनी गेलासा दिसे । चेतना चिच्छक्ति जातां, चित्स्फूर्ति जेव्हां न गवसे । तेव्हां गेला म्हणोनी भिती, म्हणे, मूढ. ॥ ६९३ ॥ ऐसेंच भोक्तृत्वही उडविती । परी हीं दोन्ही सांगे यदुपती । सत्त्वींच घडती म्हणोनी मागती । येथें कोणी न पाहती विमूढ. ॥ ६९४ ॥ "**शरीरं यदवाप्नोति । यच्चाप्युत्क्रामति । ईश्वरो गृहीत्वैतानि संयाति**" । ऐसें देह सोडूनी जातो म्हणोनी स्पष्ट बोलिला. ॥ ६९५॥ कीं अंश माझा जें शरीर सोडितो । आणि ज्या शरीरास हा ईश्वरांश

---

१. प्राप्त होय. कळे. उमजे.

पावतो । तेथूनी त्या देहाप्रति घेऊनी जातो । मनातें इंद्रियांदिकांतें. ॥ ६९६ ॥ **"गृहीत्वैतानि संयाति"** । म्हणजे घेऊन यांतें जातो म्हणे **श्री**पती । ते येथें म्हणे कीं ज्ञानीच पाहती । न पाहती जे येविपर्यी विमूढ. ॥ ६९७ ॥ कीं प्रतिबिंबाश हा म्हणोनी । ते जाणती शास्त्ररहस्य अनुभवेंकरूनी । तेच जाणती ज्ञानचक्षु अवलंबुनी । न जाणती विमूढ. ॥ ६९८ ॥ जिहीं मानिला हाची सर्वगत । त्यास याचें उत्क्रमण न कळे निश्चित । दर्पणासवें असे फिरत । जे त्या दर्पणीं प्रतिबिंब गगनाचें. ॥ ६९९ ॥ हें **प्राकृत** ग्रंथीं नसे । म्हणोनी जे **भ**गवत बोलतसे । त्याचा अर्थ त्याच्या टीकेत इतका स्पष्ट दिसे । कीं **"विमूढा नानुपश्यंति."** ॥ ७०० ॥ उत्क्रमण मागें स्पष्टतर । आणि देहांतरास जातो हा ईश्वर । ऐसे मागें बोलूनी **स**र्वेश्वर । येथें म्हणे हे न पाहती, जे विमूढ. ॥ ७०१ ॥ ऐसेंची **"श्रोत्रं चक्षुस्पर्शनं च"** या श्लोकीं । **दे**व स्पष्ट बोलिला कीं । जो माझा अंश जीव जाला जीवलोकीं । तो विषय सेवितो अधिष्ठूनी इंद्रियांमनातें. ॥ ७०२ ॥ असो तें; आता गुणान्वित । **आ**त्मा कैसा? हेही **भ**गवत । म्हणे न पाहती, जे अन्यत । विशिष्ट होऊनी विमूढ, ते.॥ ७०३ ॥ गुण जड आणि अंश **चै**तन्य । लक्षण एकाहूनी एकाचें अन्य । परी घातली ग्रंथि अन्योन्य । अहंकारें. ॥ ७०४ ॥ जोंवरी नसे भोगसमय । तोंवरी बुद्धि बिंबमय । **चि**दात्मप्रतीति ऐसी अद्वय । अहंप्रत्यय तेव्हां असेना. ॥ ७०५ ॥ रज्जु दृष्टि पाहे । तेव्हा सर्प कोठे आहे? । लेश अहंप्रत्ययाचा न वाहे । बुद्धि सर्वात्मता पाहता. ॥ ७०६ ॥ तेव्हां इंद्रिये आणि विषय । असोनी याचा प्रत्यय । काठिण्य गाराचें जळमय । बुद्धि गुण ऐसे देखे **आ**त्मत्वें. ॥ ७०७ ॥ बुद्धि ऐसी गुणातीत । तेव्हा भोक्ता कैचा गुणान्वित? । स्वदेहासहित अन्यत । अनंतची अवघा. ॥ ७०८ ॥ अखंड **आ**त्मकनकीच दृष्टी । अलंकार देखे सर्व सृष्टी । ऐसी आनंदाची पुष्टी । तेव्हा कोठे भोक्ता गुणान्वित? ॥ ७०९ ॥ तरु तीरींच्या[1] तीरीं । भरतें येतां बुडे नीरीं । प्रतिबिंबाचा उपाधि बिंबावरी । पसरता कैचें प्रतिबिंब? ॥ ७१० ॥ नदीस चढतां नीर । ज्या नीरीं प्रतिबिंबले ते तीर । तीर बुडतां नसे उशीर । प्रतिबिंबास बिंबीं मिळावया. ॥ ७११ ॥ ऐसी अनुभवी बुद्धी । आणि **चि**दंशास बिंबैक्यसिद्धी । तथापि **वे**दीं **वे**दांतीं प्रसिद्धी । कीं भोगेंची क्षय प्रारब्धाचा. ॥ ७१२ ॥ भोग न घडे **प्र**कृतीच्या गुणा । जडा मना त्या बोलिल्याच खुणा । तो भोक्ता **चि**दंश ठावा सगुणा । जो **"ममैवांशो"** म्हणतसे.

१. 'तरीच्या' असा पाठ आढळतो.

॥ ७१३ ॥ तो भोगाचा येतां समय । भोगीं धरूनी अहंप्रत्यय । अकस्मात् होय गुणमय । तो पूर्वसंस्कार जडचैतन्यग्रंथीचा. ॥७१४॥ जडाजडग्रंथिमूळ । ते अविद्या गेली जरी केवळ । वारा शमोनी डळमळ । उरली दिसे शाखापल्लवीं तरूच्या. ॥ ७१५ ॥ तैसा जडाजडग्रथिसंस्कार । भोगीं उमटे अहंकार । मी सुखी, मी दुःखी, एतत्प्रकार । प्रत्यय प्रारब्ध उपजवी. ॥ ७१६ ॥ कीं कर्म मी कर्त्ता खरा । ऐसाच पूर्वकर्माचा पसारा । प्रारब्ध जाला, तो ज्ञान जालियाही नरा । मी भोक्ता ऐसा प्रत्यय उपजवी. ॥ ७१७ ॥ सुख दुःख देहा इंद्रिया । होतां, भोग अंशभोक्तया । होय, तेव्हां आपण सुखी दुःखी या प्रत्यया । ढकलिलें, तरी ढकलेना. ॥ ७१८ ॥ ऐसा गुणान्वित । कीं प्रारब्ध भोगावीण न मरे निश्चित । भोग तरी, जरी प्रतीत । होतीं सुखदुःखें. ॥ ७१९ ॥ सुखदुःखप्रत्यय । मी सुखी. मी दुःखी, ऐसा अहमय । या प्रत्ययाविणें क्षय । नव्हे प्रारब्धकर्माचा. ॥ ७२० ॥ ज्ञानियासही भोग । न घडे विना चिदंशयोग । कोठे दुःखातीत ज्ञानी? ऐसा प्रसग । तो बिबात्मयाच्या अनुभवे जाणावा. ॥ ७२१ ॥ परतु चिदंशबुद्धियोग । घडे होतां प्रारब्धभोग । त्या भोगीं बुद्धि घे सोंग । पूर्वसंस्कारे अहप्रत्ययाचें. ॥ ७२२ ॥ चिदंश तेव्हां गुणान्वित । जरी बुद्धि चिन्मय जाली गुणातीत । ते बुद्धि भोगी अहप्रत्ययासहित । चिदंशयोगे म्हणे, 'मी सुखी, मी दुःखी.' ॥ ७२३ ॥ ज्यांस ज्ञानचक्षु ऐसे असती । तेचि इतकिया प्रकारे चिदंशा भोक्तयातें देखती । आणि ज्ञानचक्षु असोनिही न पाहती । विशिष्ट होऊनी ते विमूढ. ॥ ७२४ ॥ हें पुढलियाच श्लोकीं । भगवंत स्पष्ट बोलेल कीं । यत्न करणारे योगीही या श्लोकीं । देहींच देखती या चिदंशातें. ॥ ७२५ ॥ कीं प्रारब्ध कर्माचें जालें । ते या चिदंशयोगें अहंकारेंची होऊनी आलें । जेसें केलें तेसें भोगणें लागलें । ज्ञान जालियाही त्या अहंकारयोगेची त्या चिदंशातें. ॥ ७२६ ॥ याही श्लोकीं देव बोलिला । कीं ज्ञानचक्षु असे ज्यांला । तेची भोगितां गुणान्वित होतां, या चिदंशाला । ज्ञानदृष्टीं अनुभवी पाहती. ॥ ७२७ ॥ ज्ञानचक्षु असोनी । विशिष्ट ऐसे होउनी । जे न पाहती, तेही मूढ म्हणोनी । "विमूढा नानुपश्यंति" म्हणतसे. ॥ ७२८ ॥ ज्ञानचक्षुशब्दाचा दोहींकडे । ये रीती अन्वय घडे । हा तत्त्वार्थ त्यांतेंची उघडे । जे पाहती ज्ञानचक्षूनें चिदंशातें. ॥७२९॥ **"अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते । भुंजानं वा"** म्हणून ही भगवद्वाणी बोलते । आणि मनइंद्रियें अधिष्ठूनी अंश भोगितो म्हणते । हे गीता भगवदंशातें. ॥ ७३० ॥ ऐशाच श्रुती । ऐसींच पुराणेंही बोलती । ऐसें.

असोनी भोग मानिती । जडा मना गुणा प्रकृतीच्या. ॥ ७३१ ॥ हें प्रमाण-प्रसिद्ध । आणि युक्तीकरूनीही हेंची होतें सिद्ध । कीं तोची मोक्ष पावे, जो बद्ध । बंध तोची कीं भोग दुःखाचा. ॥ ७३२ ॥ जें सुख विषयजन्नित । तेंही दुःखची निश्चित । सुख तों तेंची शाश्वत । न उपजे दुःख ज्या सुखीं. ॥ ७३३ ॥ मानूनी पुष्पाची माळ । गळां घातला व्याळ । तो कंठींच दंश करितां तत्काळ । लहरिया येती विषाच्या. ॥७३४॥ एव बद्ध सुखदुःखभोग । हाची अविद्येचा अनादि रोग । भोक्ता चिदंश त्यासी संयोग । इंद्रियांचा, तैसा मनाचा. ॥ ७३५ ॥ "श्रोत्रं चक्षुस्पर्शनं च । रसनं घ्राणमेव च । अधिष्ठाय मनश्च अयं विषयानुपसेवते" म्हणूनी देव म्हणे. ॥ ७३६ ॥ ऐसें स्पष्ट असोनी । न जाणती ज्ञानीही होउनी । मनातें बंध म्हणोनी । बहुत बोलती या कलियुगांत. ॥ ७३७ ॥ विमूढशब्देंकरूनी । गूढार्थ ऐसा सुचवुनी । सिद्धांत केला, कीं विशिष्ट होउनी । ते मूढ, जे न जाणती या चिदंशातें. ॥ ७३८ ॥ विशिष्ट होऊनी मूढ । या भावें म्हणे विमूढ । परंतु हा अर्थ अत्यत गूढ । म्हणूनी स्पष्टही आतां बोलतो. ॥ ७३९ ॥ आणि ज्ञान जालियावरी । चिदश कैंचा तदुपरी ? । ऐसी शंका, तेंही हरी । परिहरी ऐसें आर्धी या श्लोकीं बोलतो. ॥ ७४० ॥

**यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् ।**

**यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥ ११ ॥**

अगा! यत्न करणार योगी । तेही देहीं या अशालागीं । पाहती कीं प्रारब्धभोगीं । सर्वगत चैतन्य लक्षिती, तें नव्हे, हा तदंश. ॥ ७४१ ॥ आणि भोग तों जडा मना । कदापि कोणे रीती घडेना । तेव्हां भोगीं चैतन्य सांपडेना । या अंशावांचुनी. ॥ ७४२ ॥ ऐसे योगी यत्नशीळ । यातें पाहती, म्हणे मेघनीळ । आणि यत्नशीळ योगीही केवळ । यातें न पाहती. ॥७४३ ॥ ते बुद्धिहीनची जाणावे । तरी यत्नशीळ योगीही कैसे म्हणावे । याकारणें म्हणे गणावे । अकृतात्मे म्हणोनी. ॥ ७४४ ॥ "अचेतसः" म्हणिजे बुद्धिहीन । ऐसें म्हणे जगज्जीवन । परी ते नव्हती मूढजन । कीं जे मूढ, केवळ अंधचि ते. ॥ ७४५ ॥ जे अविद्यावृत । ते अंधची निश्चित । जरी विरक्त शास्त्रज्ञ पंडित । अंधची ते. ॥ ७४६ ॥ गर्भांध सर्व विद्या जाणे । तो रत्नाची परीक्षा नेणे । जो सर्वज्ञ, तोतों ऐसें न म्हणे । एव आत्मा कळोनी अंश न कळे, तो अबुद्धी. ॥ ७४७ ॥ कीं नाक धरितां मुखाचें । नाक सांपडे प्रतिमुखाचें । नाक मुखाचें धरूनी प्रतिबिंबाचें । नाक धरिलें न देखती, तें नवल. ॥ ७४८ ॥

नाक नाहींच धरिलें मुखाचें । त्यास नाक धरिलें दिसेना प्रतिमुखाचें । त्यास तें धरिलें दिसे म्हणोनी मूढत्व त्यांचें । न वर्णी जो **सर्वज्ञ.** ॥ ७४९ ॥ स्वरूप कळे बिंबाचें । ज्ञान त्यालाच प्रतिबिंबाचें । अंश नेणती हेंची आश्चर्य आणिकाचें । न वाटे ज्ञानियांवांचूनी. ॥ ७५० ॥ मुखाचें नाक धरी । आणि प्रतिबिंबाचें धरिलें न देखे जरी । आश्चर्य मानावें तरी । तयाचें. ॥ ७५१ ॥ आणि पूर्वश्लोकीं । उत्तमश्लोक बोलिला कीं । उत्क्रमण आणि भोक्ता चिदंश या लोकीं । हें ज्ञानी न पाहती विमूढ. ॥ ७५२ ॥ तरी अविद्या गेलियाधीण । न कळतां सर्वगत अद्वयपण । ज्याची न कळे कदापि खूण । हें आपणची बोलिला. ॥ ७५३ ॥ त्यास अविद्य जन । न पाहती, ऐसें सर्वज्ञ कमलनयन । बोलेल अयुक्त वचन । हें न घडे. ॥ ७५४ ॥ जे बहुत देखोनी निपुण । ते न जाणती रत्नाची खूण । अंध परीक्षा नेणती, जरी प्रवीण । जो सर्वज्ञ, तोतों ऐसें बोलेना. ॥ ७५५ ॥ कीं रत्नची दृष्टीं न पडे । तो अंध रत्नपारखी नव्हे, म्हणती तेच वेडे । कीं ज्यांस ज्ञानचक्षु त्यांजकडे । जाणणें याचें लागलें. ॥ ७५६ ॥ हें पूर्वश्लोकीं निवडिलें । **"पश्यंति ज्ञानचक्षुषः"** ऐसें जेव्हां बोलिलें । विशद बोलणें तेंची घडलें । या श्लोकीं. ॥ ७५७ ॥ एवच ज्ञान असोनी । जे न पाहती, ते **'अचेतसः'** अबुद्धि म्हणोनी । भगवंत म्हणतो. हें कलियुगीं वर्तत असोनी । कां 'न' म्हणावें ? ॥ ७५८ ॥ कीं जे अनुभवें धाले । शिष्यप्रशिष्यसंप्रदाय चालत आले । आणि ग्रंथीं त्यांचे लेख जाले । कीं भोग सुखदुःखांचा मनातें. ॥ ७५९ ॥ प्रत्यक्ष हें दिसत असोनी । हें ज्ञानियास न कळे म्हणे म्हणोनी । कां संदेह ये रीतीकरूनी । ये स्थळीं मानावा. ॥ ७६० ॥ भोग म्हणती मना । हें तों संमत नव्हे गरुडगमना । यालागीं ऐशिया बुद्धजना । अबुद्धि म्हणतो म्हणूनी म्हणतां कां म्यावें? ॥ ७६१ ॥ परी अचेतस म्हणिजे अबुद्धी । म्हणतां, नाहीं ह्मणावी विद्यात्मिका बुद्धी । तरी जों नाहीं विद्यासमृद्धी । तों या अंशातें न जाणती, म्हणणें अयुक्त. ॥ ७६२ ॥ म्हणूनी **"अकृतात्मानो"** म्हणोनी । म्हणे या शब्देंकरूनी । अर्थ ऐसा या वचनीं । सुचवितसे. ॥ ७६३ ॥ कीं आत्मशब्दें बुद्धिवृत्ती । ते नाहीं केली म्हणजे संदेहनिवृत्ती । नाहीं केली, जरी निवृत्ती, । धरिली आणि ज्ञानही जालें. ॥ ७६४ ॥ कीं **"यतंतोपि"** म्हणोनी । यत्न करणार योगी होउनी । बुद्धि निःसंदेह या अंशज्ञानेंकरूनी । केली नाहीं, ते **"अकृतात्मानो"** म्हणों ये. ॥ ७६५ ॥ कीं यत्न करणार योगी पाहती । म्हणूनी आधीं बोलोनी श्रीपती । मग **"यतंतोप्यकृतात्मानो**

**नैनं पश्यंति**" । या **अपि**शब्दें योगीच परी अकृतात्मे म्हणावे. ॥ ७६६ ॥ याचकरितां ते अबुद्धी । कीं या **गी**तेंत ऐसी ज्या अशाचा प्रसिद्धी । त्यातें न पाहतां, नाहीं 'सिद्धी । संशयनिवृत्तीची तयांतें. ॥ ७६७ ॥ एवंच पूर्वार्धें-करूनी । यत्नशीळ योगीही यातें देहीं पाहती म्हणोनी । बोलतां, स्पष्ट केलें यावरूनी । कीं प्रारब्धभोगीं ज्ञानीही पाहती **चि**दंश. ॥ ७६८ ॥ आणि या मार्गीं प्रौढ । तऱ्ही ते विशिष्ट होऊनीही मूढ । ज्यांस याचें भोक्तृत्व राहिलें गूढ । न कळतां, शास्त्रीं प्रसिद्ध ऐसें असोनी. ॥ ७६९ ॥ हें पूर्वोक्त विमूढत्व उत्तरार्धीं बोलिला । कीं जे मोडोनी अंशा भोक्तयाला । मनास अहंकारास' म्हणती जाला । सुखदुःखभोग. ॥ ७७० ॥ ऐसे हे पांच श्लोक । "**ममैं-वांशो**" येथूनी उत्तमश्लोक । बोलिला याचा अर्थावलोक । स्पष्ट होय ऐसें त्याणेंच वाखाणिलें. ॥ ७७१ ॥ नवल **मा**येची करणी । कीं हे **गी**ता वाचू-नीही अतःकरणीं । हा सशय टेविती, चरणीं । लोळोनिही श्रीगुरूच्या. ॥ ७७२ ॥ **गी**ता, **शा**स्त्रे, **पु**राणें, । **भा**ष्यकार, **टी**काकार, याचप्रमाणें । भोग बोलती **चि**दशासी. ॥ ७७३ ॥ **प्रा**कृत ग्रथकार । न बोलती हा प्रकार । न करितां दूरदृष्टि विचार । भोक्तेपण मनातें बोलती. ॥ ७७४ ॥ एत्र भोक्तेपण प्रतिबिंबांशास । ज्यास भोग, ससारही त्यास । मोक्ष त्यास, की संसारबंध ज्यास । हें न घडे मना जडा गुणा **प्र**कृतीच्या. ॥७७५॥ सिद्धांत ऐसा जाला । प्रसंग मोक्ष बोलतां आला । कीं मोक्ष बोलिला त्याला । ज्याला दुःखभोगरूप संसारबध. ॥ ७७६ ॥ आतां पूर्वानुसधान । "**तद्धाम परमं मम**" म्हणूनी बोलिला **ज**गन्निधान । कीं तें माझे धाम, त्याचे व्याख्यान । पूर्वापर अनुसंधान चालिलें. ॥ ७७७ ॥ जो मी सगुण **आ**त्माराम । त्या माझे ते परम धाम । ऐसें बोलिला **घ**नश्याम । त्यापुढें हे पचश्लोकी **गी**ता चालिली. ॥ ७७८ ॥ तों **अ**र्जुनास सगुणपण । आठवले योगविभूतिलक्षण । जे विषयीं प्रार्थिला **क**मलेक्षण । दशमीं या श्लोकेकरूनी. ॥ ७७९ ॥

दशमाध्यायश्लोकः—**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।**
**भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेमृतम् ॥**

आपला योग, आपल्या विभूती । **ज**नार्दना ! सांग पुन्हा विस्तारें मजप्रती । कीं **हें अमृत** ऐकतां तृप्ती । न वाटे मज. ॥ ७८० ॥ दशमीं ऐसा प्रश्न । करिता जाला **अ**र्जुन । त्यावरूनी **भ**वभजन । योग आणि विभूति बोलिला. ॥ ७८१ ॥ योग अघटितघटना । कीं नसोनी भासे प्रपंचरचना । जे नवमीं

---

१. अ० १०, श्लोक० १८.

दाविली अर्जुना। "पश्य मे योगमैश्वरं" म्हणोनी. ॥ ७८२ ॥ रज्जूंत सर्प दिसे। परी रज्जु सर्पी नसे। कीं नाहींच सर्प, जो मिथ्या भासे। सत्य रज्जु कैंचा सर्पा असत्यांत? ॥ ७८३ ॥ यालागीं तो भुजंगही। पाहतां रज्जूंत नाहीं। ऐसें राजगुह्य जें कांहीं। तें नवमीं बोलिलें.[1] ॥ ७८४ ॥ कीं भूतें मजमध्यें ये रीती। त्या योगासहित विभूती। दशमीं अर्जुनाप्रती। सांगितल्या. ॥ ७८५ ॥ कीं तो योग आणि विभूती। दोन्ही मिळोनी सगुण ब्रह्ममूर्ती। तो बोलिला स्वयें प्रस्तुतीं। कीं "तद्धाम परमं मम." ॥७८६॥ जिथें गेले ते न फिरती। तें धाम ज्याचें, तो हा सगुण विश्वपती। ज्याचा योग आणि विभूती। विश्व अवघे. ॥ ७८७ ॥ ज्याचा योग आणि विभूती। ऐकतां नव्हे तृप्ती। ते थोडियात समाप्ती। केली देवें. ॥ ७८८ ॥ त्या योगाचें आणि विभूतीचें श्रवण। होतां, तृप्ति मानी कवण? । पुन्हा योगाचें आणि विभूतीचें आपण। श्रवण करावे, ऐसें अर्जुन अपेक्षी. ॥ ७८९ ॥ अर्जुन मनीं अपेक्षी। हे लक्षी सर्वसाक्षी। भक्त इच्छिती, तें न उपेक्षी। देवाधिदेव. ॥ ७९० ॥ परी निकट युद्धाचा काळ। आणि श्रवणें होतां सुखसुकाळ। जे युद्ध त्या हातीं करवणें तत्काळ। तें राहतें; ॥ ७९१ ॥ आणि अपेक्षा भक्ताची। पूर्ण करणें हे आपली रीति साची। म्हणूनी संक्षेपें कृपारसाची। वृष्टि करावी, देव म्हणे. ॥ ७९२ ॥ त्यांत पूर्वीं नाहीं बोलिल्या। त्या विभूति सांगों इच्छिल्या। ज्या अर्जुनें नाहीं आइकिल्या। सप्तमीं, दशमींही. ॥ ७९३ ॥ आणि योग आपुला। दशमीं विभूति सांगतां सुचविला। तो संक्षेपें बोलो आरंभिला। आर्धा या श्लोकीं. ॥ ७९४ ॥

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम्।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥

अगा! जें तेज आदित्यगत। आणि जें चंद्रांत। आणि जें अग्नींत। तें माझें तेज असे जगातें प्रकाशितें. ॥ ७९५ ॥ हें अर्जुना! तूं जाण। इतकें जाणतांची तूं सुजाण। माझिया योगाच्या अनुभवीं होसी निपुण। कीं चित्सिंधु एक भासक सर्वा तरंगांचा. ॥ ७९६ ॥ तंतु प्रकाशी सर्वा पटांतें। माती प्रकाशी सर्वा घटांतें। प्रकाशी कुंडलांकटकांमुकुटांतें। सुवर्ण एक. ॥ ७९७ ॥ तेज तें एक, दुसरें नाहीं। जें प्रकाशी सूर्यचंद्रअग्नितेजा इत्यादिकांही। सूर्य, चंद्र, अग्नि, हे तेजें कांहीं। न प्रकाशिती अखिल जगा ॥ ७९८ ॥ सूर्य प्रकाशी

१. अ० ९, श्लोक० ५. २. मर्त्यांत राहणारें.

लोक तीनी । चंद्र, अग्नि प्रकाशिती रजनी । तत्रापि तेजें सर्व प्रकाशती हेंची दोनी । कीं नेत्र आणि रूप. ॥ ॥ ७९९ ॥ सकळां तेजांचा समुदाय । प्रकाशी नयन एकची इंद्रिय । आणि रूप एकची विषय[1]। अखिल प्रकाशक नव्हे सूर्यही. ॥ ८०० ॥ चैतन्यतेजें प्रकाशे आदित्य । चंद्र, अग्नि, यांतें प्रकाशी तेज तेंची सत्य । अखिल जगदलंकार असत्य । याच कनकतेजें प्रकाशती. ॥ ८०१ ॥ अलंकार कनकीं वसे । परी कनक अलंकारीं नसे । कीं तो नसोनी मिथ्या दिसे । एवंच अलंकार कनकीं असेची ना. ॥ ८०२ ॥ ऐसीं भूतें मजमाजी वसती । परी मी नसें त्या भूतीं । तीं भूतेंही मजमाजी नसती । 'पाहें माझा योग ऐश्वर' म्हणूनी भगवद्वाक्य. ॥ ८०३ ॥ नवमीं म्हणे **मत्स्थानि सर्वभूतानि**" । आणि "**न चाहं तेष्ववस्थितः**" म्हणोनी । आणि "**न च मत्स्थानि भूतानि**" । "**पश्य मे योगमैश्वरं**" ॥८०४॥ एवं ऐसी प्रपंचरचना । ऐश्वर योग अघटितघटना । ऐसा नवमीं अर्जुना ! । उपदेशिला योग ऐश्वर. ॥ ८०५ ॥ तोची अर्जुनें दशमीं मागुती । प्रश्न केला कीं योग आणि विभूती । पुन्हा सांग जी जगत्पती । तृप्ति अमृताची मज नसे. ॥८०६॥ तेव्हां विभूति हरी । सांगतां, योगाची सूचना करी । कीं जे विभूति ज्यांत मुख्यत्वें बोले बरी । येर तो योग. ॥८०७॥ आदित्यांत विष्णु आपण । विष्णु विभूतियोग आदित्यांचा गण । ज्योतींत सूर्यास विभूतिपण । योग ज्योति अवघिया. ॥ ८०८ ॥ पांडवांत धनजय । विभूति अन्य पांडवयोग ऐसा निर्णय । सर्वत्र कीं विभूतियोग अवघे भगवंत अद्वय । आणि ज्यांत जो विशेष, ते विभूती. ॥ ८०९ ॥ ऐसा योग, ऐशा विभूती । सांगितल्या जों अध्यायसमाप्ती । परी अर्जुनास नाहीं तृप्ती । श्रवणामृत पितां मुखें सर्वेश्वराच्या. ॥ ८१० ॥ म्हणूनी मागुती । योग आणि विभूती । देखोनी त्यांची श्रवणीं प्रीती । सांगों पाहे. ॥८११॥ पुढिलिया श्लोकापासुनी । "**गामाविश्य च भूतानि**" येथुनी । सांगेल नुसत्या विभूतीच सुचवूनी । या श्लोकीं आधीं योग बोलिला. ॥ ८१२ ॥ योगाची इतकीच सूचना । कीं असोनी नाहीं भूतरचना । सर्व आपणची ऐसी घटना । अघटित घडवितो हा **योग.** ॥ ८१३ ॥ कीं प्रपंच एवढा । जो सत्यच वाटे मूढा । तो नाहींच हा अनुभव ज्ञानिया प्रौढा । कृपेनें आपल्या होतसे, ऐसें सुचवी. ॥ ८१४ ॥ त्याची एकची खूण । कीं ज्या स्वप्रकाशातें प्रकाशपण । त्याकरितां प्रकाशती भूतें आणि त्याविण । कांहींच नसती, पाहतां. ॥ ८१५ ॥ त्यास म्हणावें तेज । तें तेज चित्स्व-

---

1. अ० ९, श्लो० ५.

रूप सहज । सूर्यादितेजें जडें, हा उमज । व्हावा, म्हणूनी बोलिलों या श्लोकीं. ॥ ८१६ ॥ परी हा अर्थ अकळ । जडब्रह्मैक्य जाणती विरळ । जडनिषेधें आत्मा जाणोनी इतकेंच कुशळ । ते हा अर्थ न जाणती. ॥ ८१७ ॥ ते म्हणती आदित्यगत । जें तेज असे अखिल जगातें प्रकाशीत । आणि जें चंद्रांत, जें अग्नींत । तें तेज माझें जाण म्हणोनी. ॥ ९१८ ॥ त्यांची दृष्टि आलीकडे । सूर्याच्या तेजाचवरी पडे । हें तेज माझें म्हणतां अर्थ निवडे । परी विरोध न पाहती या अर्थी. ॥ ८१९ ॥ पांडित्यबळें आत्मज्ञानी । अर्थ ऐसा करिती म्हणोनी । तो अर्थ न घडे ज्या विरोधेंकरूनी । तो विरोध येथें सर्वज्ञ बोलिला. ॥ ८२० ॥ विपरीत अर्थी विरोध । आणि आपण जें बोलतों त्याचा तत्त्वबोध । जे अनुभवी करिती शोध । त्यांतेंची समजे, ऐसें द्वितीय चरणीं बोलतो. ॥ ८२१ ॥

द्वितीयचरणः—**जगद्भासयतेऽखिलम् ।**

अखिल जगातें प्रकाशितें । व्याख्यान इतकेंच याचें होतें । अल्पदृष्टीं पाहतां लागतें । आदित्याकडे हें वचन. ॥ ८२२ ॥ **"यदादित्यगतं तेजो"** हा प्रथम चरण । **"जगद्भासयतेऽखिलम्"** हा द्वितीय चरण । जें आदित्यगत तेज त्याचें विवरण । **"जगद्भासयतेऽखिलम्"** ऐसें मानिती. ॥ ८२३ ॥ आदित्यगत तेज सर्वा जगातें । प्रकाशितें, ठाउकें हें सर्वा जगातें । न वाटे विरुद्ध कोणातें । त्यांस त्या टीका प्रमाण वाटती. ॥ ८२४ ॥ तरी म्हणतां **'जगद् अखिल'** । 'अशेष जग' म्हणे घननीळ । सकळ इंद्रियें विषय सकळ । मिळोनी अखिल जग होतसे. ॥ ८२५ ॥ जें न प्रकाशी रविमंडळ । तेंची म्हणावें उरलें **खिल** । तेव्हां जग अखिल । कैसें या आदित्यगत तेजें प्रकाशिलें. ॥ ८२६ ॥ तरी पांच विषय । एका एकास जाणे एक एक इंद्रिय । त्यांत एक रूप, एक नेत्र, दोहोंचा प्रत्यय । आदित्य, चंद्र, अग्नि, यांकरितां. ॥ ८२७ ॥ यांहीवेगळे वरकड । विद्युल्लता नक्षत्रांचे घड । नाना रत्नें इत्यादि तेज जड । दों वेगळें काय भासवी म्हणावें. ॥ ८२८ ॥ तेजावेगळा शब्द कर्णी न कळे । कीं स्पर्श त्वचेतें न आदळे । कीं घ्राणीं गंध न कळे । न गिळे रसनेस रस. ॥ ८२९ ॥ तेजावांचूनी पाय मोडती? । कीं वाचासी मौनें पडती? । कीं कांहीं घेतां हात दडती । कक्षेमध्यें? ॥ ८३० ॥ कीं नव्हे मळमूत्राचा त्याग? । कीं अंधकारीं न घडे स्त्रीसंभोग? । नेत्र रूपावेगळा कोण योग । न घडे आदित्यचंद्रअग्नीवांचूनी? ॥ ८३१ ॥ आतां, नेत्र, रूप, हीं दोन्ही । अंगीकेलीं तेजें प्रकाशती म्हणोनी । परी तमाचें रूप

नेत्रेंकरूनी । दिसतची असे. ॥ ८३२ ॥ जें झांकलें वस्त्रेंकरूनी । तें न दिसे तरी दिसेच वस्त्र नयनीं । तैसें तमें झांकलें रूपमात्र म्हणोनी । न दिसे, परंतु तम दिसे. ॥ ८३३ ॥ आतां सूर्य नेत्राभिमानी । तम दिसतें तो नेत्रीं असे म्हणोनी । तरी तम तों सूर्यतेजेंकरूनी । प्रकाशलें नाहीं. ॥ ८३४ ॥ नेत्रीं आहे जैसा । अंधकारांतही जरी नसे तैसा । तरी अंधकार नेत्रांत कैसा । गोचर होय? ॥ ८३५ ॥ सूर्यें प्रकाशिले दिवसा नेत्र । आणि अंधकारीं घरांत पात्र । तें न दिसे, हें तों मनुष्यमात्र । प्रत्यक्ष जाणत असे. ॥ ८३६ ॥ तमीं सूर्य असता । तरी अंधकारची नासता । आणि नेत्रीं तम पाहतां । कां नेत्राभिमानी न नाशी तमातें? ॥ ८३७ ॥ एव सूर्यरूप देवता । नेत्राभिमानी तत्त्वता । तेजोमंडलरूप नेत्रीं असता । तरी तो नाशिताच डोके उघडितां तमातें. ॥ ८३८ ॥ हें एकीकडे असो । नेत्राभिमानी रवीकरितां तम दिसो । परी आम्हांस अखिल विश्व तों भासो । सूर्यचंद्रअग्नीसहित त्यांवांचुनी. ॥ ८३९ ॥ एवं तेज आदित्यगत । तें हें नव्हे जें नेत्रां असे दिसत । हें तेजची आदित्य निश्चित । आदित्यगत तें अतींद्रिय वेगळें. ॥ ८४० ॥ तेजोरूप आदित्यमंडळ । तेजोरूप चंद्र, अनळ, । आदित्यगत आणि चंद्रांत अग्नींत जें तेज केवळ । तें चित्स्वरूप उपादानकारण या तेजाचें. ॥ ८४१ ॥ तेंची अखिल जगाचें भासक । तें उपासिती ज्ञानी उपासक । तें तेज रज्जुसूर्यादितेजांसही प्रकाशक । अखिल जगत्सर्पाचें. ॥ ८४२ ॥ मुख्य हाची अर्थ । भगवत बोले परमार्थ । **यथार्थदीपिके**मध्यें ऐसा यथार्थ । आतां ओंवीरूप अन्वय ऐसा या श्लोकीं पदांचा. ॥ ८४३ ॥ **"आदित्यगतं तेजो यत् । यच्चंद्रमसि अग्नौ च यत् । अखिलं जगद्भासयते तत् । तेजो विद्धि मामकम्"** ॥ ८४४ ॥ जें आदित्यतेजोमंडलगत । जें चंद्रांत, जें अग्नींत, । तें अखिल जगातें असे प्रकाशित । तेज माझें जाण, अर्जुना! ॥ ८४५ ॥ आणि **'यच्चाग्नौ'** या वचनीं । जो चकार त्या चकारेंकरूनी । इतर सर्वही तेजें सुचवुनी । बोलतसे जाणावें. ॥ ८४६ ॥ कीं सर्वप्रकाशक चित्सत्ता । सांगतां श्रोतयांच्या चित्ता । सूर्यादिज्योतिही प्रकाशकनिमित्ता । वाटती. ॥ ८४७ ॥ म्हणूनी आधीं सकळ ज्योति । त्या त्या ज्योतीचीही प्रकाशस्फूर्ती । ते चित्सत्ता माझी अमूर्त मूर्ती । अखिल जगातें प्रकाशिते. ॥ ८४८ ॥ जैसे देशाधिकारी रायाचे । त्या त्या देशीं वाटती राजेच साचे । त्या देशवासियांस राजा स्ववाचे । आपलें सांगे सर्वाधिपत्य. ॥ ८४९ ॥ तेव्हां आधीं अधिकारी । जे धनी वाटती व्यापारकारी । त्यांचें मुख्यत्व तो आधीं

निवारी । मग इतरांचाही धनी मी म्हणे. ॥ ८५० ॥ ऐशा सूर्यादि सर्व ज्योती । त्यांतही सत्ता माझी म्हणे विश्वपती । मग त्यांसहित सर्वा विवर्तास गती। अधिष्ठानसत्ता माझी म्हणतसे. ॥ ८५१ ॥ यावेगळा बाधित अर्थ । तो नव्हे परमार्थ । ज्यांत धान्य नाहीं, तें व्यर्थ । फोल, तैसें बोलतां हें. ॥ ८५२ ॥ तथापि हे संत । यांस चैतन्य जगदुपादान संमत । परंतु जडा ज्योतीसारिखें ब्रह्म, ऐसें स्वमत । ते तांडव करिती या श्लोकीं. ॥ ८५३ ॥ कीं हें तेज आदित्यगत । जें प्रत्यक्ष इंद्रियां असे दिसत । हें तेज आपलें म्हणतो भगवंत । तेव्हां तेजोरूप ब्रह्म खरें. ॥ ८५४ ॥ मागें यांचीं दूषणें । उदंड बोलिलीं किती बोलणें । गीतेंत इत्यादि दाविती प्रमाणें । कीं तेजें तितकीं तेज भगवंताचें. ॥ ८५५ ॥ तरी या तेजाचेंची नांव आदित्य । यांत तेज दुसरें मानावें अगत्य । तरी या तेजासारिखेंची तेज सत्य । त्यांत कैसें समजावें ? ॥ ८५६ ॥ किंबहुना तेज हेंच जरी म्हणावें । अथवा ऐसेंची जरी गणावें । तेव्हां इंद्रियांस गोचर जाणावें । उडालें वेदोक्त अतींद्रियत्व. ॥८५७॥ आणि अखिल जगद्भासकत्व । कैंचें जडा तेजातें प्रकाशत्व ? । हें विशद बोलिलेंची तत्त्व । इतर टीकाखंडणीं. ॥८५८ ॥ असो, आतां श्रीपती । ऐश्वर योग या श्लोकीं ये रीती । बोलोनी आपल्या विभूती । येथूनी बोलतसे तीं श्लोकीं. ॥ ८५९ ॥

गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।
पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ १३ ॥

अगा ! पृथ्वीमध्यें निघोनी । भूतें धरितों मी स्वबळेंकरूनी । ते धारणाशक्ति विभूति माझी म्हणोनी । जाण, अर्जुना ! हा भाव. ॥ ८६० ॥ कीं पृथ्वीमध्यें निघणें । आणि भूतें बळेंकरूनी धरणें । न म्हणवे हें करणें । अक्रिया चित्स्वरूपाचें. ॥ ८६१ ॥ आतां औषधि चंद्र पाळी । तो सोम मीच वनमाळी । होऊनी पाळितों गहूं चणे साळी । इत्यादि आणि वनौषधिही अवघिया. ॥ ८६२ ॥ रसरूपची केवळ । जें हें दिसतें चंद्रमंडळ । तें मीच होऊनी सकळ । औषधि पाळितों हेही विभूती. ॥ ८६३ ॥

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।
प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ १४ ॥

अगा ! मीच होऊनी वैश्वानर । जें जें प्राणियाचें शरीर । त्या आश्रयें करूनी मी जगदीश्वर । चतुर्विध अन्नें पचवितों. ॥ ८६४ ॥ प्राणेंअपानें-

करूनी । युक्त मीच जठराग्निरूप होऊनी । पचवितों अन्नें, जीं चतुर्विधें म्हणोनी । प्रसिद्ध लोकीं. ॥ ८६५ ॥ एक **भक्ष्य, भोज्य** दुसरें । **लेह्य** म्हणावें तिसरें । **चोष्य** चवथें, यांचें रूप बरें । इतकेंची; ॥ ८६६ ॥ ० कीं दांतें चावावे कुटके । वडे, घारगे, पोळ्या इत्यादि जितके । पदार्थ म्हणावे तितके । भक्ष्य म्हणोनी. ॥८६७ ॥ भोज्य म्हणिजे दांताविणें । जें न चावितां गिळणें । शेवया, बोटवे इत्यादि, चावणें । नलगे जया पायसादिकां. ॥८६८॥ लेह्य म्हणिजे चाटावीं । कढी, सांभारीं, पाक, काकवी, ऐसीं जीं म्हणावीं. । चोष्य म्हणजे चोखूनी टाकावीं । ऊंस, शेगा शेगव्यादिकांच्या. ॥ ८६९ ॥ **प्राण, अपान,** जैसे भाते । आगी उदरांतील दीप्त होते । चतुर्विध पदार्थ प्राणी भक्षिती ते । मीच पचवितों, विभूति तो अग्नी. ॥ ८७० ॥ ऐसे प्रकृतीचे भेद । मुख्य मुख्य बोलती वेद । आपणास तो सर्वांशीं अभेद । म्हणोनी ते ते विभूतिरूपें आपण म्हणतसे. ॥ ८७१ ॥ ऐशा प्रकृतिभागीं विभूती । सांगोनी आतां जगत्पती । चैतन्यभागांतही अर्जुनाप्रती । विभूति सांगों पाहतो. ॥ ८७२ ॥ आणि जीवोपाधि प्राकृता । विभूति सांगतां । ईश्वरोपाधि विभूतीही कुंतीसुता । बोलतसे या श्लोकीं. ॥ ८७३ ॥

**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥**

अगा! सर्वांचिया हृदयांत । बरवियाप्रकारें मी भगवंत । प्रवेशलों असें, ऐसें अनत । प्रथमचरणीं बोलतो. ॥ ८७४ ॥ तरी हा कैसा प्रवेश? । हा विचार करणें लागे लेश । कीं अनंत हृषीकेश । प्रवेश त्याचा केंवी घडे? ॥ ८७५ ॥ आतां घटीं घटाकाश । तोही लेखावा प्रवेश । कीं जें घटीं घातलें त्याचाच घटीं समावेश । म्हणूनी न प्रवेशताही प्रवेश लेखावा. ॥ ८७६ ॥ तरी '**सन्निविष्टो**' म्हणोनी । म्हणे प्रवेशलो मी सम्यक् प्रकारेंकरूनी । तरी बरवे प्रकारें प्रवेश म्हणतो, यावरूनी । तैसा प्रवेश न बोलावे. ॥ ८७७ ॥ दृष्टीस मुख्यार्थ न सांपडे । तेव्हां हे अर्थ चांचपणें पडे । संशयाचा कंप उपडे । तो अर्थ **यथार्थदीपिकें**त जोले भगवत. ॥ ८७८ ॥ कीं अनंत वस्तूंचा प्रवेश । ज्यांत ते हृदय म्हणे हृषीकेश । तेव्हां अंतरहित आकाश । जळीं प्रवेशे तें प्रतिबिंब बोलावें. ॥ ८७९ ॥ तैसें सत्त्व निर्मळ । तेंची अंतःकरण चित्त मन विमळ । तें म्हणावें हृदय, तें जैसें जळ । त्यांत अनंतही प्रवेशे त्याचइतका. ॥ ८८० ॥ जें ज्यात सांठवे । तें त्यांत प्रवेशलें म्हणवे । तें जें प्रवेशलें, तें तों न गणवे । ज्यांत प्रवेशलें अधिक त्याहुनी.

॥ ८८१ ॥ एवंच तो चिदंश जीव जाला । **"ममैवांशो जीवलोके जीवभूतः"** म्हणोनी ज्याला । याच अध्यायांत भगवंत बोले त्याला । सर्वांचिया हृदयांत येथें विभूतिरूपें वर्णितो. ॥ ८८२ ॥ हे चैतन्यभाग विभूती । विभूति अध्यायांतही जगत्पती । **अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयः स्थितः"** या श्लोकीं येच रीती । अर्जुनाप्रति बोलिला. ॥ ८८३ ॥ सर्व भूतांचा आशय । 'मज सुख हो, दुःख न हो,' हा बुद्धिनिश्चय । त्यांत मी आत्मा म्हणतां निर्णय । जीवात्मा सर्वभूतीं, तों मी म्हणोनी. ॥ ८८४ ॥ तरी तो सुखदुःखभोक्ता जीव । तूं तो कैसा होसी देवाधिदेव? । ऐशा संशयाचा ठाव । परी विभूति श्रवणादरें न सुचलाः ॥ ८८५ ॥ सप्तमीं, दशमीं, विभूती । बोलिल्या, त्यावेगळ्या संक्षेपरीती । कांहीं येथें बोलतां, जगत्पती । ते सदेहनिवृत्ति येथें करीतसे. ॥ ८८६ ॥ आणि **"ममैवांशो"** या श्लोकीं । या अध्यायांतही देव बोलिला कीं । माझाच अंश जीवलोकीं । जीव जाला. ॥ ८८७ ॥ तेथेंही विशद । नाहीं बोलिला गोविंद । जें प्रतिबिंबत्वे वेद । आणि इतिहासपुराणें बोलती. ॥ ८८८ ॥ तें येथें देव । बोलतो देवाधिदेव । कीं प्रतिबिंबत्वें मी स्वयमेव । प्रवेशलों हृदयांत सर्वांचिया. ॥ ८८९ ॥ मागें पंचश्लोकीं प्रकरण । **'ममैवांशो'** येथूनी हेंची विवरण । बोलिला जगद्वयचरण । तेथें प्रमाणयुक्तिअनुभवें हें सिद्ध. ॥ ८९० ॥ ऐसा प्रतिबिंबरूपें संसारी । मीच जालों म्हणूनी हरी । बोलोनी म्हणतो एतदुपरी । कीं मजपासूनी स्मृति तयातें. ॥ ८९१ ॥ म्हणिजे आपण नव्हे जड देह । आपण त्याचा साक्षी निःसंदेह । ऐसा जाऊनी जडतादात्म्यसंदेह । आत्मस्मृति तयातें मजपासूनी. ॥ ८९२ ॥ आणि ज्ञान सर्वात्मबोध । कीं होऊनीही जडचैतन्यशोध । जडतरंगीं चित्सिंधुबोध दुर्बोध । हें ज्ञानही मजचीपासूनी. ॥ ८९३ ॥ द्वादशीं **"श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्"** हा श्लोक । तेथें ज्ञानशब्दें उत्तमश्लोक । बोलिला जर्डी आत्मावलोक । श्रेय वृत्तिनिरोधाभ्यासापरीसही. ॥ ८९४ ॥ योगवासिष्ठश्लोकेंहीकरूनी । **"ज्ञानं सम्यगवेक्षणं"** म्हणोनी । जडीं विवर्ती अधिष्ठान लक्षूनी । बरें पाहणें, ते ज्ञान. ॥ ८९५ ॥ योग वृत्तिनिरोध । सम्यगवेक्षण सर्वात्मबोध । करूनी, चैतन्या उपादानाचा शोध । जडा कार्यांत पाहणें सम्यगवेक्षण. ॥ ८९६ ॥ **"योगो वृत्तिनिरोधो हि"** म्हणोनी । **"ज्ञानं सम्यगवेक्षणं"** ऐसें वसिष्ठवचनीं । एवं सम्यगवेक्षण ज्यास तो ज्ञानी । ज्ञान

---

१. मागें श्लोक ७ पहा. २. अ० १०. श्लो० २०.

तेंच, जें तत्त्व सर्वत्र पाहणें. ॥ ८९७ ॥ प्रस्तुतीं तें म्हणावें ज्ञान। या ज्ञानातें करुणानिधान। द्वादशीं म्हणे अभ्यासनिर्विशेषज्ञान। थोर त्याहुनी. ॥ ८९८ ॥ पूर्वाचार्य वसिष्ठादिक। त्यांचे शब्दें संकेत इत्यादिक। कीं अनेकीं जडीं पाहणें प्रकाश एक। तें सम्यगवेक्षण ज्ञान बोलावें. ॥ ८९९ ॥ येथें चिदात्मप्रतीती। तेची आत्मस्मृती। आणि ज्ञान आत्मा पाहणें सर्वभूतीं। दोन्ही मजचीपासूनी म्हणतसे. ॥ ९०० ॥ कीं भजतां मज भवरोगवैद्या। मजपासूनी व्यतिरेक-अन्वयरूपिणी विद्या। आणि मातें न भजतां जे अविद्या। तेही मजची-पासूनी. ॥ ९०१ ॥ कीं माया अनादि, परी मजपासूनी। प्रतिसृष्टी प्रगटते म्हणोनी। अविद्याही कोण मजवांचूनी। देणार या जीवातें ? ॥ ९०२ ॥ या भावें म्हणे मजपासूनी अपोहन। म्हणिजे आत्मस्मृतीचें विस्मरण। कीं अविद्यावृत अंतःकरण। उपजतें मजचीपासूनी, भाव हा. ॥ ९०३ ॥ आणि 'अपोहनं च' म्हणोनी। या चकारेंकरूनी। अविद्याही मजचीपासूनी। गूढ भावें म्हणतसे. ॥ ९०४ ॥ कीं विद्याच मजपासूनी। प्राप्त होते माझ्या भज-नेंकरूनी। परी अविद्याही मजवांचुनी। कैशी उपजेल ? ॥ ९०५ ॥ आतां स्मृति आणि ज्ञान। मजचीपासूनी हें समाधान। परी ज्याचें ज्ञान, तो ज-गाचें उपादान। असेल इतर कोणी ? ॥ ९०६ ॥ या संदेहाचें स्थळ। म्हणूनी म्हणतो घननीळ। कीं सर्वां वेदींकरूनी जाणावा केवळ। तोही मी स्वयें. ॥ ९०७ ॥ आतां वेदवचनेंकरूनी। मी वेद्य, परी वेद दुर्बोध म्हणोनी। वेदांतकर्ता व्यासरूपेंकरोनी। वेदवेत्ता स्वयें मीच. ॥ ९०८ ॥ कीं वेदांचा अर्थ जाणे बरा। तोची वेदवाक्यांचा निर्णय सारा। करील, तो एक श्रीवे-दव्यासची खरा। वेदांतकर्ता तो मी. ॥ ९०९ ॥ ऐसा वेदव्यास, माझी विभूति म्हणूनी, अर्जुनास। येथें बोले जगन्निवास। कीं व्यास वक्ता वेदांतसूत्रांचा. ॥ ९१० ॥ तीं ब्रह्मसूत्रेंची वेदांत। निर्णयास म्हणती अंत। ऐसा वेदांचा अंत, निर्णय, ज्यांत। त्या वेदांतसूत्रांचा कर्ता मी स्वयें. ॥ ९११ ॥ एवं जीव प्रतिबिंब। ज्यास हृदय जीवोपाध्यवलंब। त्यांत मी प्रवेशलों बिंब। म्हणतां जीव ईश्वर दोघे विभूती. ॥ ९१२ ॥ त्यांत विद्योपाधि ईश्वर आपण। अविद्योपाधि जीवलक्षण। त्यास बद्धपण मुक्तपण। आपणापासूनी. ॥ ९१३ ॥ यावेगळ्या विभूती। तो भाग अवघा प्रकृती। मुख्य मुख्य देहाकृती। विभूतिपणें मागें, येथेंही, बोलिल्या. ॥ ९१४ ॥ त्या विभूति जडांश। प्रतिबिंब भोक्ता चिदंश। आपण जगदीश। तिन्ही भाग अवघे

मिळोनी. ॥ ९१५ ॥ यांतही तारतम्य । एकाहूनी एक रम्य । आणि सर्वही अद्वैत वेदगम्य । आतां बोलतो, जों अध्यायसमाप्ती. ॥ ९१६ ॥ त्यांत जो जडांश । त्याहूनी उत्तम चिदंश । ऐसें बोले जगदीश । या श्लोकीं. ॥९१७॥

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥**

अर्जुना ! या लोकीं हे दोनी । म्हणावे पुरुष म्हणोनी । क्षर एक अक्षर एक, ये रीतीकरूनी । पुरुष दोनी जाणावें. ॥ ९१८ ॥ त्यांत सर्व भूतें क्षर । कूटस्थ तो अक्षर । ऐसीं लक्षणें सर्वेश्वर । स्वयेंची बोले. ॥ ९१९ ॥ कीं सर्व भूतें क्षर । क्षर म्हणिजे नश्वर । क्षरेना तें अक्षर । तो कूटस्थ अविनाशी म्हणतसे. ॥ ९२० ॥ पुरुषची म्हणे क्षरातें । पुरुषची म्हणे अक्षरातें । क्षर पुरुष सर्व भूतांतें । अक्षर म्हणे कूटस्थ तो जीव. ॥ ९२१ ॥ एवंच नश्वर भाग क्षर एक । अक्षर भाग जीव जे अनेक । दोहींस म्हणे उत्तमश्लोक । पुरुष म्हणोनी. ॥ ९२२ ॥ कीं पुर शरीर । जें म्हणावें क्षर । त्यांत जो वसे पुरुष अक्षर । तो व्यापूनी असे तैसाच. ॥ ९२३ ॥ मस्तक वर्तुलाकार । त्यात पुरुषही तदनुसार । जसजसा देहाचा विकार । तसतसा व्यापूनी तो असे. ॥ ९२४ ॥ जेथें शीतोष्णादि स्पर्श होतो । तेथें तत्काळ जो जाणतो । सर्व देह व्यापूनी असतो । तरीच एकसरें जाणतो सर्वत्र. ॥ ९२५ ॥ जेथें देह असे । तेथें तैसाच व्यापूनी वसे । ज्या अंशीं देह नसे । त्या अशीं नसे पुरुष तो. ॥ ९२६ ॥ वसोनी अंगुलीमात्रांत जाणे । तेथें शीतोष्ण सुखदु:ख बाणे । अंगुली पसरितां विवरांत नेणे । तें कांहीं. ॥ ९२७ ॥ दों बोटांत अवकाश दिसे । तेथें शीतोष्णादि स्पर्श जाणत नसे । बोटें जैशीं, तैसाच बसे । त्या बोटांत ऐसाच सर्वत्र. ॥ ९२८ ॥ देहानुरूप चित्स्वरूप । तेव्हां देहही तदनुरूप । एवं दोहींचेंही सारिखें रूप । ते पुरुष दोघेही. ॥ ९२९ ॥ पुरुष अन्नरसमय । ऐसा वेदींही निर्णय । देह याकारितां चिन्मय । तो जडमय देहयोगें. ॥ ९३० ॥ सर्वव्यापक नव्हे पुरुष हा । व्यापूनी असे एकाच देहा । तो सर्वत्र एक देहीं असे, या संदेहा । ठावची नाहीं. ॥ ९३१ ॥ हातीं घातलें कंकण । तें पाहाया नलगे दर्पण । जो नाहीं म्हणेल तोही आपण । सुखदु:ख सगळ्या देहीं भोगितो. ॥ ९३२ ॥ कोणी म्हणती, सूक्ष्म अत्यत । तो असतो हृदयांत । जेथें सुखदु:ख, तेथें असे जात । तेची क्षणीं. ॥ ९३३ ॥ तरी एकेच क्षणीं सहस्र कांटे । देहीं रोवितां.

काय वाटे ? । एका जीवाचे सहस्र वांटे । सहस्रां ठायीं होती, हें तों घडेना. ॥ ९३४ ॥ जे अद्वैतत्वेंत्ते म्हणविती । पंडित वेदही वाखाणिती । कांहीं जड-चैतन्यविवेकही जाणती । आणि बोलती ऐसें विरुद्ध. ॥ ९३५ ॥ त्यास वेदश्रुती । प्रमाणाही दाविती । परी श्रुतीचें तात्पर्य नेणती । ते श्रुति हे.॥९३६॥

**श्रुतिः—बुद्धेर्गुणेनात्मगुणेन चैव ह्याराग्रमात्रो ह्यवरोपि दृष्टः ॥**

**'आराग्रमात्र'** म्हणजे सूक्ष्मतर । अतिलहान तो येथें म्हणावा **'अवर'**। इतुकियाचवरूनी नर । सूक्ष्म म्हणती. ॥ ९३७ ॥ परी बुद्धिगुणें, आत्मगुणें-हीकरूनी । **'आराग्रमात्र' 'अवर'**ही देखिला म्हणोनी । श्रुति बोले या-वरूनी । जेव्हां बुद्धि **'आराग्रमात्र'** तेव्हां तोही तैसा हें तत्त्व. ॥ ९३८ ॥ अर्थ याचा ये रीती । कीं कर्मानुरूप देह होती । त्यांत सूक्ष्माहूनी सूक्ष्म देह असती । स्थूळही गजादिक. ॥ ९३९ ॥ त्यांत अतिसूक्ष्म शरीर । तेव्हां जीवोपाधि बुद्धिही सूक्ष्मतर । त्यांत बिंब आत्मयाचें तदनुसार । सूक्ष्मतरची प्रतिबिंब तें. ॥ ९४० ॥ बिंदुमात्र जें जीवन । त्यांत त्याचपुरतें गगन । प्रति-बिंबे वेदवचन । याकरितां ये रीती. ॥ ९४१ ॥ कीं बुद्धिगुणें, आत्मगुणेंही-करूनी । अत्यंत सूक्ष्मही देखिला म्हणोनी । अपिशब्दें ऐसाही कर्मानुरूप सुचवुनी । श्रुति म्हणे. ॥ ९४२ ॥ आत्मा एकची सर्वगत । तो जीवोपाधींत असे प्रतिबिंबत । जळ वाढतां प्रतिबिंब असे दिसत । त्याचइतुकें ॥ ९४३ ॥ जळ लहान होतें । तेव्हां प्रतिबिंबही लहान दिसतें । आत्मत्व शाश्वत असतें । बिंबींच. ॥ ९४४ ॥ या अनादि युक्तीनें समर्थ । जीवत्व पावतो भोगार्थ । आत्मत्व तों यथार्थ । त्यातेंची सर्वांचें. ॥ ९४५ ॥ प्रलयकाळीं प्रतिबिंबेंच नसती । तीं काय तेव्हां नासती ? । तैशीं उपाधीकरितां लहान थोर होती । तरी काय मानावीं अशाश्वत ? ॥ ९४६ ॥ हें तत्त्वची अनादि ये रीती । कीं शाश्वत बिंब तोचि आत्मा, ह्मणवी श्रुती । तो देहानुरूप प्रतिबिंब तो मायापती । भोगाकारणें. ॥ ९४७ ॥ या अर्थातें न पाहती । अनुभवविरुद्ध बोलती । हें तों सर्व अनुभवें जाणती । कीं एकसरेंची सर्व देहीं भोग घडे. ॥ ९४८ ॥ एवंच जीव सूक्ष्म म्हणोनी । असेल कोठकोठें प्रमाणवचनीं ! । त्याचा अर्थ ये रीतीकरूनी । सर्वत्र जाणावा. ॥ ९४९॥ व्यापक नसे शरीरीं । तों भोग घडे कोणेपरी ? । अत एव सूक्ष्मतर परी । भिउनी भेदवादी म्हणती व्यापक. ॥ ९५० ॥ कीं चंदनाचा बिंदु सूक्ष्मतर । परी शैत्यें व्यापी शरीर । ऐसें बोलती, परंतु चरणीं पडतां नीर । नव्हे ओला टिळा ललाटीं, हें न कळे. ॥ ९५१ ॥ चरण भिजती जळीं । परी टिळा ओला नव्हे चंदनाचा

कपाळीं । पायं पोळतां अग्निज्वाळीं । चंदन ललाटीं नव्हे उष्ण. ॥ ९५२ ॥ तैसा छेदितां हात । जीव दुःखी नव्हे हृदयांत । तरी हा साजेल दृष्टांत । व्यापकत्वीं. ॥ ९५३ ॥ ज्याकारणें दृष्टांत आला । त्याणें तो अर्थ सिद्ध नाहीं जाला । भोग साधायास बोलिला । दृष्टांत हा ये रीती. ॥ ९५४ ॥ भोगाकारणें दृष्टांत । आणिती ऐसा भ्रांत । जीवसूक्ष्मत्वाकारणें श्रांत । होती वृथा. ॥ ९५५ ॥ बोलोनी ऐशा कुयुक्ती । भेदवादी इच्छिती मुक्ति । देहीं आपणास सुखदुःखमुक्ती । कैसी? तेंहीं कळेना. ॥ ९५६ ॥ चंदनबिंदूचा व्याप । तैसाच तेजें गृह अवघें व्यापी दीप । परी व्यापकपणीं व्यर्थ प्रताप । वायूचा. ॥ ९५७ ॥ दीप घरांत निर्वातीं । बाहेर द्वारमार्गें त्याची दीप्ती । तेथें वायूची प्रचंड गती । दीप घरांत निष्कंप. ॥ ९५८ ॥ ज्या प्रकाशें व्यापिलें घर । त्या दीपशिखेस सूक्ष्मतर । कांहीं स्पर्शतां समीर । हालों लागे, विझेही. ॥ ९५९ ॥ भोगीं व्यापकत्व ऐसें । दृष्टांत साधील कैसें? । अल्पबुद्धीस [1]जैसेंतैसें । गोंफाटिती पांडित्येंकरूनी. ॥ ९६० ॥ [3]कर्मतत्त्वग्रंथीं हा विचार । भगवंत जो **यथार्थदीपिकाकार** । याणेंच केला असे, येथें फार । बोलतां, अपार ग्रंथ होतो. ॥ ९६१ ॥ हें तों स्पष्टची दिसे । कीं जों जीव सर्वत्र एका देहीं न वसे । तों एकसरें प्रत्यय कैसे । सुखदुःखभोगाचे घडों शकती? ॥ ९६२ ॥ एवंच अवघें शरीर । व्यापूनी हें [4]नवद्वार पुर । वसे पुरुष, तो पुरीं हा प्रकार । सिद्ध जाला. ॥ ९६३ ॥ पुर जैसें, पुरुषही तैसा । तेव्हां पुरही तैसें, पुरुष जैसा । पुरुष शब्द दोहींस ऐसा । त्यांत एक क्षर, एक अक्षर. ॥ ९६४ ॥ परी दोहींचे दोन प्रकार । त्यांत क्षराहूनी उत्तम अक्षर । ऐसें सुचवूनी सर्वेश्वर । तिसरा याहूनी उत्तम म्हणे या श्लोकीं. ॥ ९६५ ॥

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥**

अगा! त्या दोंसारिखाच दिसे । तो अन्य बोलिजेतसे । तो उत्तम पुरुष, जो वसे । प्रवेशोनी लोक तिन्ही. ॥ ९६६ ॥ त्या दोंमध्यें एक नश्वर । दुसरा जरी अविनाशी अक्षर । तरी व्यापूनी एकची पुर । तो वसे. ॥ ९६७ ॥ हा पुरुष उत्तम त्या दोहींहुनी । कीं तिहीं लोकीं प्रतिपुरीं प्रवेशोनी । तिहीं लोकांस पाळितो म्हणोनी । अव्यय ईश्वर उत्तम पुरुष. ॥ ९६८ ॥ प्रवेशोनी लोकत्रय ।

---

१. कसें तरी. २. झुगारितात. ३. वामनपंडितकृत स्फुट काव्यें, भाग २ रा, पहा. ४. ज्यास नऊ द्वारें आहेत. ५. देह; शरीर.

**पाळितो, धरितो,** म्हणतां सुचवी निर्णय । कीं पूर्वोक्त अक्षर जीवोपाधिमय । **तो अंश याचा.** ॥ ९६९ ॥ हा बिंबप्रतिबिंबाचा । आणि पालकही तयाचा । **म्हणूनी तो अनीश्वर, हा ईश्वर** साचा । धनी त्याचा समर्थ. ॥ ९७० ॥ **त्रैलो-क्यांत प्रवेश** । ऐसाच कीं हा अनंत **जगदीश** । प्रतिबिंबत्वें प्रवेशतां अंश । **तो अक्षर या ईश्वराचा.** ॥ ९७१ ॥ आणि तो अक्षर । कीं क्षरतां नाशतां **क्षर** । प्रलयकाळीं आपलें बिंब हा **सर्वेश्वर** । त्यामध्ये प्रवेशतो. ॥ ९७२ ॥ **तेव्हां हाही अव्यय** । कीं होतां सर्वा पुरांचा व्यय । आपण अव्ययपणें उरतो **हा निर्णय** । एवच त्या अक्षरत्व याकरितां. ॥ ९७३ ॥ प्रलयीं यांतची रिघे । उपाधि उत्पन्न होतां यांतूनी निघे । जैसीं नाना जळें होतां अवघे । 'प्रतिबिंब-**रूपें सूर्यची** दिसती. ॥ ९७४॥ तेव्हां लोकत्रय । निर्माण करूनी हा अव्यय । जीवोपाधींत तन्मय । नाना अक्षर **पुरुष** स्वयें होतसे. ॥ ९७५ ॥ ऐसा समर्थ **ईश्वर** । म्हणूनी क्षर आणि जो अक्षर । त्याहूनी उत्तमतर । म्हणूनी उत्तम **पुरुष** अन्य हा. ॥ ९७६ ॥ विचारितां अर्थ ऐसा । परतु शब्दरचनेंत भेदसा । दिसोनी आला, तो परिहरे ऐसा । भाव दावूनी उत्तमत्व स्फुट करितो **या श्लोकीं.** ॥ ९७७ ॥

**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥**

अगा! ज्या कारणास्तव । क्षराहूनी अतीत मी वास्तव । आणि अक्षरा-**हूनीही** उत्तम, यास्तव । **पुरुष उत्तम** प्रसिद्ध मी. ॥ ९७८ ॥ तो लोकींही मी पुरुष उत्तम । म्हणूनी प्रसिद्ध आणि निगम । म्हणती मजची सर्वोत्तम । **म्हणूनी वेदींही** प्रसिद्ध. ॥ ९७९ ॥ श्लोकार्थ इतकाच ऐसा । आतां क्षराहूनी **अतीत कैसा** । आणि अक्षराहूनी उत्तम, याचा आरसा । **यथार्थदीपिका होतसे.** ॥ ९८० ॥ अतीत क्षराहूनी । आणि अक्षराहूनी उत्तम म्हणोनी । **बोलतां दोंही परी,** दों रीतीकरूनी । उत्तम पुरुष बोलतो. ॥ ९८१ ॥ कीं **रज्जु सर्पाहूनी अतीत** । जो नसोनी जाला प्रतीत । त्या मिथ्या सर्पाहूनी उत्तम **रज्जु निश्चित** । सत्यत्वें, तत्प्रकाशकत्वेही. ॥ ९८२ ॥ सोनें अलंकारीं अतीत । **क्षर अलंकार** मिथ्या प्रतीत । त्या क्षरा नगाहूनी उत्तम निश्चित । तो नाशतां, **न नासे जें सोनें.** ॥ ९८३ ॥ जडभागा क्षर पुरुषाहूनी उत्तम । मी ऐसा **म्हणे पुरुषोत्तम** । आणि उत्तम अक्षराहूनी म्हणतां **सर्वोत्तम** । म्हणे **'अक्ष-रादपि च'** म्हणोनी. ॥ ९८४ ॥ उगाची अक्षराहूनी मी उत्तम म्हणोनी ।

न म्हणे आणि 'अक्षरादपि च' या वचनीं । म्हणे सुचवूनी । हा अर्थ. ॥ ९८५ ॥ कीं तो अंश आपला आणि आपण । दोघांत नसे वेगळेपण । तथापिही त्यास बंध त्रिगुण । तो अनीश, नित्यमुक्त ईश्वर मी. ॥ ९८६ ॥ याकारणें त्याहीहूनी । मी उत्तम म्हणोनी । बोलिला या वचनीं । सर्वेश्वर. ॥ ९८७ ॥ ऐसा त्या दों पुरुषांपरीस अत्यंत । पुरुष उत्तम आपण भगवंत । विख्यात लोकीं आणि वेदीं म्हणे अनत । हें ऐसें. ॥ ९८८ ॥ कीं लोक तो मनुष्यलोक । त्यांत ज्यांस वेदार्थाचा अवलोक । ते वेदविख्यातची कीं उत्तमश्लोक । वेदीं विख्यात मी स्वयें म्हणतो. ॥ ९८९ ॥ ज्यांस वेद नाहीं कळला । त्याही लोकांमध्यें विख्यात असला । तेव्हां म्हणावें त्याला । विख्यात लोकींही. ॥ ९९० ॥ तरी मूढ केवळ । हलधर आणि गोवळ । तेही म्हणती सकळ । 'अरे! देवा!' 'देवें केलें,' 'देव करील,' म्हणोनी. ॥ ९९१ ॥ पर्जन्य पडतां राहे । तेव्हां 'देवा! देवा!' ओतो म्हणत आहे । आणि कांहीं दुःख देहीं न साहे । तेव्हां 'देवा! देवा!' जनमुखीं. ॥ ९९२ ॥ मनुष्यमात्र ये रीती । एक ईश्वर आहे म्हणती । जे अनीश्वरवादी त्यांची गणती । पशूंमध्यें. ॥ ९९३ ॥ मनुष्यदेहीं पापसंचित । पशुयोनि त्या कर्मे निश्चित । तैसेंची पाप नरदेहीं जे अत्यंत । अनीश्वरवादी होती त्या पापें. ॥ ९९४ ॥ कांहीं चातुर्य बोलकेपण । तें पूर्व नरदेहकृत पुण्य । परी जें पातक अगण्य । अनीश्वरवाद फळ त्याचें. ॥ ९९५ ॥ एव चराचर शरीरें । मनुष्यदेहकर्मफळ सारें । आणि पातकेंची अपारें । ईश्वराची विस्मृती. ॥ ९९६ ॥ या वेगळे मनुष्य जितके । ईश्वर मानितीच तितके । पिशाच पंचाक्षरियांकडे येऊं न शके । तसे पापीच न म्हणे ईश्वर आहे म्हणोनी. ॥ ९९७ ॥ वरकड जितके मानव । ते वेदविख्यात नेणोनीही विभव । ईश्वर मानिती, म्हणोनी देवाधिदेव । लोकीं प्रख्यात मी म्हणे. ॥ ९९८ ॥ वेदीं म्हणतां प्रख्यात । इतिहासपुराणें आलीं त्यांत । आणि प्राकृत ग्रंथ करिती संत । तेही वेदापुराणांच्याच आश्रयें. ॥ ९९९ ॥ अनीश्वर चार्वाक । अनीश्वरवादी मीमांसक । ग्रंथ त्यांचे इत्यादिक । ते फळें पापाचीं पापेंची संचिती. ॥ १००० ॥ एक पापी वेगळे करूनी । विख्यात सर्वत्र सर्वेश्वर म्हणोनी । आपली प्रसिद्धि सर्वत्र या वचनीं । सुचवी सर्वात्मा सर्वोत्तम. ॥ १००१ ॥ ऐसें येथपर्यंत । सर्वांपरीस सर्वोत्तमत्व भगवंत । आपलें बोलिला त्यांत । अद्वैत आणि सर्वोत्तमत्वही बोलिला. ॥ १००२ ॥ परंतु द्विविध जन । हें न जाणती ज्ञान । एक अद्वैत मानूनी मज उत्तम सर्वांहून । न मानिती. ॥ १००३ ॥ दुसरे

जे भेदवादीं प्रवीण । कांहीं नावडे भेदाविण । जेथें असे उत्तमपण । द्वैत तेथें स्थापिती सर्वज्ञ हें जाणे. ॥ १००४ ॥ ते गीताकामधेनुस्तनीं । लागती गोचीड होउनी । माततील अशुद्ध सेवूनी । काय कामधेनु त्यांतें फळेल ? ॥ १००५ ॥ तरी जे तैसे नव्हती । आणि यथोक्तरीती ऐसें जाणती । त्यांचें फळ ये रीती । म्हणूनी म्हणतो या श्लोकीं. ॥ १००६ ॥

**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥**

अगा ! जो या प्रकारें मातें जाणतो । मज क्षरा अक्षराहीहूनी उत्तम म्हणतो । तो मज पुरुषोत्तमातें भजतो । सर्वज्ञ होऊनी सर्वभावें. ॥ १००७ ॥ तोची असंमूढ जाण । जो या प्रकारें सुजाण । मज या उक्त रीतीं प्रमाण । मानूनी भजतो. ॥ १००८ ॥ मी अधिष्ठान, जड विवर्त । तें क्षर, मी त्याहूनी अतीत । आणि अक्षर माझा अंश मीच निश्चित । तथापि त्या बद्धाहूनी नित्यमुक्त उत्तम मी. ॥ १००९ ॥ ऐसी अद्वैतरीती अवलंबुनी । दोंहीपरीस मी उत्तम म्हणोनी । बोलिलों, जो जाणतो ये रीतीकरूनी । तोची असंमूढ. ॥ १०१० ॥ तोची सर्वज्ञ कीं अद्वैतबोध । आणि माझ्या उत्तमवाचा बोध । अद्वैत आणि सर्वावरी उत्तमत्व हा शोध । करूनी, सर्वोत्तमत्वें मज जाणतो. ॥ १०११ ॥ जो नुसतेंची अद्वैत मानितो । आणि मज सर्वांहूनी उत्तमत्वें न जाणतो । अगा ! पार्था ! म्हणिजेतो । संमूढ म्हणिजे अत्यंत मूढ. ॥ १०१२ ॥ सम्यक्प्रकारें मूढ । तो म्हणावा संमूढ । कीं अद्वैततत्त्व वेदीं गूढ । तें बोलूनीही न कळे उत्तमत्व माझें. ॥ १०१३ ॥ कीं सर्वही अद्वैत । तेथें कैंचें उत्तमत्व, अधमत्व, हें द्वैत? । परी अद्वैत बोलणेंही तेथें नसे निश्चित । ऐसें हें कैसें बोलतों ? ऐसें पाहेना. ॥ १०१४ ॥ तरी द्वैत जेव्हां उमजलें । तेव्हां अद्वैत बोलणें लागलें । तें अनुभवा तेव्हां संतांस आलें । कीं मोक्षपदातें भजले जेधवां. ॥ १०१५ ॥ तो विद्योपाधि सर्वेश्वर । त्यावेगळें अविद्यावृत चराचर । तें क्षर, त्यांत जो अक्षर । बद्ध तो. ॥ १०१६ ॥ बद्धास बद्ध शरण गेला । तों तोही रडोंच लागला । एवंच मोक्ष एकाकडेच लागला । तो क्षरातीत उत्तम अक्षराहीपरीस. ॥ १०१७ ॥ एवंच ऐसें न कळे ज्याला । संमूढ म्हणावें त्याला । कीं जाऊनी मूढभाव आला । संमूढभाव. ॥ १०१८ ॥ जो साधारण इतर मूढ । तो माझें उत्तमत्वम गूढ । ज्ञान सर्वात्मकत्वें जाणोनी प्रौढ । साधनबळें होऊं शके. ॥ १०१९ ॥ मग सर्वज्ञ होउनी । मज भजेल सर्व भावेंकरूनी । तो असंमूढ

म्हणोनी । अगा ! म्हणावा. ॥ १०२० ॥ कीं संमूढ तो जे रीती । अद्वैत वाचूनी मूढमती । तैसा नव्हे हा सुमती । असंमूढ. ॥ १०२१ ॥ आतां क्षराक्षराहूनी उत्तम । "मी पुरुषोत्तम । ऐसें मानूनी मज परम । द्वैत बोलती संमूढ तेही. ॥ १०२२ ॥ त्यांस हे गीता सर्वथा । सर्वत्र वाखाणितां देते व्यथा । येथें सावकाश त्यांस कथा । द्वैताची सांपडते. ॥ १०२३ ॥ पूर्वश्लोकीं क्षरातीत । आपण म्हणे भगवंत । क्षर विवर्त, त्यापलीकडे आपण अनंत । अधिष्ठान म्हणूनी. ॥१०२४॥ ते ऐसें न वाखाणिती । उगाच क्षरापरता म्हणती । अक्षराहूनी उत्तम भिन्नत्वेंची बोलती । वेगळा पुरुष उत्तम उत्तमश्लोक. ॥१०२५॥ ऐसे भेदयुक्त । त्यांचें वेदविरुद्ध मत । जरी सर्वांहूनी उत्तम म्हणती भगवंत । तरी तत्त्व अद्वैत न मानिती. ॥ १०२६ ॥ तेही म्हणावे संमूढ । म्हणिजे शास्त्रें वाचूनीही मूढ । वेदीं वेदांतीं जें अद्वैत दृढ । तें ते न मानिती. ॥१०२७॥ उत्तम पुरुष सर्वोत्तम । हें बोलती बोलणें जरी उत्तम । द्वैत अविद्यातम । बळेंची वाखाणिती. ॥ १०२८ ॥ ते संमूढ म्हणे भगवंत । कीं ऐसें बोलोनीही मूढ अत्यंत । कीं अद्वैततत्त्वची पंधरा अध्यायपर्यंत । आणि पुढेंही समातीवरी. ॥ १०२९ ॥ ते विपरीत वाखाणिती । आणि या प्रसंगीं भेद मानिती । ज्यांस भेदीं प्रमाण एकही श्रुती । आप्त नव्हे. ॥ १०३० ॥ ते भेदवादी संमूढ । तैसा नव्हे हा असंमूढ । जो अद्वैत आणि माझें पुरुषोत्तमत्व दृढ । जाणतो. ॥ १०३१ ॥ तोची सर्वज्ञ । सर्वभावें मज भजे सुज्ञ । जो अद्वैतबोधीं अभिज्ञ । तोची सर्वज्ञ वेद म्हणती. ॥ १०३२ ॥ एक मृत्पिंड कळला ज्याला । सर्व मृण्मय कळलें त्याला । कीं सर्व मृत्तिका प्रपंच वाचारंभण जाला । मातीच सत्य, तैसें ब्रह्म, श्रुति म्हणे. ॥ १०३३ ॥

**श्रुतिः—यथा खलु सौम्यैकेन मृत्पिंडेन सर्वं मृण्मयं विज्ञातं स्यात् ।
वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ॥**

जैसा एक मृत्पिंड । म्हणजे गोळा मातीचा, पिंड । तो मातीच आहे, ऐसे घटादि उदंड । आकार वाचारंभण सर्वही. ॥ १०३४ ॥ वाचेकरूनी बोलों आरंभिलें । परी तें नाहींच जें जें बोलिलें । 'वंध्यापुत्र' ऐसें मुखासी आलें । परी तो नसे. ॥ १०३५ ॥ वाचेस, कर्णास, वंध्यासुत । गोचर होऊनी, नाहीं निश्चित । तैसे मिथ्या घटादिपदार्थ असंत । वाचेस, दृष्टीस, गोचर होऊनी. ॥ १०३६ ॥ आतां क्रियाकारित्व घटीं दिसे । वंध्यापुत्रास तें नसे । तरी रज्जु सर्पाकृती भासे । द्रष्टा कां मुते फळफळा ? ॥ १०३७ ॥ क्रियाकारित्वरूप जग । सर्वही दोरीं जैसा भुजग । अलंकारीं मिथ्या नग । आणि

**सर्वसाम्य** नव्हे दृष्टांतीं. ॥ १०३८ ॥ मातीवेगळा घट । प्रत्यक्ष कांहींच नाहीं निपट । हें सिद्ध होऊनी खटपट । खांद बांधणें वेदासी. ॥ १०३९ ॥ एवंच कळला* एक मृत्पिंड । कीं मातीच सत्य लटिका बाटोळा पिंड । तेव्हां घटादि प्रपंच उदंड । मातीच असे हें कळलें. ॥ १०४० ॥ ऐसा एक जड पिंड । कळला कीं लटिकेंची बंड । तेव्हां सर्व पिंड आणि ब्रम्हांड । मिथ्या, ऐसें तो जाणे. ॥ १०४१ ॥ जैसे घटादि आकार असत्य । आणि त्या सर्वांत मातीच सत्य । ऐसें ब्रह्मची सत्य हें पांडित्य । श्रुतीच करिती. ॥ १०४२ ॥ ऐसेंची कनक अलंकार । लोखंड शस्त्रादि विकार । दृष्टांत नानाप्रकार । छांदोग्य उपनिषदीं. ॥ १०४३ ॥ कीं एक जडदेह असत्य । त्याचा प्रकाशक आत्माच सत्य । ऐसें कळतां सकळ वेदांचें पांडित्य। आणि सर्वही कळलें त्या नरा. ॥ १०४४ ॥ म्हणूनी या श्लोकीं प्रस्तुत । तो सर्वज्ञ होऊनी म्हणे भगवंत । मज मनेंभावें असे भजत । 'सर्वही वासुदेव' म्हणोनी. ॥ १०४५ ॥ "वासुदेवः सर्वमिति"। हें सप्तमीं बोलिलों तुजप्रती । ज्ञानी होऊनी सगुणीं प्रीती । ज्यास तो हा अर्जुना! भाव ऐसा. ॥ १०४६ ॥ कीं ज्ञानी आणि भक्त । सर्वही वासुदेव ऐसा जीवन्मुक्त । तो या भावें सगुणीं अनुरक्त । कीं क्षराक्षराहूनी उत्तम श्रीपती. ॥ १०४७ ॥ उत्तम सर्वांहुनी । आणि आपणची सर्व म्हणोनी । ऐसा सर्वभावेंकरूनी । मज भजतो. ॥ १०४८ ॥ अर्थ ऐसा न मानिती मूढ । भेदवादी ते समूढ । कीं वेदशास्त्र वाचूनी सम्यक् मूढ । असर्वज्ञ सर्वभावें न भजती. ॥ १०४९ ॥ मानूनीही मज पुरुषोत्तम । दृढ करिती द्वैतभ्रम । तें पांडित्यभजन वृथा श्रम । भाव ऐसा. ॥ १०५० ॥ हा अर्थ, हा भाव । ते न मानिती, कीं भेदस्वभाव । जेथें अद्वैत, तेथें अभाव । कुयुक्तीनें करिती त्या अर्थाचा. ॥ १०५१ ॥ ते तेथें म्हणती । क्षराक्षराहुनी श्रीपती । उत्तम म्हणतो, तेव्हां आयती । भिन्नता उत्तमाअधमासी ॥ १०५२ ॥ तरी या गीतेंत अद्वैत । सर्वत्र बोले भगवंत । येथें भेद अत्यत । बोलेल कैसा? ॥ १०५३ ॥ "वासुदेवः सर्वमिति"। हें जडब्रह्मैक्य बोले जगत्पती । 'सर्वं खल्विदं ब्रह्म' इत्यादि श्रुती । बळ देती ज्या वचना. ॥ १०५४ ॥ "पुरुष एवेदं सर्वं" ऐसा वेद । त्या क्षरासी कैसा येथें घडेल भेद? । आणि अक्षर जीव त्यासी अभेद । "ममैवांशो जीव" इत्यादि. ॥ १०५५ ॥ 'तत्त्वमसि' म्हणोनी । नव वार या श्रुतीकरूनी । आणि अनेक वेदवचनीं । ऐक्य जीवेश्वरांचें.

---

* १. अ० ७, श्लो० १९.

॥ १०५६ ॥ त्या अक्षरासी कैसें द्वैत ? । येथें बोलेल भगवंत । अत एव संमूढ ते अत्यंत । जो असंमूढ, तो सर्वज्ञ भजतो सर्वभावें. ॥ १०५७ ॥ आतां म्हणतां उत्तमपण । सिद्ध मानावें द्वैतलक्षण । तरी सर्वत्र हाच क्रमलेक्षण । अद्वैत बोलतो. ॥ १०५८ ॥ आतां जेथें जेथें अद्वैत । तेथें तेथें बळेंची वाखाणिलें द्वैत । तें विवेकियांस केंवी संमत । होऊं पाहतें ? ॥ १०५९ ॥ श्वानाचा विटाळ । संमत मानिती चांडाळ । तैसें कुमत फटकाळ । संमत तैशा फटकाळा. ॥ १०६० ॥ येथें क्षराहुनी अक्षर । अक्षरापरीस ईश्वर । उत्तम म्हणतांच, कुनर । भेद मानिती. ॥ १०६१ ॥ तरीं या तिघांस वेगळेपण । ऐसें न बोले वेद आपण । देव, देऊळ, द्वारपाळगण । उत्तम, मध्यम, [अधम], परी एकत्व पाषाणीं. ॥ १०६२ ॥ पाषाणाची पायरी । पादरक्षा ठेविती तदुपरी । आणि शुचिर्भूत होऊनी पायांवरी । मस्तक ठेविती देवाच्या. ॥ १०६३ ॥ हें उत्तमत्व, अधमत्व । तथापि जैसें एकत्व । तैसें अद्वैत सर्वत्र, हें तत्त्व । आणि जडत्व अनीशत्व, ईश्वरत्वही. ॥ १०६४ ॥ जरी या तिघां पुरुषांस भेद । ऐसें बोलता गोविंद । तरी 'भेदवादी मतिमंद'[१] म्हणतां जिव्हा लाजती. ॥ १०६५ ॥ गीता, वेद, पुराणें । यांत एक दोन तरी भेदीं प्रमाणें । असतीं, तरी येथें नारायणें । भेद बोलिला असेल, मानूं ये. ॥ १०६६ ॥ कांहीं कल्पितवचनें कल्पूनी । त्याचें नांव श्रुति ठेवुनी । स्वशिष्यां मूढां बोधिती म्हणोनी । तीं प्रमाणें कोण मानितील ? ॥ १०६७ ॥ धुंडितां सकळ वेद । भूलोकीं प्रसिद्ध जितके शाखाभेद । सर्वत्र असतां अभेद । तीं वचनें कोठे न सांपडती. ॥ १०६८ ॥ ऐसें म्हणतां वेद अनंत । त्यांतील हीं वचनें म्हणतां निश्चित । ते गोष्टी खरी मूढचित्त । कलियुगीं पापी मानिती. ॥ १०६९ ॥ वेदशाखा शत शत । वेदपाठकही असंख्यात । त्यांत जें नसे विख्यात । तें प्रमाण कोण हो ! मानिती ? ॥ १०७० ॥ ऐसा करितां शोध । जेथें तेथें अद्वैतबोध । तो अर्थ बोलतां मानिती क्रोध । बळेंची द्वैत वाखाणिती. ॥ १०७१ ॥ शेवटीं "द्वा सुपर्णा" श्रुती । हें प्रमाण दाखविती । तरी तेही श्रुति येच रीती । दोहींस भेद बोले ना. ॥ १०७२ ॥

**श्रुतिः—द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।**
**तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्यो अभिचाकशीति ॥**

प्रपचपिंपळावरी दोनी । पक्षी जीव, ईश्वर, म्हणोनी । एक भोक्ता, एक

---

१. दुरभिमानी व दुराग्रही शास्त्रिपंडितांनीं श्रुतिस्मृतिपुराणांत स्वमतसिद्धयर्थ जी घुसडाघुसडी केलेली आहे. त्यावर येथें यथार्थदीपिकाकारांनीं सणसणीत कोरडा ओढिला आहे.

प्रकाशक न भोगुनी । अर्थ ऐसा श्रुतीचा. ॥ १०७३ ॥ तरी जीव ईश्वर दोनी । एक ब्रह्म जालें म्हणोनी । दोघे सुपर्ण नांवें ठेवुनी । श्रुति वदे. ॥ १०७४ ॥ दोहींस अन्योन्यभेद । हें तों म्हणे ना कोठें वेद । जेथें तेथें अभेद । ज्या दोघांस, ते हे दोघे. ॥ १०७५ ॥ आतां दोघांत अन्य भोक्ता । आणि दोघांत अन्य अभोक्ता । भोगबद्धा, अभोगमुक्ता, श्रुति म्हणे. ॥१०७६॥ त्या अन्यशब्देंकरूनी । नाचती, भेद साधिला म्हणोनी । परी पुसतांच जातो उडोनी । भेद हा. ॥ १०७७ ॥ श्रुति म्हणे **'तयोरन्यः'** । म्हणिजे त्या दोघांत अन्य । पुन्हा म्हणे अशन न करी अन्य । दोघांचमध्यें. ॥१०७८॥ दोघांत अन्य म्हणतां । तिसरा जाला तत्त्वतां । तो कोण हो म्हणूनी पुसतां । तिसरा नाहीं. ॥ १०७९ ॥ मग म्हणती दोघांत । अन्य म्हणिजे एक दोघां तयांत । परी तो अन्य तरी वेदवाक्यांत । दोवांत जो एक, तो अन्य, हें नाहीं. ॥ १०८० ॥ अन्य शब्दाचा अर्थ । एक म्हणूनी जाला आतां व्यर्थ । भिन्नत्वें बोलतां अनर्थ । सिद्ध जालें ये रीती. ॥१०८१॥ एवं दोघांत अन्य ये रीती । दोघांत एक भोक्ता म्हणे श्रुती । पुन्हा दोघांत अन्य अभोक्ता म्हणतां तेची म्हणती । अन्य म्हणिजे अभोक्ता एक. ॥ १०८२ ॥ तेव्हां 'एक' म्हणावें जेथें । 'अन्य' म्हणे श्रुति तेथें । आतां अन्यपण येथें । अन्यशब्दें केंवी घडे. ॥ १०८३ ॥ आतां दोघांचें लक्षण । भोक्तेपण अभोक्तेपण । ऐसे दोघे विलक्षण । म्हणूनी भेद काढिती कोरूनी. ॥ १०८४ ॥ तरी कृष्ण गोपीमनमोहन । स्त्री दुसरी न भोगी रघुनंदन । आणि दोघेही एकची जगज्जीवन । वैकुंठपती. ॥ १०८५ ॥ जीवेश्वरांचें एकपण । आणि विरुद्ध लक्षण । एकास विषयभक्षण । एक अभोक्ता. ॥ १०८६ ॥ एवंच जरी श्रुती । दोघे वेगळे म्हणती । तरी त्या मताची गणती। होती प्रामाणिकांत. ॥१०८७॥ आतां दोनी म्हणोनी । **'द्वा सुपर्णा'** या श्रुतीच्या पदेंकरूनी । येथें मडेमिठी घालुनी । दोनी, तेव्हां द्वैत म्हणती निश्चित. ॥ १०८८ ॥ मिठी पडे प्राण जातां । ते न सुटे सोडवितां । तैसें त्यांचें मत मरतां । मिठी घाली द्विवचनीं. ॥ १०८९ ॥ तरी **"वासिष्ठयादवौ कृष्णौ"** या द्विवचनीं । त्यांच्याच मुखींच्या वचनीं । वसिष्ठवंश, यदुवंश, दोनी । एक व्यास, एक श्रीकृष्ण, हे दोघे. ॥ १०९० ॥ तैसे दोनी सुपर्ण । जैसे दोघे कृष्ण । व्यासास कृष्णास एकपण । अत्यंत संमत हें तयांसही. ॥ १०९१ ॥ दोनी सुपर्ण म्हणतां भेद । तेची दोनी कृष्ण म्हणतां, कां हो! अभेद ? । जैसें द्विवचन येथें बोलतो वेद । तैसेंची द्विवचन श्लोकीं तुमचिया. ॥ १०९२ ॥ वासिष्ठ कृष्ण द्वैपा-

यन व्यास । आणि यादव कृष्ण या दोघांस । वेदीं पुराणीं अभेद म्हणतील तरी दो सुपर्णांस । अभेद सर्वत्र वेदीं पुराणीं. ॥१०९३॥ जीवेश्वरांस भेद । ऐसें एकवचन बोलता वेद । तरी 'आपलें मत अप्रमाण,' हा खेद । तुम्हां न होता. ॥ १०९४ ॥ मग सत्य आत्मा, जीव सत्य । सत्य भेद ऐसें अगत्य । वचनें कल्पूनी, कां असत्य । हे श्रुति म्हणोनी बोलणें लागतें तुम्हांला ? ॥ १०९५ ॥ एवंच 'द्वा सुपर्णा' श्रुती । जरी दोघांस भेद म्हणती । तरी प्रामाणिकांत गणती[१]। तुमचीही संत मानिते. ॥ १०९६ ॥ ऐसेंच जीवत्व ईश्वरत्व । सहज बोलतां भेदत्व । म्हणोनी म्हणती हें पाखंडत्व । प्रगट करिती आपलें. ॥ १०९७ ॥ असोत आतां हे बोल । विचारितां अवघे फोल । कलिप्रतापें वाटती खोल । मूढा जना. ॥ १०९८ ॥ प्रस्तुतीं भगवद्वाणी । वर्णितां मध्यें त्यांची काहणी । अगत्यास आली, अत एव चक्रपाणी । जो ऐसा नव्हे तो म्हणे असंमूढ. ॥ १०९९ ॥ तो असंमूढ, जो मज सर्वोत्तमातें । क्षराक्षराहूनी पुरुषोत्तमातें । उत्तमत्वें जाणतो, तो सर्वज्ञ मातें । सर्वभावें भजतसे. ॥ ११०० ॥ एक जड, एक चैतन्य । सर्व इतकेंची न दिसे अन्य । तें सर्व मी पुरुषोत्तम अनन्य । ऐशा सर्वभावें मज भजतो. ॥ ११०१ ॥ बोलिले पुरुष दोनी । क्षराक्षर म्हणोनी । सर्व विश्व या दोंवांचूनी । कांहींच न दिसे. ॥ ११०२ ॥ 'तें सर्व मीच वासुदेव' । ऐसा जेव्हां भाव । तो म्हणावा सर्वभाव । त्या सर्वभावें मातें तो भजतो. ॥ ११०३ ॥ भजतो सर्वभावेंकरूनी । म्हणतां अद्वैत साक्षात्कारे भजतो म्हणोनी । म्हणे आणि 'सर्ववित्'— सर्वज्ञ या वचनीं । कीं अपरोक्ष अद्वैतसाक्षात्कार. ॥ ११०४ ॥ तो एवं पूर्वोक्तरीती । जाणोनी भजतो, कीं श्रीपती । क्षराक्षराहूनी अती । उत्तम. ॥ ११०५ ॥ हे सगुणभक्तीचा सूचना । कीं हे क्षराक्षररचना । ज्यापासूनी त्या मज कमललोचना । कार्यापरीस कारणास उत्तमत्वें तो भजतो. ॥११०६॥ एवंच अपरोक्षसाक्षात्कारयुक्त । जे शुकादि जीवन्मुक्त । तेही मज सगुणाचे भक्त । ऐसें भगवंत बोलिला. ॥११०७॥ ऐसा अध्यायार्थ । ऐकतां, 'कृतकृत्य जालों,' म्हणे पार्थ । तों देव म्हणे 'भलताही होतो कृतार्थ । हें जाणतां,' ऐसा शेवटीं श्लोक हा. ॥ ११०८ ॥

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।**
**एतद्बुध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥**

---

१. या अध्यायाला 'पुराणपुरुषोत्तमयोग' असें नांव आहे.

अगा! इतकें जें मा पुरुषोत्तम । बोलिलों, हें शास्त्र गुह्यतम । म्हणजे गुह्याहूनी गुह्य उत्तम । अगा! भारता! ॥ ११०९ ॥ मोक्षशास्त्र जितकें । त्यांत गुह्य अत्यंत तितकें । बोलिलों मी इतकें । जाणोनी कृतकृत्य नर [1]होय ॥ १११० ॥ वेदवेदांतपांडित्य । हेंची कीं अद्वैत सत्य । आणि सगुणभक्ति हेंची कृत्य । मनुष्यदेहीं. ॥ ११११ ॥ तें गुह्यतम । मी बोलिलों पुरुषोत्तम । हें जाणेल मनुजोत्तम । तो कृतकृत्य अर्जुना! ॥ १११२ ॥ आतां कृतकृत्य । तेव्हां, कीं अपरोक्ष होय आत्मा सत्य । आणि त्या चित्समुद्रीं असत्य । दिसती चराचरजडतरंग. ॥ १११३ ॥ या ब्रह्मविद्येची सिद्धी । ज्यास, त्यासची आहे म्हणावी बुद्धी । त्या बुद्धीची समृद्धी । त्यास होय, जो हें जाणे गुह्यतम शास्त्र. ॥ १११४ ॥ तरी हें जाणोनी बुद्धिमत । होय, म्हणे भगवत । मग कृतकृत्य होय अत्यत । अगा! अनघा! भारता! ॥ १११५ ॥ अघ म्हणजे पाप । अनघ म्हणजे निष्पाप । 'अगा! अनघा! निष्पापा! भारता!' म्हणे मायबाप । जगाचा येथे पार्थातें. ॥ १११६ ॥ कीं तू अनघ निष्पाप । अगण्य तुझ्या पुण्याचा प्रताप । तरी या श्रवणें विगतसंसारसंताप । जालासी तूं. ॥ १११७ ॥ या शब्दांत ऐसा भाव । कीं जो निष्पाप सुस्वभाव । त्यालाच श्रवणसद्भाव । उपजे या शास्त्राचा. ॥ १११८ ॥ आणि भरतवंशज अपार । त्यांत तुजला सांपडले हें निगमसार । यावरूनी जाला जाण उद्धार । भरतवंशाचा अगा! भारता! ॥१११९ ॥ ऐसें बोले गीताकार । वामन त्याचा टीकाकार । विश्व जेव्हां भगवदाकार । तोही भगवतची याकरितां. ॥११२०॥ भगवतची गीताकार । भगवतची टीकाकार । तत्रापि टीका करावयाचा अधिकार । भगवंतची तो. ॥ ११२१ ॥ वामनरूपे भूमीस आला । संतादृष्टीं त्रिविक्रम जाला । अनुभव सर्वात्मतेचा ज्यांला । हे खूण जाणती ते संत. ॥ ११२२ ॥ भगवद्गीतेची टीका । यथार्थ हे यथार्थदीपिका । ज्याच्या चरणप्रतापें, त्याच शेषपर्यंका । श्रीवत्सांका समर्पिली. ॥ ११२३ ॥ टीका समर्पितां पदीं । उचलूनी ठेवी श्रीवत्सपदी । म्हणे [2]जितां नांदतील मत्पदीं । सत्पदीं श्रद्धान या टीकेचे. ॥ ११२४ ॥

---

१. विश्वव्यापक. २. जीवंतपणीच.

## अध्याय सोळावा.

जय जय श्रीसच्चिदानंद! । जय जय श्रीमन्मुकुंद! । जय जयामंदसांद्रानंद[1]! । सद्वृंदपते! संद्गते! ॥ १ ॥ जय जय सुरस! सुरसंपदेकगम्य[2]! । जय जय तैदन्यथासुरसंपदत्यगम्य[3]! । जय जय शुद्धसत्त्वमानसराजहंस! रम्य! । कंसध्वंस! परमहंसगुरो! ॥ २ ॥ जय जय सत्त्वसंवेद्य! निर्गुण! । जय जय गुणत्रयासत्फणिगुण[4]! । जयजयागण्यकल्याणगुण! । षड्गुण! श्रीवल्लभ! श्रीभगवन्! ॥ ३ ॥ जय जय सजलजलदनील! । जय जय भक्तद्रोहासहनशील[5]! । जय जय सचराचराखिल! । निर्खिलोपादानहेतो[6]! ॥ ४ ॥ जय जय वासुदेव! । जय जय देवाधिदेव! । जय जय देवदेव! । वैकुंठपते! ॥ ५ ॥ जय जय गरुडगमन! । जयजयानाद्यविद्याधमन[7]! । जय जय संसारभयशमन! । करुणानिधे! ॥ ६ ॥ जय जय देव! गीताकार! । जय जय देव! टीकाकार! । जय जय देव! सर्वाकार! । वामनगुरो! वामनात्मन्! ॥ ७ ॥ जी! जी! वंदूनी तुझे श्रीचरण । करूनी तुझें मंगलाचरण । स्मरोनी भक्तवात्सल्यादि स्वाचरण । षोडशाध्यायविवरण करितसें. ॥ ८ ॥ 'मी' म्हणावया ठाव नसे । सर्व हें स्वस्वरूप तुझेंची दिसे । सोनें दिसे, मग उल्हसे । नाहींच तोही अलकार. ॥ ९ ॥ ये रीतीचें मीपण । तूंची अवलंबूनी आपण । तूंची आरंभिसी स्वमंगलाचरण । तूची शेवटीं स्वचरणीं समर्पिसी. ॥ १० ॥ तूंची वक्ता वदसी । श्रोता तूंची ऐकसी । श्रोते लक्षूनी तूंची लाविसी । सगति पूर्वापर ऐसी अजी आतां. ॥ ११ ॥ पूर्वाध्यायाचे अतीं । बोलिला श्रीभगवंत ये रीती । कीं हें गुह्यतम शास्त्र सुमती। जाणोनी, होतो बुद्धिमंत कृतकृत्य. ॥ १२ ॥ तरी हें जाणावया अधिकारी । कोण? आणि कोण अनधिकारी? । हें बोलावें याउपरी । तरी अधिकारी दैवी संपत्तीचे मनुष्य. ॥ १३ ॥ आणि आसुरी संपत्तीचे नर । त्यांस नाहीं या ज्ञानाचा अधिकार । कीं अद्वैत आणि सर्वेश्वर । उत्तम क्षराक्षराहूनी जाणावा. ॥ १४ ॥

---

१. अखंड व संपूर्ण आनंदा! २. केवळ दैवीसंपत्तीनेंच प्राप्त होणाऱ्या! (या अध्यायांतील, श्लोक ३,५ व ओव्या १८–४२ पहा.) ३. दैवीच्या उलट जी आसुरी संपत्ती तिला अप्राप्य अशा! (या अध्यायांतील, श्लोक ४, ७–२० पहा.) ४. सत्व, रज, तम, या तीन गुणरूपी सर्पाभासाचें मूळ कारण असणाऱ्या दोऱ्या! सर्पाभासाचें कारण जसा सत्य रज्जु, तसा गुणत्रयरूपी मिथ्याभासाचें जो तूं सत्यस्वरूप मूळ आहेस, त्या तूं! ५. भक्तद्वेष न सोसणाऱ्या! ६. सर्व विश्वाच्या उपादानकारणा! ७. अनादि अविद्यारूप मायेला जाळून टाकणाऱ्या!

जो पुरुष ज्ञानयुक्त । तोची ऐसा सगुणभक्त । परंतु जो प्रथम सगुणचरणीं अनुरक्त । तोची हे पदवी पावे दैवी संपत्तीकरूनी. ॥१५॥ तोची या ज्ञानातें। जाणों शकेल, ऐसें अर्जुनातें । कळावें म्हणोनी भगवंतें । हा अध्याय भारंभिला. ॥ १६ ॥ तरी दैवी संपत्ती । नवमीं बोलिला श्रीपती । ते संक्षेपें येथें बोलावी किमपि रीती । जे पूर्वीच जाली विशद. ॥ १७ ॥

नवमाध्यायश्लोकः—महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।
भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १ ॥
सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ।
नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ २ ॥

ज्यांचे थोर आत्मे । म्हणिजे चित्तें थोर ते महात्मे । दैवी प्रकृतीचा आश्रय करूनी वर्तमें । माझे श्रवणकीर्तनाचे ते धरिती. ॥१८॥ जे दैवी प्रकृती। तेची म्हणावी दैवी संपत्ती । जे प्रकृति अवलंबूनी विष्णु भजती । दैवी संपत्ति ते प्रकृतीतें म्हणावें. ॥ १९ ॥ एवं या गीतेंत स्वभजन । जे जे रीती बोलिला भवभंजन । त्या त्या भजनाचे कर्ते जे जे जन । त्यांच्या प्रकृतीच दैवी संपत्ती ॥ २० ॥ इत्यादि दैवी संपत्ती । पूर्वीं बोलिला जगत्पती । या अध्यायांतही बोलेल ये रीती । कीं सविस्तर मागें दैवी संपत्ति बोलिलों. ॥ २१ ॥ तरी तैसी दैवी संपदा । ज्यांसी प्राप्त जाली सर्वदा । ते श्रवणकीर्तनें गोविंदा । भजतां, अधिकारी होती या ज्ञानाचे. ॥ २२ ॥ तरी ज्यास दैवी संपत्तीनें अधिकार । त्यांसी प्राप्त होती कोण कोण प्रकार? । आणि आसुरी संपत्तीनें अनधिकार । कोण प्रकार प्राप्त होती तयांतें? ॥ २३ ॥ हें बोलिलें पाहिजे अतःपर । म्हणूनी आदीं दैवी संपत्तीचे नर । कोणे रीती पावले अधिकार ? । ते प्रकार आदीं तीं श्लोकीं बोलतो श्रीभगवान्. ॥ २४ ॥

श्रीभगवानुवाचः—अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥

अगा! त्यांस प्राप्त होतें अभय । जातां पुनर्भवाचें[1] भय । जे जाणोनी इच्छिती अद्वय । भजन मज सर्वोत्तमाचें. ॥ २५ ॥ तरी विना चित्तशुद्धी । आत्मा जाणों शके ना बुद्धी । कळलिया नव्हे समृद्धी । समाधिसुखाची अशुद्ध चित्तातें. ॥ २६ ॥ याकारणें सत्त्वसंशुद्धी । म्हणिजे होते शुद्ध बुद्धी ।

१. पुनर्जन्माचें.

ज्या बुद्धीन ज्ञान आणि समृद्धी । समाधि परमानंदाची. ॥ २७ ॥ चित्तशुद्धीही होऊनी बरी । श्रवण अद्वैतशास्त्राचें न करी । नव्हे आत्मज्ञान म्हणूनी हरी । "**ज्ञानयोगव्यवस्थिति**" म्हणतसे. ॥ २८ ॥ ज्ञानयोगीं विशेषें अवस्थिती । ते म्हणावी ज्ञानयोगव्यवस्थिती । **योग** उपायास म्हणती । **अवस्थिति** म्हणिजे राहणें. ॥ २९ ॥ एवं ज्ञानप्राप्तीचे जे काय । बोलिले शास्त्रीं उपाय । ते सोडोनी तो एक पाऊल पाय । अन्य मार्गीं टाकी ना. ॥ ३० ॥ ज्ञानाच्यों यत्नांत असे । संतांच्याच संगीं बसे । कीं अपरोक्षश्रवण करितांच गवसे । मार्ग अपरोक्षसाक्षात्काराचा. ॥ ३१ ॥ वंदूनी संतांचे चरण । त्यांच्या मुखें करणें श्रवण । न समजे त्याचें विवरण । प्रश्न करणें इतरही तथांतें. ॥ ३२ ॥ त्यांची करितां सेवा । त्या रूपें देवाधिदेवा । कृपा उपजतां, वासुदेवा । देखों लागे सर्वभूतीं. ॥ ३३ ॥ हा ज्ञानप्राप्तीचा क्रम । म्हणोनी जाणों इच्छितो जो ब्रह्म । तो इत्यादि उपाय परम । करी ज्ञानप्राप्तीचे. ॥३४॥ ऐसी ज्ञानयोगव्यवस्थिती । त्यास होय, जो अवलंबूनी दैवी संपत्ती । श्रवण कीर्तनादि करूनी श्रीपती । आपणावरी करी संतुष्ट. ॥ ३५ ॥ कीं नवमीं दैवी संपत्तीचे नर । बोलिला जेथें सर्वेश्वर । तेथें म्हणे, ते सादर । सतत मातें कीर्तिती. ॥ ३६ ॥ आतां तिसरिया श्लोकीं । उत्तमश्लोक बोलेल कीं । जो दैवी संपत्तीतें लाधे या लोकीं । त्यास प्राप्त होती हे प्रकार. ॥ ३७ ॥ ऐसीं लक्षणें सव्वीस । देव सांगेल सव्यसाचीस । त्यांत तीन पूर्वार्धीं बोलोनी तेवीस । लक्षणें बोलेल उत्तरार्धापासुनी. ॥ ३८ ॥ **दान** म्हणिजे जें देणें । धनधान्यादि सत्पात्रीं अर्पणें । एवंच वित्तलोभ नसणें । फळ हें दैवी संपदेचें. ॥ ३९ ॥ **दम** इंद्रियनिग्रह, । हा दैवी संपदेचा अनुग्रह । यज्ञ अधिकारानुरूप संग्रह । सत्कर्मांचा. ॥ ४० ॥ विभूतिअध्यायांत । 'यज्ञांत जपयज्ञ मी' म्हणे भगवंत । अधिकार हरिनामीं अत्यंत । सर्वांसही. ॥ ४१ ॥ नारी अथवा नर । जे दैवी संपत्तीस तत्पर । ते यथाधिकार सादर । श्रवणादियज्ञांतें. ॥ ४२ ॥ **स्वाध्याय**—वेदपठण- । त्याहूनी थोर हरिगुणकीर्तन । अधिकारी सर्व जन । हरिगुणकथनीं सर्वदा. ॥ ४३॥ **तप** कायिक, वाचिक, मानसिक । शीतोष्णद्वंद्वसहनादिक । सर्वां तपांहूनी तप अधिक । भजन वासुदेवाचें. ॥ ४४ ॥ आतां **आर्जव** । म्हणिजे ऋजुभाव । ऋजुभाव म्हणिजे नाहीं वक्र स्वभाव । सुरळीत वर्तन सर्वांसी. ॥ ४५ ॥ बोलणें स्पष्ट, नीट । वर्तणें निष्कपट । वक्रता नसणें निपट । हें फळ दैवी संपदेचें. ॥ ४६ ॥

---

१. अध्याय १०. २. अ० १०, श्लो० २५.

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।**
**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥**

कदापि न घडे हिंसा । त्या नांव **अहिंसा** । परपीडेंचा जो वळसा[1] । तें हिंसा न घडणें. ॥ ४७ ॥ एवं परपीडा कधीं न करणें । आणि **सत्य** सर्वदा बोलणें । आणि **अक्रोध** म्हणजे क्रोध नसणें । फळ दैवी संपत्तीचें. ॥ ४८ ॥ आणि **त्याग** । म्हणजे टाकणें सर्वसंग । देहनिर्वाहाचा तों अगत्य प्रसंग । त्याग वासनासंगाचा. ॥ ४९ ॥ एक देहनिर्वाह । एक वासनाप्रवाह । एवं विषयवासनेचा परिग्रह । त्याग त्याचा फळ दैवी संपत्तीचें. ॥ ५० ॥ आतां **शांति** ये रीती । कीं सिद्धांची जे जीवन्मुक्तस्थिती । कामादिलहरिया समूळ नुरती । वायु राहतां वासनेचा. ॥ ५१ ॥ प्रस्तुतीं हा साधक । यास ते न्हवती बाधक । विवेकबळें कामादिक । न क्षोभती, हे शांति साधकांची. ॥ ५२ ॥ आणि **अपैशुन** । दोष एकाचे एकाम मांगे तो पिशुन । तें अवलक्षण पळे त्यापासून । जो अभिमुख होय दैवी संपदेतें. ॥ ५३ ॥ एवच कोणाचपाशीं कोणाचा । दोष न वदे त्याची वाचा । होय ऐसा स्वभाव त्याचा । अभिमुख दैवी संपदेस जो जाला. ॥ ५४ ॥ आतां सर्वभूतीं दया । ते भगवद्भावें ज्ञानियास सदयहृदया । अनुभव नसोनीही या महोदया । श्रवणेंही दैवी संपत्तीच्या पावतो. ॥ ५५ ॥ **अलोलुप्त्व** म्हणजे अलोलुपता । नसणें कांहीं लंपटता । हाही गुण प्राप्त होतो तत्त्वता । दैवी संपत्तीच्या स्वभावें. ॥ ५६ ॥ **मार्दव** म्हणजे मृदुपण । म्हणजे कठिण नसणें अंतःकरण । हाही अत्यंत कोमल गुण । होतो प्राप्त दैवी सपदेकरूनी. ॥ ५७ ॥ **ह्री** म्हणजे लाज । म्हणजे न करणें अमंगळ काज । दैवी संपदेचा धनी महाराज । लाजे सर्वसाक्षी ईश्वरातें. ॥ ५८ ॥ जन जनानें लाजती । गुप्त निर्लज्ज कर्में करिती । ते न्हवे लज्जेची जाती । तें भय म्हणावें लोकांचें. ॥ ५९ ॥ आतां **अचपलपण** । म्हणजे नसणें चपललक्षण । स्थिर असणें अंतःकरण । हेंही दैवी संपत्तीकरूनी. ॥ ६० ॥

**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।**
**भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥**

**तेज** म्हणजे तेजस्विपण । श्रेष्ठत्वाचें लक्षण । ज्यास देखतां होय स्फुरण । श्रेष्ठत्वाचें तयाच्या. ॥ ६१ ॥ तो जनदृष्टीं वाटे थोर । अमर्याद बोलों न

---

[1] १. स्वीकार.

शकती समोर । पाहती निरभिमानी मोर । त्या तेजोराशी जलधरा. ॥ ६२ ॥ हा दैवी संपत्तीचा महिमा । आणि तेज ऐसें असोनी **क्षमा** । ज्या अपराधांस नाहीं सीमा । तेही सोसणें. ॥ ६३ ॥ आतां **धृती** । **धृति**शब्दाचे दोन अर्थ होती । धृति धैर्यास म्हणती । आणि धृति म्हणजे धारणा. ॥ ६४ ॥ तरी या गोष्टी दोनी । दैवी संपत्तीचकरूनी । धैर्य आणि स्वहिताची धारणाही धरूनी । सत्संग श्रवण धरणें बुद्धींत. ॥ ६५ ॥ आतां **शौच** शुद्धता । बाह्य मृत्तिका-जळें शुचिर्भूतता । अंतरीं निर्मलता । चित्ताची. ॥ ६६ ॥ आतां **अद्रोह** । न करणें कोणाचा द्रोह । परघातकताआग्रह । **द्रोह**शब्दें. ॥ ६७ ॥ एकास पीडा केली । ते हिंसा जे घडोनी आली । आणि एकास पीडा करूं इच्छिली । द्रोह म्हणावें तयातें. ॥ ६८ ॥ आतां **'नातिमानिता'** । म्हणजे अतिक्रमूनी असणें मानिता । मानिता म्हणजे स्वगुणश्लाघ्यता । त्या श्लाघ्यतेतें. ॥ ६९ ॥ मी एक ऐसा गुणवंत । मी एक ऐसा धनवंत । मी एक ऐसा संत । इत्यादि श्लाघा मानिता म्हणावी. ॥ ७०॥ ऐसी मानिता अतिक्रमूनी । म्हणजे श्लाघ्यता मनीं न धरूनी । वर्तणें हे नातिमानिता दैवी संपत्तीकरूनी । होत असे. ॥ ७१ ॥ ऐसीं सव्वीस लक्षणें । बोलिलीं जीं **कमलेक्षणें** । त्यांचीं वेगळीं वेगळीं विवरणें । केलीं कीं हीं होती दैवीसपत्तीकरूनी. ॥७२॥ ऐसीं **श्रीहरी** । उगीच लक्षणें बोलिला परी । हीं दैवीसपत्तीकरूनी होती यापरी । अद्यापि नाहीं बोलिला. ॥ ७३ ॥ तें या श्लोकीं उत्तरार्धेंकरूनी । **"भवंति संपदं दैवीमभिजातस्य"** म्हणोनी । म्हणतो कीं हीं **'अभयं सत्त्वसंशुद्धिः'** येथुनी । जीं लक्षणें तुज बोलिलों, ॥ ७४ ॥ हीं होती त्याला । जो दैवी संपत्तीनेंची अभिमुख जाला । ऐसें **भ**गवत बोलिला । ते दैवी संपत्ति नवमादिकीं वर्णिली. ॥ ७५ ॥ येथें **भ**गवत **पांडुसुता** । म्हणे, अगा! **भारता**! । यांत गहन भाव **सु**चवी, तो आतां । कांहीं येथें बोलावा. ॥ ७६ ॥ कीं कोणी तरी हो वंश । आसुरी संपत्तीनें बुद्धिभ्रंश । आणि दैवी संपत्तीचा जेथें अंश । तेथें प्रवृत्ति स्वभजनीं होतसे. ॥ ७७ ॥ हा भाव दावी **पांडुसुता** । म्हणतां, अगा! **भारता**! । कीं **भ**रतवंशजच तत्त्वता । **धृ**तराष्ट्रसुत आणि **पांडुसुत** तुम्ही. ॥ ७८ ॥ त्या **दु**र्योधनादिकांची प्रवृत्ती । अवघी आसुरी संपत्ती । आणि तुमची दैवी ये रीती । **प्र**ऱ्हादादि असुर होऊनी. ॥ ७९ ॥ **हिरण्यकशिपु-हिरण्याक्ष** । पुत्र **कश्य**पाचे प्रत्यक्ष । तो दैवी संपत्तीचा आणि पुत्र दक्ष । आसुरी संपदा भोगावया. ॥ ८० ॥ तो असुर अंगमळ । त्याचा **प्रऱ्हाद** पुत्र भक्त माझा सुमंगळ । जो भजे भजची केवळ । ते **ब्रह्मा**दिकांपासूनी वर घेती.

॥ ८१ ॥ ज्याचा पुत्र रावण । त्याचाच पुत्र बिभीषण । वडील आसुरी संपत्तीचा दारुण । धाकुटा माझा शरण दैवीसंपत्तीचा. ॥ ८२ ॥ एवंच वंश नव्हे प्रमाण । मज भजे तोची दैवी संपत्तीचा जाण । तूं दैवी संपत्तीचा, तुझीच आण । 'भारता!' म्हणतां भाव ऐसा सुचवी. ॥ ८३ ॥ आतां जे आसुरीसंपत्तीतें अभिमुख । पाहों नये जयांचें मुख । त्यांस काय काय होतें तें विश्वतोमुख । बोलतसे या श्लोकीं. ॥ ८४ ॥

**दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥**

जो आसुरी संपत्तीतें लाधला । तो लौकिकार्थ जरी सन्मार्गी लागला । तरी दंभची उपजे त्याला । श्रद्धा नसे सन्मार्गीं. ॥ ८५ ॥ पुढें आसुरी संपत्तीचे नर । बोलेल देव जेथें सविस्तर । तेथें एक चार्वाक प्रत्यक्षवादी तत्पर । एक दांभिक वेदमार्गी. ॥८६ ॥ म्हणूनी दंभ शब्दाचा अर्थ । द्विविध सुचवी येथें समर्थ । एक चार्वाक, एक लौकिकार्थ । वेदोक्त कर्मे जो आचरे. ॥ ८७ ॥ पुण्य आणि पातक । स्वर्ग आणि नरक । कर्मफल जन्मांतर हें कांहीं चार्वाक । अंगीं न करिती. ॥ ८८ ॥ त्यांस दंभ करणें । आपण भोगीं समर्थ म्हणवाया कारणें । हें विशद विवरणें । स्वयेंची करील भगवंत. ॥८९॥ जो लौकिकार्थ । कर्मे करी, मनीं म्हणे सर्व व्यर्थ । त्याचें करणें दंभार्थ । दंभ शब्दार्थ अधिकारानुरूप ये रीती. ॥ ९० ॥ आतां दर्प गर्वातें म्हणती । अभिमान क्रोध अधिक उपजती । पारुष्य म्हणजे अती । निष्ठुर काया, वाचा, मनें. ॥ ९१ ॥ हृदय ज्याच्या शब्दें फुटे । हात लागतां जीवित्व खुंटे । हृदय त्याचें कळतां वाटे । मृत्यु यम कृतांत तो. ॥ ९२ ॥ आणि अज्ञान । म्हणजे स्वहित काय हें नेणे ज्ञान । स्वहित दंभादिकींची ऐसें समाधान । कीं विश्वास वेदशास्त्रीं बसेना. ॥ ९३ ॥ जो आसुरी संपत्तीतें अभिमुख । तो ऐसा ज्याचें पाहों नये मुख । म्हणोनी संक्षेपें विश्वतोमुख । आसुरी संपत्ति या श्लोकीं बोलिला. ॥ ९४ ॥ आतां दैवी संपत्तीची प्रवृत्ती । कोणे गोष्टीकारणें आणि आसुरी संपत्ती । कोणे गोष्टीकारणें हें जगत्पती । बोलेल पूर्वार्धीं या श्लोकाच्या. ॥ ९५ ॥

पूर्वार्ध—**दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता ।**

अगा! जे मोक्षाची पदवी । तीकारणें हे संपत्ति दैवी । आणि अतिशयें बंधींच गोंवी । आसुरी निर्माण या कारणें. ॥ ९६ ॥ तेथें 'विमोक्ष' म्हणतां

मोक्षातें । आणि 'निबंध' म्हणतां बंधातें । जो विचारील त्यातें । विशेषार्थ भगवंत सुचवी. ॥ ९७ ॥ विपरीतभावापासूनी । मोक्ष तो म्हणावा विमोक्ष म्हणोनी । कीं आत्मा आपण अविवेंककरूनी । मी देह म्हणतसे उपाधियोगें. ॥ ९८ ॥ बुद्धीस जीवोपाधिपण । ते आत्मा मानी शरीर त्रिगुण । जरी चिदात्मत्वाची कळे तीस खूण । तरी मोक्ष पावे जीव विपरीतभावापासुनी. ॥ ९९ ॥ तैसाच आत्मा आपण । जडजगनगीं व्यापक चित्सुवर्ण । ऐसें असोनी जडपण । सत्य वाटे हेही विपरीतभावना. ॥ १०० ॥ मी देह हा विपरीत अभिमान । जाय कळतां व्यतिरेकज्ञान । अन्वयें नासे जडत्वभान । तेव्हां मोक्ष विपरीतभावनेपासुनी. ॥ १०१ ॥ जाय भावना विपरीत । तो मोक्ष विमोक्ष जाणावा निश्चित । त्या विमोक्षाकारणें म्हणे भगवंत । दैवी संपत्ती. ॥ १०२ ॥ आतां म्हणावा बंध । तेथें म्हणे निबंध । कीं अविद्याबंधसंबंध । अनादि असे. ॥ १०३ ॥ त्या अनादि बंधावरी । अतिशयें आसुरी संपत्ति बंध करी । कीं संपत्ति ज्यांस आसुरी । त्यांस द्रोह घडे भगवद्भक्तांचा. ॥ १०४ ॥ ज्ञानी भक्त संत । द्रोह त्यांचा करी तो दुष्टचित्त । मोक्ष न घडे तयां कधीं ऐसें भगवंत । बोलेल याच अध्यायीं. ॥ १०५ ॥ सहज अनादि भवपाश । त्याचा भगवत्प्रसादें होणार नाश । भक्तद्रोह करिती तयां प्रकाश । कधींच नव्हे भगवत्तत्त्वाचा. ॥ १०६ ॥ सहज अनादि अज्ञानबंध । तो ज्ञानसलिलें नासे दुर्गंध । परंतु आसुरी संपत्ति करी निबंध । तो कधीं तुटेना. ॥ १०७ ॥ यालागीं जो सहज भवपाश । तो कधीं तरी पावों शके नाश । तो बंधची नव्हे, कीं होतां भगवत्कृपाप्रकाश । क्षणांत नासे तम अविवेचें. ॥ १०८ ॥ भगवद्भक्तांचा द्रोह करिती । ते कधींही मोक्षातें न पावती । बंध तो हाच, ज्यास आसुरी संपत्ती । निमित्त होय. ॥ १०९ ॥ या भावें म्हणे भगवंत । निबंध म्हणजे बंध अत्यंत । करी आसुरी संपत्ति कीं अंत । नसे बंधास भक्तद्वेपियांच्या. ॥ ११० ॥ ऐसें आसुरीसंपत्तीचें विवरण । अर्जुनें केलें श्रवण । तों मनीं उपजलें भय दारुण । जरी करुण 'भारता!' म्हणोनी मागें बोलिला. ॥ १११ ॥ 'भारता!' म्हणोनी । दैवी संपत्ति सांगतां या नांवें आळवूनी । तूं दैवी संपत्तीचाच ऐसें त्यावरूनी । सुचविलें पार्थातें. ॥ ११२ ॥ परंतु सांगतां आसुरी । दंभ, गर्वाभिमान, क्रोध, हरी । बोलिला त्यानें अंतरीं । खोंचला पार्थ. ॥ ११३ ॥ कीं हे दोष आपणांतही दिसती । तेव्हां आपणासही असेच आसुरी संपत्ती । ऐशी शंका मानिली चित्तीं । ते सर्वसाक्षी

हिनी । राक्षस मनुष्यांसही भक्षिती म्हणूनी । प्रकृति त्यांची अत्यंत दारुण. ॥ १४९ ॥ हे तीनी मिळोनी असुर । ते आतां सविस्तर । सांगेन म्हणोनी सर्वेश्वर । म्हणतसे या श्लोकीं. ॥ १५० ॥

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।**
**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥**

या लोकीं अगा! पार्था! । उद्भव भूतांचा पाहतां सर्वथा । दोंपरी, त्यांत दैवी संपत्तीची कथा । विस्तारें तुज बोलिलों. ॥ १५१ ॥ कीं माझे भजन-प्रकार । जे बोलिलों वारंवार । ते सकळही जाण विस्तार । दैवीभूतसृष्टीचे. ॥ १५२ ॥ आतां असुरभूतस्वभाव । मी सांगेन देवाधिदेव । तें आसुरीचें वैभव । आईक मजपासुनी. ॥ १५३ ॥ त्या आसुरीचमध्यें मोहिनी । आणि राक्षसीही म्हणोनी[1] । असुर शब्दापुढें **'एव च'** या तीन अक्षरेंकरूनी । सुचवी ऐसें. ॥ १५४ ॥ की जे आसुरी । तेची मोहिनी राक्षसी सृष्टि खरी । यालागीं आसुरी म्हणोनी हरी । ऐक म्हणतसे. ॥ १५५ ॥ एवशब्दें हें सुचविलें । आतां चकार अक्षर एक राहिलें । तरी चार्वाकादि सांगूनी पहिले । मग दांभिक वैदिक बोलेल. ॥ १५६ ॥ दुसरा भेद त्यांत । तोही आईक म्हणे भगवंत । चकारें ऐसें निश्चित । सुचविलें. ॥१५७॥ त्या असुरसर्गांत । एक प्रत्यक्षवादीच अत्यंत । जे न मानिती वेदमत । ते बोलतो, त्यांत आरंभीं हा श्लोक. ॥ १५८ ॥

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।**
**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥**

वेदीं एक प्रवृत्ती । ते धरिती सकाम ज्यांची चित्तवृत्ती । दुसरी वेदीं निवृत्ती । तो मोक्षमार्ग मुमुक्षूंचा. ॥ १५९ ॥ जे असुर अवैदिक । प्रत्यक्ष-वादी चार्वाक । त्यांस त्या दोहीं मार्गांत कोणी एक । मार्ग नसे. ॥ १६० ॥ प्रवृत्ति अथवा निवृत्ती । एकही ते न जाणती । दोहींच्या दोन रीती । त्यांस नाहीं, म्हणतो भगवंत. ॥ १६१ ॥ कीं प्रवृत्तीस शौचाचार । शुचिर्भूतता सदाचार । इतुकें पाहिजे, हे दोन्ही प्रकार । न जाणती. ॥ १६२ ॥ जे निवृत्तिमार्गी निघाले । ते शौचाचारेंची शुद्ध जाले । मग सत्यस्वरूपाच्या अनुभवें धाले । तेही लोकसंग्रहार्थ ते करिती. ॥ १६३ ॥ त्यांत कोणी वर्णा-श्रम । टाकूनी वेदोक्तधर्म । सर्वभूतीं पाहती ब्रह्म । ते शौचाचारहीनही दिसती.

१. आसुरी उत्पत्तींत. २. चार्वाक.

॥ १६४ ॥ तरी शौचाचारहीन । जे **अवैदिक वर्णिले हें वचन** । त्या अर्थी समजेल अर्जुन । म्हणोनी म्हणतो **"न सत्यं तेषु विद्यते."** ॥ १६५ ॥ कीं सत्यस्वरूप संतां दिसे । तें त्यां असुरांत कैंचे वसे ? । परी तूं क्षणीं ज्ञानी शौचाचारहीन जैसे । तैसे मानिसी. ॥ १६६ ॥ तरी सत्य त्यांत । नसे, म्हणे भगवंत । **सत्य**शब्दें निर्गुण अनंत । तें नसोनी ते ऐसे. ॥ १६७ ॥ त्यांमध्यें ब्रह्म नसे । म्हणजे त्यांच्या बुद्धीचमध्यें न गवसे । कीं ब्रह्मची जया जग दिसे । तें ब्रह्म वसे बुद्धीचमध्यें तयांच्या. ॥ १६८ ॥ प्रस्तुतीं सत्य जें ब्रह्म । तें त्यांच्या ठायीं नाहीं, म्हणे पुरुषोत्तम । तें यानिमित्त, कीं जे हंस परम । तेही ऐसेच आचारहीन दिसती. ॥ १६९ ॥ प्रवृत्ति आणि निवृत्ती । दोनीही ते न जाणती । आणि शौचाचारही राहती । ब्रह्म पाहतां सर्वदा. ॥ १७० ॥ कीं सत्य सांपडलें ज्याला । असत्य मग कां त्याला ? । या श्लोकीं जें देव बोलिला । तें सत्य, त्यावेगळें अवघें मायिक. ॥ १७१ ॥ मायामात्र प्रवृत्ती । मायाच मोक्षांगही निवृत्ती । शौच आचारही मायावृत्ती । हें इतुकेंही नसे परमहंसातें. ॥ १७२ ॥ तेची असुरजना । नाहीं म्हणतां, अर्जुना । शंका वाटेल म्हणूनी भवभंजना । सर्वज्ञास येथें वाटलें. ॥ १७३ ॥ कीं परमहंस कर्मातीत । तेही ऐसेची निश्चित । ये रीती पार्थ मानील, हें भगवंत । सर्वसाक्षी समजला. ॥ १७४ ॥ तरी ज्याचे ठायीं वसे सत्य । त्यास हें नलगे असत्य । ज्या असुरांचें हें पांडित्य । सत्य हें त्यांच्या ठायीं असेना. ॥ १७५॥ म्हणोनी भगवद्वाणी वदने । कीं **"न सत्यं तेषु विद्यते"** । एवंच ब्रह्म ज्यांच्या बुद्धींत न कळे ते । शौचआचारहीन असुर, हा भाव. ॥ १७६ ॥ परंतु सत्य असुरांच्याच ठायीं नसे । म्हणतां वेदमार्गीही बहुत ऐसे । कीं सत्य न कळे, परी असे । शौचआचार. ॥ १७७ ॥ तरी तेही म्हणावे काय असुर ? । जे दयाळू नव्हती क्रूर । वेदोक्त अर्थी तत्पर । आणि सत्य तरी न जाणती. ॥ १७८ ॥ ऐसी शंका श्रोता । तेथें मानील म्हणोनी अच्युता । वाटलें, तरी वेदीं अश्रद्धता । तेची ऐसे म्हणूनी बोलों इच्छिलें. ॥ १७९ ॥ जे वेदांस विपरीत बोलती । तेची असुर होती । ऐसें बोलतां सिद्ध होतें ये रीती । कीं वेदमत मानिती ते न म्हणावे असुर. ॥ १८० ॥ यालागीं वेदविरुद्ध मत । त्यांचें बोलों पाहतो भगवंत । त्यांत सत्य नाहीं त्यांच्या ठायीं हें जें बोलिला प्रस्तुत । तें विशद करीतच बोलतो या श्लोकीं. ॥ १८१ ॥

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।**

**अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥**

अगा! सत्य जें का ब्रह्म । तेंची जग म्हणती निगम । जे असुर अवैदिक अधम । ते सत्य ब्रह्म, जग नव्हे, ऐसें बोलती. ॥ १८२ ॥ अब्रह्म जग बोलती । ऐसें बोलों पाहे जगत्पती । परी पूर्वश्लोकीं श्रीपती । सत्य ब्रह्म त्यांच्या ठायीं नाहीं, ऐसें बोलिला. ॥१८३॥ ब्रह्म पूर्वश्लोकींही म्हणावें । तेथें सत्य म्हणोनी बोलिला या भावें । कीं सत्य कळतां स्वभावें । असत्य शौचआचार राहती. ॥ १८४ ॥ तैसे नव्हती असुर । कीं सत्य जें परात्पर । तें त्यांच्या ठायीं नसे, ऐसें सर्वेश्वर । पूर्वश्लोकीं बोलिला. ॥ १८५ ॥ त्याचे सत्यशब्दें ब्रह्म । तें ब्रह्मची जग, म्हणती निगम । "सर्वं खल्विदं ब्रह्म । पुरुष एवेदं सर्वं" श्रुति इत्यादि. ॥ १८६ ॥ श्रुति म्हणे "सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म" । ऐसें सत्यशब्दें ब्रह्म निगम । बोलती, म्हणोनी पुरुषोत्तम । पूर्वोक्त सत्यशब्दें ब्रह्म बोलतो. ॥ १८७ ॥ कीं जग नव्हे ब्रह्म । आणि जग अब्रह्म । जग असत्य म्हणती अधम । म्हणजे ब्रह्म जग नव्हे, ते म्हणती. ॥ १८८ ॥ त्यांच्या ठायीं नाहीं सत्य । पूर्वश्लोकीं बोलिला हे त्याचें पांडित्य । कीं जग म्हणती असत्य । म्हणिजे ब्रह्म जग नव्हे, ते म्हणती. ॥ १८९ ॥ जग ब्रह्म नेणे । तो काय ब्रह्म जाणे? । ते ब्रह्म सत्य पूर्वश्लोकीं नाहीं म्हणे । त्यांच्या ठायीं तें ऐसें. ॥ १९० ॥ अतएव अप्रतिष्ठ जग म्हणती । कीं अधिष्ठानीं विवर्त ऐसे न मानिती । अधिष्ठानीं प्रतिष्ठित विवर्त हे मती । त्यांस नाहीं, ऐसा अर्थ. ॥ १९१ ॥ सर्प रज्जूच्या ठायीं प्रतिष्ठित । नग सुवर्णीं प्रतिष्ठित निश्चित । हे न मानूनी अप्रतिष्ठित । म्हणजे स्वयेंची अनादि अनंत जग बोलती. ॥ १९२ ॥ कीं जग उपजते । आणि असोनी नाशतें । ऐसे वाटे जयातें । ते कारणीं कार्य प्रतिष्ठित मानिती. ॥ १९३ ॥ ऐसें उपादान कारण । न मानूनी असुरगण । निमित्तकारण ईश्वर सगुण । तोही नाहीं ते म्हणती. ॥ १९४ ॥ कीं जग म्हणती अनीश्वर । जगास नाहींच म्हणती ईश्वर । एवंच उपादानकारण न मानिती असुर । आणि निमित्तकारणही न मानिती. ॥ १९५ ॥ कीं अलंकारउपादान सुवर्ण । तैसें जगउपादान निर्गुण । आणि सोनार निमित्त तैसें सगुण । हीं वेदोक्त दोन्ही न मानिती. ॥ १९६ ॥ तरी विश्व जालें कैसें? । म्हणूनी पुसतां ऐसे । परस्परसंभूत वेद बोलती जैसें । तैसें न म्हणती. ॥ १९७ ॥ 'प्रकृतिपुरुषयोगेंकरूनी । परस्पर जालें' म्हणोनी । वेद बोलती, ते न मानूनी, । 'नव्हे परस्परसंभूत' ते म्हणती. ॥ १९८ ॥

चतुर्दशीं " मम योनिर्महद्ब्रह्म"। "तस्मिन् गर्भं दधाम्यहं" म्हणे पुरुषोत्तम। "संभवः सर्वभूतानां ततो भवति" ऐसें निगम। परस्परयोगें जग म्हणती ॥ १९९ ॥ वेद म्हणती परस्परसंभूत, । ते म्हणती अपरस्पर-संभूत, । कीं आकाशादि जें जें भूत, । तें तें अनादि. ॥ २०० ॥ कोणी निर्मिलें नसे, । कीं प्रत्यक्ष कोणी कर्ता न दिसे, । आतां देह उपजती कैसे?। पुसतां, म्हणती हेतु 'काम'. ॥ २०१ ॥ एक भूतरूप जग। तें अनादि, त्यास ते न मानिती परस्परयोग, । दूसरें भौतिक, त्यास अनंग। स्त्रीपुरुषसंग हेतु मानिती. ॥ २०२ ॥ भूतांचे अंश भौतिक। देह द्विपद, चतुष्पद, इत्यादिक। त्यांस उत्पत्तिहेतु चार्वाक। कामाची मानिती. ॥ २०३ ॥ कीं प्रत्यक्ष हें दि-सतें। शरीर नरनारीयोगें उपजतें, । भौतिक जग उत्पन्न होतें, । तरी हें का-महेतुक ते म्हणती. ॥ २०४ ॥ प्रत्यक्ष नव्हे जन्मांतर, । न दिसे पूर्वकर्म, न दिसे ईश्वर, । हेतु तों नारीनर, । कामहेतु तयांसही. ॥ २०५ ॥ प्रत्यक्ष काय आणीक असे?। कांही आणीक न दिसे, । आणीक काय? म्हणोनी ऐसे। वादी प्रवर्तती. ॥ २०६ ॥ "किमन्यत्" म्हणोनी, । अर्थ ऐसा या वचनीं। सुचवी, कीं प्रत्यक्षावांचूनी, । ते म्हणती, काय असे? ॥ २०७ ॥ ऐसे अवै-दिक। देवें वर्णिले चार्वाक; । परतु अद्वैत शास्त्राचे असूयक, । ते असत्य शब्दार्थ अन्यथा वाखाणिती. ॥ २०८ ॥ नाहीं तो दोष ठेविती। त्यास अ-सूया शास्त्री म्हणती, । ऐसी अद्वैतअसूया करिती, । ते भेदवादी असूयक. ॥ २०९ ॥ असत्य जग बोलती, । सत्य ब्रह्म, तें जग नव्हे, म्हणती; । या अर्थीं पूर्वानुसंधानें जगत्पती। बोलिला येथें, ते न मानिती हा अर्थ. ॥२१०॥ सत्य म्हणजे खरें, । असत्य म्हणजे लटकें, या प्रकारें। जग मिथ्या म्हणती, म्हणोनी सुखशेखरें। अद्वैतवादी निंदिले, ते म्हणती. ॥ २११ ॥ एवंच जग म्हणती असत्य। ते असुरची सत्य, । म्हणोनी करावया पांडित्य। अवकाश त्यांस येथें सांपडला. ॥ २१२ ॥ लेश भेदास नाहीं अवकाश, । तेथें विपरीत बोलती सावकाश, । येथें त्यांच्या बुद्धीचा प्रकाश। अत्यंत जाला. ॥ २१३ ॥ कीं 'जग मिथ्या' म्हणोनी। बोलती अद्वैतशास्त्रीं प्रतिवचनीं, । भेदवादियांस त्या असत्यपदेंकरूनी। सांपडला अवसर. ॥ २१४ ॥ प्रतिपदीं अद्वैत बोले निगम, । "एकमेवाद्वितीयं ब्रह्म। पुरुष एवेदं सर्वम्"। इत्यादि. ॥ २१५ ॥ " मायामात्रमिदं द्वैतं " म्हणोनी। श्रुति मिथ्या द्वैत बो-लते, सोडूनी, । "वासुदेवः सर्वमिति" इत्यादि वचनीं। गीता अद्वैत बोले

१. अ० १४, श्लो० ३. २. द्वेष करणारे व नसतीं नांवें ठेवणारे. ३. अ० ७, श्लो० १९.

तें सोडिलें. ॥ २१६ ॥ द्वैताविषयीं एकही प्रमाण । नसोनी जें अद्वैत वेदसिद्ध, तें अप्रमाण । म्हणती, त्याचें शास्त्र निर्माण । जालें मोक्षमार्ग मोडावया. ॥ २१७ ॥ या गीतेंत "वासुदेवः सर्वमिति"। जडब्रह्मैक्य बोले श्रीपती । "क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि" ये रीती । जीवेश्वरऐक्य. ॥ २१८ ॥ "सर्वतः पाणिपादं तत्" म्हणोनी, । पुनःपुन्हा इत्यादि वचनीं । जडब्रह्मैक्य स्थापुनी, । अद्वैत बोले. ॥ २१९ ॥ "ममैवांशो जीव" या वचनीं । पुनः जीवेश्वरऐक्य म्हणोनी, । अद्वैत सर्वथा सिद्ध करूनी, । 'जग असत्य असुर बोलती' तो कां म्हणेल ? ॥ २२० ॥ जग मिथ्या असे जरी, । अद्वैत सिद्ध होय तरी, । दोंत एक अगत्य, तरी वेदवैखरी । "सर्वं खल्विदं ब्रह्म," । म्हणतसे. ॥ २२१ ॥ अष्टादशीं सात्त्विक ज्ञान, । अद्वैत आणि द्वैत राजसज्ञान, । हें सोडूनी पूर्वापरानुसंधान, । 'जग असत्य असुर बोलती' म्हणोनी तो कां म्हणेल? ॥ २२२ ॥ तेंही असो; या वचनीं । जरी असुर जग मिथ्या बोलती म्हणोनी, । तरी ते जग निरीश्वर म्हणती, यावरूनी । प्रत्यक्षवादी चार्वाक. ॥ २२३ ॥ कामहेतुक जग, । आणि न मानिती परस्परसंयोग, । इत्यादि चार्वाकप्रसंग । स्पष्ट दिसतो. ॥ २२४ ॥ सप्तमीं म्हणे श्रीपती । "वासुदेवः सर्वमिति । स महात्मा सुदुर्लभः" इत्यादि रीती, । तो ऐसें कैसें बोलेल सर्वज्ञ ? ॥ २२५ ॥ एक सर्व, एक वासुदेव, । दोंस ऐक्य बोलेल कैसें देव? । घट होईल स्वयमेव । पट कैसा? ॥ २२६ ॥ पटाचा नव्हे घट। घटाचा नव्हे पट, । दोन म्हणतांच निपट । द्वैत सिद्धच होतसे. ॥ २२७ ॥ ऐसें असोनी बोलती वेद । जैसे सर्व आणि ब्रह्म यातें अभेद, । तैसा सर्वांस वासुदेवास दावूनी भेद, । अभेद भगवंत बोलतो. ॥ २२८ ॥ हें सर्वज्ञाचें वचन, । अन्यथा म्हणणेंची अज्ञान, । आणि याचा अर्थ लागे तेंची ज्ञान, । तरी समाधान जगमिथ्यात्वाविना घडेना. ॥ २२९ ॥ तो सोनेंची सर्व म्हणे, । जो अलंकारमिथ्यात्व जाणे । सर्व मृत्तिका तरीच बाणे, । जरी मिथ्या कळती घटादि आकार. ॥ २३० ॥ जो तरंग मिथ्यात्व जाणेल, । तोची सर्वही सागर म्हणेल; । ज्यास अनुभव ऐसा बाणेल, । तोची अद्वैत साधील त्या वचनेंकरूनी. ॥ २३१ ॥ जो बोलेल सर्व कनकत्व, । तो कां निंदील जगमिथ्यात्व? । जो स्तवील वासुदेवसर्वत्व, । तो सर्वमिथ्यात्व निंदील, हें न घडे. ॥ २३२ ॥ जो निंदील जगमिथ्यात्व, । त्यानें निंदिलें वसुदेवाचें सर्वत्व, । 'सर्व वासुदेव' ऐसें तत्त्व । हाची सर्वज्ञ बोलतो ॥ २३३ ॥ आतां 'सर्व वासुदेव' । हें गीतेंत

१. अ० १३, श्लो० २. २. अ० १३, श्लो० १३. ३. अ० १५, श्लो० ७.

बोले देव, । "सर्वं खल्विदं ब्रह्म" हें तोची स्वयमेव । अनादि वेदवाणी बोलतो. ॥ २३४ ॥ येथें भेदवादियांचा कुतर्क, । कीं 'सर्व म्हणिजे सर्वव्यापक,' । तरी सर्वव्यापकत्वकौतुक । दिसतसे आकाशाचेंही. ॥ २३५ ॥ परीं आकाश सर्व म्हणेल कवण ? । त्यास कैचें सर्वज्ञपण? । एवंच अयुक्त मत अवलक्षण, । असोत गोष्टी तयांच्या. ॥ २३६ ॥ प्रस्तुतीं, ज्यांच्या मतें नाहीं ईश्वर, । ज्यांच्या मतें नाहीं जन्मांतर, । ऐसे वर्णिले असुर । या श्लोकीं. ॥ २३७ ॥ 'प्रत्यक्षच सत्य' ऐसा निश्चय, । त्यांस नाहीं ईश्वराचें भय, । ऐसा त्यांचा निर्णय । म्हणोनी पापें करिती, ऐसें बोलतो या श्लोकीं. ॥ २३८ ॥

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।**
**प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥**

पूर्वश्लोकोक्त गोष्टी । अवलंबूनी ऐशा दृष्टी, । अल्पबुद्धि ते करिती कष्टी । उग्रकर्में जगातें. ॥ २३९ ॥ जगाचा होय क्षय । ऐसीं उग्र कर्में करिती निर्भय, । प्रत्यक्षमात्रीं ज्यांचा निश्चय, । ऐशा अल्पबुद्धि जयांच्या. ॥ २४० ॥ ते जगाचे वैरी, । सर्वत्र हिंसा, मारामारी, । करिती ते कां ऐसें ? तरी । स्वकामसिद्ध्यर्थ, म्हणतो या श्लोकीं. ॥ २४१ ॥

**काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ।**
**मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्ततेऽशुचिव्रताः ॥ १० ॥**

जो काम दुष्पूर, । म्हणिजे कधीं नव्हे पूर्ण, दुर्भर, । त्याचा आश्रय करूनी, ते दुष्ट नर । पूर्वोक्त हिंसा प्रवर्तविती. ॥ २४२ ॥ जे पदार्थ असत्, । आग्रह त्यांच्या ठायींच अत्यंत, । मोहेंकरूनी अशुचिव्रत । ते आग्रह धरूनी प्रवर्तती. ॥ २४३ ॥ जो अपेक्षित असत्पदार्थ, । धनभूमि इत्यादि, तदर्थ । तोची मानोनी पुरुषार्थ । सखा बापही मारिती. ॥ २४४ ॥ अत एव अशुचि अमंगळ, । तेंच व्रत म्हणिजे नियम ओंगळ, । दंभ, मान, मद, कश्मल, । युक्त या दुर्गुणेंकरूनी. ॥ २४५ ॥ सर्वथा जे अप्रामाणिक, । ते म्हणविती प्रामाणिक; । जैसा ध्याननिष्ठ बक । क्षुद्र सोडी, गिळी मासा थोर. ॥ २४६ ॥ थोडियानें होती उदार, । परधनें बुडविती अपार, । करावया सर्वस्व अपहार, । निस्पृहत्व स्वल्प दाविती. ॥ २४७ ॥ सर्वदा मनीं मान,[1] । अपेक्षिती सन्मान, । कोठें होतां कांहीं अपमान, । प्रवर्तती परघातीं. ॥ २४८ ॥ मद अत्यंत मनीं । ऐसा म्हणोनी, । युक्त इत्यादि दुर्गुणें-करूनी, । तथापि दुःखी, म्हणतसे या श्लोकीं. ॥ २४९ ॥

---

१. गर्व, ताठा.

चिंतामपरिमेयां च प्रलयांतामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥

ज्या चिंतेस नाहीं गणना, । ऐसी चिंता मनीं त्यांच्या, अर्जुना ! । कीं प्रत्यक्षावांचुनी त्यां दुर्जनां । कांहींच नसे. ॥ २५० ॥ जों असे देह जिवंत, । तोंच सुख भोगावें अत्यंत, । म्हणूनी आपला अभावपर्यंत । चिंता तयां. ॥ २५१ ॥ या भावें म्हणे भगवंत, । कीं चिंता जे प्रलयपर्यंत, । त्या चिंतेचे ते आश्रित, । सुख कैंचें तयांतें? ॥ २५२ ॥ प्रकर्षें जो लय, । तो म्हणावा प्रलय, । कीं देह नाशतां त्यांचा निर्णय । चैतन्य नाशतें म्हणोनी. ॥२५३॥ नाश होतां देहाचा, । नाश होणार चैतन्याचा, । पुढें आपणची नाहीं, मग कैंचा । विषयभोग ? ॥ २५४ ॥ ऐसी प्रलयपर्यंत । ते चिंता म्हणावी प्रलयांत, । त्या चिंतेचे आश्रित । आपण नाहींसेच होऊं कीं, हे तळमळ ये रीतीं. ॥ २५५ ॥ तरी जों असों जीवंत, । भोग भोगूं तोंपर्यंत, । हेंची फळ जीवित्वाचें निश्चित, । ऐसे कामोपभोगपरम ते. ॥ २५६ ॥ ज्यांस वेद मान्य, । ते जरी सामान्य, । तरी त्यांच्या ठायीं प्राधान्य । नसे ऐसें चिंतेचें ॥ २५७ ॥ कीं देह नाशला जरी, । आपणास नाश नाहीं तरी, । विषय तरी जन्मांतरीं । श्वानसूकरयोनींतही सर्वत्र. ॥ २५८ ॥ जे कांहीं विवेकी जन, । ते तों दान, धर्म, भजन, । करूनी स्वर्गादिसाधन, । देह पडिला तरी सुख आहे मतें तयांच्या. ॥ २५९ ॥ ज्यास अप्रामाण्य वेदीं, । ते चार्वाक प्रत्यक्षवादी, । त्यांची चिंता ऐसी उपपादी । श्रीकृष्ण. ॥ २६० ॥ आणिक त्याचें अवलक्षण, । कीं ते पापकर्मीं विचक्षण, । पापाचरणाचें लक्षण । कमलेक्षण बोलतो या श्लोकीं. ॥ २६१ ॥

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।
ईहंते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥

आशा नाना मनीं असती, । त्या देशदेशांतरा हिंडविती, । करूं नये तें करविती, । मर्कटपति जैसें मर्कटांतें. ॥ २६२ ॥ कंठीं असे पाश ज्याचा, । तो कां आज्ञाधारक नव्हे त्याचा ? । नाचे काया, नाचे वाचा, । तो जैसा नाचवी तैसीच. ॥ २६३ ॥ ते आशापाश शत शत, । शतशब्दें अपरिमित, । त्या पाशीं बद्ध अत्यंत । आश्रित कामाचे, क्रोधाचे. ॥ २६४ ॥ आशा जैशी, काम तैसा, । क्रोध उपजे कामासरिसा, । जो आशापाशें बद्ध ऐसा, ।

१. आपलें अस्तित्व नष्ट होईपर्यंत. २. हुशार.

कामक्रोधाचाच[1] त्यातें आश्रय. ॥ २६५ ॥ त्या कामभोगार्थ । अन्यायें नाना अनर्थ । करूनी मेळविती अर्थ; । धनार्थ माता, पिता, भ्राताही, मारिती. ॥ २६६ ॥ ऐसें आशापाशेंकरूनी । बद्ध अन्यायें प्रवर्तती धनार्जनीं, । आतां त्यांचे मनोरथ ऐसे म्हणोनी । तीं श्लोकीं बोलतसे. ॥ २६७ ॥

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥

हें आजी प्राप्त जालें मातें, । आणि पावतची आहें अमुकिया मनोरथातें, । हें इतकें आहे आयतें, । आणीकही धन मज मिळेल. ॥ २६८ ॥

असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥

म्यां हा एक मारिला वैरी, । आणिकासही मारीन या उपरी, । 'मी ईश्वर' 'समर्थ' ऐसी वैखरी । बोलती सामर्थ्याच्या अतिशयें. ॥ २६९ ॥ मीच ईश्वर, समर्थ अत्यंत, । मी भोगी, सिद्ध बलवंत, । मीच सुखी, ऐसे गर्वित । असुर दुष्ट बोलती. ॥ २७० ॥ येथें ईश्वर मी म्हणोनी । त्यांच्या गर्वयुक्त वचनीं । अद्वैतवादी दूषिले या शब्देंकरूनी, । ऐसें भेदवादी बोलती येथें. ॥ २७१ ॥ तरी सकळां उपनिषदांचें सार । ते गीता बोलतो गीताकार, । सर्वत्र उपासनाप्रकार । या गीतेंत ऐक्येंचीकरूनी. ॥ २७२ ॥ "ममैवांशो जीव" म्हणोनी । पंचदशीं बोले स्वमुखेंकरूनी, । तो ईश्वरैक्योपासना या वचनीं । असुरांकडे लावील, हे न घडे. ॥ २७३ ॥ आतां "ममैवांशो जीव" । पंचदशीं बोले देव, । तेथें भेदवादी काढिती भाव । भिन्नांश म्हणोनी. ॥२७४॥ त्यास कल्पित वचन । एक दाविती नवीन, । कीं मत्स्यादि अवतार अभिन्न । जीवभिन्नांश म्हणोनी.॥२७५॥कल्पूनी कल्पित वाणी,। हें म्हणती आहे पुराणीं, । दाटूनी कल्पित काहाणी । बोलती वेदास, गीतेस, युक्तीसही, विरुद्ध. ॥२७६॥ वेदीं जीवेश्वरऐक्यत्व, । तेंची गीतेमध्यें तत्त्व, । आणि अंश म्हणतां भिन्नत्व । बोलणें विरुद्ध युक्तीतें. ॥ २७७ ॥ अंश गोधूमाचा रोळा । होऊं शके, तरी ईश्वरांश मानावा निराळा, । अंश हंसाचा कावळा, । तरी अंशपणीं साधेल[2] भिन्नत्व. ॥ २७८ ॥ नराचा अंश खर, सिंहाचा अंश वानर, । जळाचा अंश वैश्वानर, । हें घडे, तरी तेंही घडे. ॥ २७९ ॥ अंश आणि भिन्नपण, । हें आपलें मूर्खत्व आपण, । दाविती; कीं अंश म्हणतां सर्वज्ञ सगुण । अभंग

---

१. अ० १५, श्लो० ७. २. गव्हाहून भिन्न असें एक धान्य.

खूण ऐक्याची बोलिला. ॥ २८० ॥ आतां वचन कल्पित, परी । गोष्टी घालिती पुराणावरी, । तथापि त्यांची वैखरी । तत्त्वच बोलते, वंचूनी त्यांला. ॥ २८१ ॥ कीं मत्स्यादि बिंबांश, । जीव तितके प्रतिबिंबांश, । अविद्या उपाधियोगें भ्रंश । बिंबैक्य अनुभवाचा. ॥ २८२ ॥ मत्स्यादि अवतार अभिन्न, । नसे त्यांत प्रतिबिंबांश भिन्न, । नाना अवताररूपीं अपरिच्छिन्न । ब्रह्म स्वयें. ॥ २८३ ॥ अंश आकाशाचा घटाकाश, । तैसे मत्स्यादि हे अभिन्नांश, । आणि प्रतिबिंबला अवकाश । तो भिन्नांश गगनांचा. ॥ २८४ ॥ दोहीं गगनांस गगनीं । एकत्व घडे, म्हणोनी । अंशत्व दोहींस दावुनी, । त्यांत अभिन्नत्व, भिन्नत्व, बोलिलें. ॥ २८५ ॥ कीं घटाकाश, महाकाश; । दोहींमध्यें अभिन्न महदाकाश, । आणि जळीं प्रतिबिंबला भिन्नांश, । कीं तो हालतो जळ हालतां. ॥ २८६ ॥ जळ पसरलें जितुकें, । गगन प्रतिबिंबलें तितुकें, । पुढें नसे यालागीं तुटकें । भिन्नपणें याची प्रतीती. ॥ २८७ ॥ जरी बोले ऐसें पुराण, । तथापि त्यांच्या मुखीं तें अप्रमाण, । कीं ते कल्पित श्रुति करिती निर्माण, । त्या वेदपाठकांस पुसतांच उडती. ॥ २८८ ॥ पुराणें पाठ नसती, । त्यांत वेदांस, गीतेस, जीं न मिळती, । तीं अप्रमाणें वाटती, । कीं काडीचोर तो पाडीचोर. ॥२८९॥ गीता पाठ सर्वत्र, । तैशाच वेदांच्या शाखामात्र, । यांत त्यांची वाणी अपवित्र । रिघों शकेना. ॥ २९० ॥ पुराणें पुस्तकींच असती, । त्यांत त्यांच्या कल्पना नाचती, । नवे श्लोक निर्मूनी घालिती, । काढिती श्लोक व्यासाचे. ॥ २९१ ॥ तथापि मत्स्यादि अभिन्नांश, । आणि जीव भिन्नांश, । या अंशशब्दें ऐक्यप्रकाश । न झांकतां, भिन्नत्व ऐसें साधतें. ॥ २९२ ॥ हें पुराणवचनची असो, । अंशत्वें भिन्नत्वही दिसो, । हें भिन्नत्व अनुभवियांसही सोसो, । कीं भिन्नत्व तरी भोक्तृत्व. ॥ २९३ ॥ भिन्नत्व म्हणोनी भोक्तृत्व, । आणि अंशत्वें एकत्व, । हें वेदसंमत जीवतत्त्व, । विरुद्ध नव्हे युक्तीसही. ॥ २९४ ॥ प्रस्तुतीं "ईश्वरोहं" या वचनीं । असुरांत लेखिले वेदांती, म्हणोनी । ते बोलती, यावरूनी । आणिती अप्रामाण्य गीतेस. ॥ २९५ ॥ बैंघोनी वृक्षावरी । मूळ छेदिती, परी । वृक्ष पडतां आपण पडों, यापरी । त्यांला कळेना. ॥ २९६ ॥ गीताच 'जीवेश्वर । एक' म्हणोनी बोले, तदनुसार । जे भजती, त्यांस जरी म्हणे 'असुर, । तरी ते गीतेस प्रामाण्य मग कैंचें ! ॥' २९७ ॥ प्रामाण्य गीतेचें मोडुनी । गीतेचाच आश्रय धरूनी । ऐक्योपासकांस 'असुर' म्हणोनी । म्हणती, तेच उन्मत्त

असुर. ॥ २९८ ॥ भेदोपासना वेदीं । निषेधिली प्रतिपदीं, । प्रस्तुत छांदोग्योपनिषदीं । हे श्रुती. ॥ २९९ ॥

**अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्यो-**
**ऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशुः ॥**

श्रुति म्हणे, जो उपासितो देवता अन्य, । कीं देव अन्य, मी अन्य, । ऐसा भेद मानोनी, अन्योन्य । उपासितो, तो नेणता पशु जैसा. ॥ ३०० ॥ दोष अत्यंत ऐसा भेद, । उपासनामार्गी निषेधिती वेद; । कोठें तरी निषेधिला ऐसा अभेद । ते धुंडिती, परंतु सांपडेना. ॥ ३०१ ॥ ऐसें वेदविरुद्ध ज्यांचें मत, । ते यां असुरसंपदेचे आश्रित । होऊनी, म्हणती 'अद्वैत । जीवेश्वरांचें असुर बोलती,' म्हणोनी. ॥ ३०२ ॥ मी ईश्वर, मी भोगी, मी सिद्ध, । मी बलवंत, मी सुखी, ऐसें लोकप्रसिद्ध । असुर वर्णितां, जे अप्रसिद्ध । भेदवादी असुर ते, ऐसें वाखाणिती. ॥ ३०३ ॥ हा म्यां मारिला शत्रु एक, । मारीन आणखी जे अनेक; । मी ईश्वर, समर्थ, भोगी, हें अहंकाराचें कौतुक, । यांत अद्वैत उपासक आणिती. ॥ ३०४ ॥ द्वेषें अंगुलिभंग । क्रिया करिती, तैसा हा प्रसंग. । असो, आतां आणीक श्रीरंग । साभिमान असुरोक्तीच बोलतो या श्लोकीं. ॥ ३०५ ॥

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।**

मी आढ्य धनवंत, । आणि मी कुलवंत, । मीच थोर अत्यंत, । मजसारिखा कोण असे ? ॥ ३०६ ॥ ऐसिया पूर्वार्धपर्यंत । जे अवैदिक, चार्वाक, असुर, अत्यंत, । ते वर्णूनी; आतां उत्तरार्धापासूनी भगवंत । वेदाश्रित असुर वर्णितो. ॥ ३०७ ॥ वेदोक्तकर्में करिती, । यज्ञादि क्रिया आचरती, । ज्ञानभक्तिमार्ग दूषिती, । द्वेष करिती ज्ञानिया भक्तांचा. ॥ ३०८ ॥ त्यांत ज्ञानियांचा द्रोह घडे, । नरकींच तो असुर पडे, । ज्ञानियांच्या द्रोहें तो अंधतमीं बुडे, । त्याचा उद्धार न कदापि. ॥ ३०९ ॥ प्रस्तुत जे साधारण, । कर्मठ, असुर दारुण, । ते वर्णितो श्रीनारायण । या उत्तरार्धापासुनी. ॥ ३१० ॥

**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥**

मी करीन यजन, । मी देईन धन, । मी संतोषी करीन जन, । ऐसे अज्ञानें मोहिले. ॥ ३११ ॥ उत्तरश्लोकीं नरक । या असुरां वदे नरकांतक, । परी श्रोते येथें साशंक । होतील कांहीं. ॥ ३१२ ॥ कीं यजीन, देईन, जना ।

---

१ बोटें मोडणें.

सुखी करीन, हे तोंवरी वासना; । ऐसियासि कां नरकयातना । देव बोलतो ? ॥ ३१३ ॥ तरी श्रद्धा धरोनी वेदीं, जरी । ऐसी वासना धरिती बरी, । ते पडतील कां नरकीं ? हें खरें, परी । हे दांभिक म्हणोनी पुढें विशद होणार. ॥ ३१४ ॥ प्रस्तुत दंभाचा हेतु विवरूनी, । धन मेळवावें म्हणुनी, । नरकांत पडती, ऐसें स्वमुखेंकरूनी । या श्लोकीं भगवंत बोलतो. ॥ ३१५ ॥

**अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ॥**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥**

अनेक विषयांच्या ठायीं चित्त । ज्या याज्ञिकाचें भ्रांत, । मोहाच्या जाळियांत आवृत, । जाळियामध्यें मत्स्य जैसा. ॥ ३१६ ॥ कामभोगीं आसक्त । अत्यंत, ते म्हणावे प्रसक्त, । ते यजूनीही वेदोक्त, । अमगळ नरकींच पडती. ॥ ३१७ ॥ तरी ते कैसे ? आणि नरकीं । कां पडती कृतांतलोकीं? । तरी तेंही बोलतो या श्लोकीं । उत्तमश्लोक. ॥ ३१८ ॥

**आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ॥**
**यजंते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥**

ते आत्मसंभावित, । स्तब्ध, आणि मानमदें अन्वित, । ते ऐसे म्हणे भगवंत, । आतां याचा अर्थ ऐसा. ॥ ३१९ ॥ आपणची आपणातें संभाविती, । म्हणजे आपणची आपणातें पूजिती, । कीं आपणास आपण दाविती । पूज्य करूनी श्रेष्ठत्वें. ॥ ३२० ॥ सारासारवेत्ते । पूज्य मानिती ऐसे नव्हती ते, । त्यांच्या दंभेंचीकरूनी दिसते । श्रेष्ठता त्यांची जनातें. ॥ ३२१ ॥ ऐसा दंभ करिती, । श्रेष्ठत्व नाहींच तें दाविती, । या नांवें आपण आपणांस संभाविती, । ते **आत्मसंभावित** म्हणावे. ॥ ३२२ ॥ अथवा आत्मा शरीर, । त्यास सदन, वस्त्र, अलंकार, । शयनें, आसनें, नाना प्रकार । इत्यादि रीती पूजिती. ॥ ३२३ ॥ त्याच शरीरानिमित्त । स्त्रीपुत्रादिकांकारणें वेंचिती वित्त, । अतिथिहव्यकव्यार्थ वेंचितां, वित्त । होय कष्टी. ॥ ३२४ ॥ अतएव **स्तब्ध** अत्यंत, । खुंट खैराचा लवेना निश्चित, । तैसे नम्र कधीं नव्हती गर्वित । युक्तधनेंमानमदेंकरूनी. ॥ ३२५ ॥ स्तब्ध ऐसे धनेंकरूनी, । मान पावती धनवंत म्हणोनी, । त्या मानें मदारूढ होउनी । उन्मत्तपणें स्तब्ध ते. ॥ ३२६ ॥ ते धन मिळायाची रीती । उत्तरार्धें बोले श्रीपती, । कीं **नामयज्ञें** यजिती । दंभें अविधिपूर्वक. ॥ ३२७ ॥ नाम मात्र यज्ञाचें करिती, । विधि टाकूनी भलतसे यजिती, । यज्ञ केले म्हणूनी दाविती । दंभमात्र. ॥ ३२८ ॥ जे

नव्हती विधिपूर्वक, । यज्ञ ते म्हणावे अविधिपूर्वक, । यालागीं त्यांस नरक । पूर्वश्लोकीं बोलिले. ॥ ३२९ ॥ ऐसें ज्यांचें आचरण । नरकपाताचेंची कारण,। हे असुरजन साधारण, । दारुण यापरीस ते वेगळे. ॥ ३३० ॥ त्यांस आत्मनिष्ठांचा द्वेष अत्यंत, । त्यांच्या दुर्गतीस नाहीं अंत, । त्या असुरजनांस भगवंत । वर्णितो या श्लोकीं. ॥ ३३१ ॥

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।**
**मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥**

अहंकाराचा, बळाचा, । गर्वाचा, आणि कामाचा, । आणि क्रोधरूपा तमाचा,[१] आश्रय जयां; ॥ ३३२ ॥ जे असुर ये रीती, । ते माझा द्वेष करिती, । कीं ज्या देहीं आत्मा मी जगत्पती, । त्या देहाचा करिती द्वेष ॥ ३३३ ॥ आत्माच पर म्हणिजे परम । ज्या देहीं, ते आत्मपर देह उत्तम, । त्या देहांचे ठायीं ते अधम । असुरजन द्वेष करिती. ॥ ३३४ ॥ ज्या देहीं आत्मा उमजला, । आत्मपर देह बोलावें त्या देहाला, । ज्यांस त्यांचा महिमा कळला, । ते त्या देहांस लेखिती अवतार. ॥ ३३५ ॥ त्या देहांस सेविती, । धन्य धन्य ते देह म्हणती, । त्या देहांस भजतां, भजती । मज सर्वात्मक ईश्वरातें. ॥ ३३६ ॥ कीं आत्मा प्रगटला ज्या देहीं, । त्या देहीं जीवपण नाहीं, । जो मी आत्मा सर्व कांहीं, । तो मी परत्वें प्रगटतों त्यांमध्यें. ॥ ३३७ ॥ ऐसा मी आत्मपर । ज्या बुद्धीस कळलों सर्वेश्वर, । ते त्या शरीरीं, म्हणोनी तें शरीर । आत्मपर म्हणावें, अर्जुना! ॥ ३३८ ॥ ऐसा आत्मपर देह, । जेथें देहपरत्वाचा गेला स्नेह, । कळलें कीं निःसंदेह । देह नाहीं आत्माच असे. ॥ ३३९ ॥ तो सर्वगत आत्मपर, । तरंगांत पर जैसा सागर, । कीं पर अलंकारीं निर्विकार । सुवर्ण जैसें. ॥ ३४० ॥ तंतु पर सर्वां पटीं, । परमृत्तिका सर्वां घटीं; । एवं परत्वें कारणची उरतें शेवटीं, । दिसोनीही कार्य न असे. ॥ ३४१ ॥ तेव्हां देहासही कैंचा ठाव? । परंतु मोठा प्रारब्धाचा प्रभाव, । तें सरे तो देहभाव । जनदृष्टि दिसतसे. ॥ ३४२ ॥ म्हणूनी जे असुर जन, । देहासारिखा देह देखती त्यांचे नयन, । यालागीं त्या देहाच्या ठायीं ते दुर्जन । द्वेष करिती, दोष आरोपिती. ॥ ३४३ ॥ ते दंभार्थ दांभिक, । यज्ञ करूनी म्हणविती 'याज्ञिक,' । ज्ञानमार्गाचे दूषक, । द्वेष करिती, दोष आरोपिती. ॥ ३४४ ॥ जीं आत्मपर शरीरें, । तीं ज्ञानमार्गची उपपादिती सर्वप्रकारें, । तीं खवळती जैसा दंडप्रहारें । कृष्णसर्प. ॥ ३४५ ॥ म्हणूनी करिती द्वेष अत्यंत, । करू

१ काळा.

पाहतां घातपात, । ते देह मानिती, ते भ्रांत । इतर देहांसारिखे. ॥ ३४६ ॥ परंतु त्या देहीं जो आत्मपर, । तो मी सर्वगत सर्वेश्वर, । त्या देहांच्या ठायीं ते पामर । द्वेष करितां, द्वेष माझा घडतसे. ॥ ३४७ ॥ कीं चराचर कार्य, कारण पर । तो मी उपादान सर्वेश्वर, । एवंच ज्ञान आणि भक्तितत्पर । ते देह म्हणूनी भगवंत सुचवी. ॥ ३४८ ॥ कीं आत्मा पर ज्या ज्या शरीरीं, । त्या देहीं बुद्धि आत्मा देखे चराचरीं, । तें चराचर मी सगुण, यापरी । अनुभवें भजे बुद्धि ते. ॥ ३४९ ॥ ते बुद्धि आणि तें शरीर । स्वयें मीच सर्वेश्वर, । म्हणूनी ते दुर्जन असुर । द्वेष माझा करिती, देव म्हणे. ॥ ३५० ॥ यालागीं आत्मपर देह, । आणि त्या देहीं सगुणत्वाचा स्नेह, । त्याचीच गोष्टि हे निःसंदेह । उत्तरश्लोकाहीवरूनी. ॥ ३५१ ॥ जे ऐशा शरीराचा द्वेष करिती, । त्यांस आसुरी योनींचमध्यें मी जगत्पती । प्रतिजन्म घालूनी, अंतीं । ते मज कधीं न पावती, ऐसें मी करितों. ॥ ३५२ ॥ ऐसें बोलेल भगवंत, । तरी हें सगुण द्वेषाचेंच फळ अत्यंत, । निर्गुणपणीं हाची अनंत । निर्धर्म, तेथें द्वेषची लागेना. ॥ ३५३ ॥ द्वादशीं निर्गुणोपासकांची वार्ता, । तेथें न म्हणे मी त्यांचा उद्धर्ता, । 'भक्तांचा मी उद्धारकर्ता' । म्हणे कल्पवृक्षस्वभावें. ॥ ३५४ ॥ "**ये यथा मां प्रपद्यंते**" या श्लोकेंकरूनी । "**तांस्तथैव भजाम्यहं**" म्हणोनी । चतुर्थी देव बोलिला, यावरूनी । सगुण फळ नेदी निर्गुणोपासकां. ॥ ३५५ ॥ भजन जाणे, परी । फळ सगुणत्वें नेदी हरी, । निर्गुणत्वीं तरी । प्रत्ययची नसे. ॥ ३५६ ॥ जों जों जावें समीप, । तों तों प्रकाशे दीप, । जों जों ध्यावें तों तों निर्गुणस्वरूप । प्रत्यया येतें उपासकां. ॥ ३५७ ॥ ऐशा क्लेशाच्या कोटी । करितां, मोक्ष शेवटीं; । परंतु उपासक उद्धरावे ऐसा पोटीं । प्रत्यय नसे निर्गुणाच्या. ॥ ३५८ ॥ आणि भजतां निर्गुण, । फळ नेदी सगुण, । हा अनादि सहज गुण । सगुणत्वीं. ॥ ३५९॥ जैसें निर्गुणास न कळे भजन, । तैसा द्वेषही न कळे, जो करिती दुर्जन. । भजनफळ नेदी भवभंजन, । तैसें नेदी फळही निर्गुणद्वेषाचें. ॥ ३६० ॥ सगुण फळ नेदी, परी । निर्गुणद्वेषें पाप मानावें जरी, । तरी गगनाचा छेद शस्त्रधारी । करील कोण? ॥ ३६१ ॥ भजन नव्हे सफळ, । पाप नव्हे द्वेषमूळ, । ऐसें निर्धर्म केवळ । निर्गुणपणीं. ॥ ३६२ ॥ एवंच जरी हे असते निर्गुणोपासक, । तरी 'द्वेषफळ मी देतों' न म्हणतां श्रीवत्सांक; । ज्ञानी आणि

---

१. अ० ४, श्लो० ११.

सगुणसेवक । द्वेष त्यांचाच देव सोसीना. ॥ ३६३ ॥ आणि 'द्वेष माझा करिती,' । ऐसें बोले सगुण श्रीपती, । गोष्टी सगुणाकडे न लागती, । तरी निर्गुणोपासक हे म्हणवते. ॥ ३६४ ॥ एवंच आत्मपर देहाचा द्वेष । करिती त्यांस ईश्वरद्वेषाचा दोष, । त्यांस म्हणतो परमपुरुष । कीं 'मीच दारुण' दुर्गति देतसें. ॥ ३६५ ॥ एवंच ज्ञानी भक्त, । त्यांच्या द्वेषें जे युक्त, । त्या असुरास मी नित्यमुक्त । लभ्य नव्हे कदापि. ॥ ३६६ ॥ इत्यादि त्यांस आपण, । योनि दुर्गति दारुण । देतों, म्हणूनी कल्याणगुण । यापुढेंची विस्तारें बोलेल. ॥ ३६७ ॥ संक्षेपें ये रीती । या श्लोकें श्रीपती । भक्तद्रोहकर्ते असुर म्हणोनी पार्थाप्रती १ बोलिला. ॥ ३६८ ॥ एकादशस्कंधीं भागवतीं । विशद याहूनी शुक परीक्षितिप्रती । बोलिला, तैसें म्हणतो जगत्पती । कीं 'कर्मठ द्वेष करिती भक्तांचा.' ॥ ३६९ ॥

श्रीभागवतश्लोकः—

**श्रिया विभूत्याभिजनेन विद्यया त्यागेन रूपेण बलेन कर्मणा ।**
**जातस्मयेनांधधियः सहेश्वरान् सतोऽवमन्यंति हरिप्रियान् खलाः १**

श्री वैभव इत्यादि गर्वमूळ, । त्या गर्वेंकरूनी कर्मठ खळ । द्वेष करिती प्रबळ, । हरिभक्तांतें अवमानिती. ॥ ३७० ॥ हरिप्रिय ईश्वरभक्त । जे ईश्वराचे ठायीं अनुरक्त, । म्हणोनी कर्मठ खळ द्वेषयुक्त । ईश्वरासहित भक्तांचे ठायीं, अर्थ ऐसा. ॥ ३७१ ॥ याच भावें ये रीती । गीतेंत म्हणे श्रीपती, । कीं द्वेष माझा करिती । आणि आरोपिती दोषातें. ॥ ३७२ ॥ अतएव या श्लोकीं अंतीं । 'अभ्यसूयकाः' म्हणोनी श्रीपती, । त्यांतें म्हणे ये रीती । अर्थ 'अभ्यसूयकाः' या पदाचा. ॥ ३७३ ॥ दोष लावणें नसोनी, । ते म्हणावी असूया म्हणोनी; । 'अभ्यसूयकाः' या पदेंकरूनी, । जे असूया करणार, ते म्हणावे. ॥ ३७४ ॥ ज्ञानियांची असूया करिती, । ते प्रसिद्ध; त्यांची असूया ये रीती, । 'हा ब्रह्म कैसा हो?' म्हणती, । 'जो खातो, आणि हागतो.' ॥ ३७५ ॥ इत्यादि ज्ञानियांची असूया । करितां, वाटे सुख तया, । त्या अमंगळा गोष्टी बोलोनी वांया । ग्रंथ वाढवावा किमर्थ? ॥ ३७६ ॥ या श्लोकाचा अर्थ ये रीती, । परी कोणी प्रकारांतरें बोलती, । 'आत्मपरदेहेषु' या पदें वाखाणिती । तो ऐसा अर्थ त्यांचा. ॥ ३७७ ॥ कीं आत्मदेह, परदेह, । दोहीं ठायीं मीच आत्मा निःसंदेह. । दोहीं ठायीं ते दुराग्रह, । द्वेष माझा करिती. ॥ ३७८ ॥ कीं दंभें पशुहिंसा करिती, । आपण कष्टती, पशु

मारिती, । दोहीं देहीं ये रीती । करिती द्वेष माझा. ॥ ३७९ ॥ व्याकरणरीती कांहीं । हाही विरुद्धार्थ नाहीं, । परी याचें फळ पाहतांही । जरी नव्हे विरुद्ध. ॥ ३८० ॥ 'सर्वदा आसुरीच योनी । त्यांस मी देतोंच' म्हणोनी । भगवंत म्हणतो, कीं आसुरी योनीवांचुनी । इतर योनीच त्यांस न घडे. ॥ ३८१ ॥ आणि 'कदापिही ते मातें । न पावतील' म्हणे त्यांतें, । आणि शेवटीं 'अंधतमातें । ते' म्हणेल, 'पावती.' ॥ ३८२ ॥ तरी अपराधानुरूप दंड; । येथें पाप थोडें, दंड उदंड; । असुरयोनीच अखंड । आणि भगवत्प्राप्ति न घडे कदापि. ॥ ३८३ ॥ दंभें पशु मारिला, । तरी एवढा दंड कांहो बोला ?। 'भगवत्प्राप्ति ज्यांला । नव्हे' म्हणे, 'कदापिही.' ॥ ३८४ ॥ मातापितागुरुवध । ऐसीं संचितेंही जळती होतां बोध, । याचवरी कांहो एवढा क्रोध ? । दंभें अविधि पशुमात्र मारितां. ॥ ३८५ ॥ जैसे पंचमहापातकी, । ऐसे तों हे नव्हती कीं, । त्यांसही जन्मीं कोणे एकीं । भगवत्प्राप्ति होतसे. ॥ ३८६ ॥ प्रायश्चित्तें नासे पातक, । अथवा सरे भोगितां नरक, । पुन्हा पुण्य करूनी कितीएक । भगवत्प्राप्ति पावले. ॥ ३८७ ॥ दंभें पशु मारिती, । तेच भगवत्प्राप्तीतें न पावती, । हें बोलणें न मानिती । सारासार निवडणार. ॥ ३८८ ॥ जो वाळकाचा[1] चोर, । त्यास त्याता बुकियांचाच मार, । या पापास कोण शास्त्रकार । बोलेल दंड एवढा ? ॥ ३८९ ॥ ज्या देहीं आत्मपर । कळला चिदात्मा परात्पर, । जे देह भगवद्भक्तीस तत्पर, । द्वेषें त्यांच्या इतकेंही घडों शके. ॥ ३९० ॥ आणि आत्मपर देहांचा **प्रद्वेष** । म्हणजे प्रकर्षें द्वेष, । आणि अभ्यसूया म्हणजे दोष । आरोपणें जो नाहीं तो. ॥ ३९१ ॥ यांत प्रद्वेष शब्दें इत्यारूप हिंसा । न घडे, तथापि जैसा तैसा । कुंथोनी लाविला अर्थ; परी कैसा । लागेल **'अभ्यसूयकाः'**[2] पदाचा अर्थ ? ॥ ३९२ ॥ मागुती जे सन्मार्गीं प्रवर्तती, । त्यावरी ते दोष आरोपिती, । म्हणूनी अर्थ ऐसा करिती, । तरी आत्मपर देहची ते देहही. ॥ ३९३ ॥ आत्माच पर ज्या देहीं, । कोण सन्मार्गवर्ती त्यांहूनीही, । ऐसियांच्या असूयाप्रद्वेषाविनाही । दंड एवढा दारुण न बोलवे. ॥ ३९४ ॥ व्याकरणसिद्ध अर्थ । आणि अबाधित यथार्थ । तो सोडूनी, कां व्यर्थ । इतर अर्थ बोलावा ? ॥ ३९५ ॥ एवंच ज्ञानी आणि भक्त, । यांच्या द्वेषें आणि असूयेनें जे युक्त, । ते असुर म्हणोनी भगवदुक्त, । अर्थ ऐसा या श्लोकीं. ॥ ३९६ ॥ आतां त्या भक्तद्वेषियांस ।

---

१. वाळूक=एक प्रकारचें चिबुडासारखें फळ. २. 'अभ्यसूयकाः' असा पाठ आढळतो.

आपण ऐसें करितों, म्हणोनी श्रीनिवास । अधर चावूनी क्रोधें अर्जुनास । सांगतसे या श्लोकीं. ॥ ३९७ ॥

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥**

अर्जुना ! माझ्या भक्तांचा द्वेष । जे करिती क्रूर अधम पुरुष, । त्यांतें मी परम पुरुष । आसुरी योनीचमध्यें घालितों. ॥ ३९८ ॥ दैत्य, दानव राक्षस, । भूत, प्रेत, पिशाच, या देहांस । आसुरी योनि म्हणावें; मी तयांस । त्या योनींतची घालितसें, हरि म्हणे. ॥ ३९९ ॥ अगा! कर्मानुरूप असुर-योनी, । यांवेगळे जे इतर, ते पावोनी । पुन्हा सत्संगेंकरूनी । सद्गति पावती माझिया प्रसादें. ॥ ४०० ॥ परंतु जे भक्तद्रोही, । अर्जुना! त्यांचा कदापिही । उद्धार होणारची नाहीं, । ऐसें म्हणतसे या श्लोकीं. ॥ ४०१ ॥

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।**
**मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् ॥ २० ॥**

नाना असुरयोनी पावले, । जन्मोजन्मीं असुरची जाले, । ते मज न पावतांच गेले । तदनंतर अधमा गतीतें. ॥ ४०२ ॥ प्रतिजन्म आसुरी योनी, । म्हणजे आसुरी योनीवांचूनी । इतर देह नाहीं म्हणोनी । दावी अर्थ. ॥४०३॥ तरी त्या योनि कोठवरी? । अर्जुना! ऐसें पुसती जरी, । तरी सांगतों, म्हणोनी म्हणतो हरी, । अधम गतीतें पावती तदनंतर. ॥ ४०४ ॥ उदंड दुर्गति असती, । त्या सर्वांत अधम गती, । म्हणजे त्या दुर्गतीपासूनी कोणी न फिरती, । पावती तया अंधतमातें. ॥ ४०५ ॥ कल्पक्षयपर्यंत । यातना भोगूनी ज्या अंधतमांत, । कल्पादि असुरयोनीच ते मूढ अत्यंत । पावोनी, तेची अधमगति पावती. ॥ ४०६ ॥ निश्चयेंसी ते मातें । न पावतांच, अंधतमातें । पावती, लोक अधमागतीतें, । म्हणतां ऐसें सुचवी. ॥ ४०७ ॥ कीं प्रतिजन्म आसुरी योनी । पावोनी अधमगती पावती म्हणोनी, । म्हणतां, योनी पावणें येथूनी । खुंटलें तयांचें. ॥ ४०८ ॥ ऐसा अर्थ सिद्ध जाला, । तरी काय मोक्ष बोलिला ? । कीं जन्म नाहीं ज्यांला, । त्यांला जाला म्हणावा मोक्ष. ॥ ४०९ ॥ तरी "**मामप्राप्यैव**" । म्हणूनी आधींच बोले देव, । कीं मज न पावतांच, ते जीव । त्यानंतर अधमगतीतें पावती. ॥ ४१० ॥ एवंच भगवत्प्राप्ति त्यांला । कदापि नाहीं, ऐसा अर्थ सिद्ध जाला, । "**मामप्राप्यैव**" म्हणूनी योजिला । एव म्हणूनी एवशब्द जेव्हां. ॥ ४११ ॥ भगवत्प्राप्ति

नाहींशीच झाली, । तेव्हांच मोक्षाची वार्ता राहिली, । परंतु शंका उपजली । आणीक एक. ॥ ४१२ ॥ कीं अधमगतीस पावले, परी। ब्रह्मप्रलय जालिया-वरी, । ते गतिही नाशल्या उपरी, । सृष्टिकाळीं जन्म पुन्हा. ॥ ४१३ ॥ तेव्हां त्यांस कोण योनी ? । ऐसी शंका उपजेल म्हणोनी, । "आसुरीष्वेव योनिषु" या वचनीं । पूर्वश्लोकीं निर्वडिलें. ॥ ४१४ ॥ कीं आसुरी योनी-वांचूनी । अन्य योनींत त्यांतें मी न घालीं म्हणोनी, । "आसुरीष्वेव" या एवशब्देंकरूनी । केला ऐसा निर्णय. ॥ ४१५ ॥ कीं जन्मप्राप्तिकाळ । जेव्हां प्राप्त होतो, तेव्हां तत्काळ । कोणी एक असुरयोनी फेटकाळ, । त्या योनींत घालितों त्यांतें, म्हणतो जाणावें. ॥ ४१६ ॥ मग ते आसुरीच योनी । प्रतिजन्म पावोनी, । मातें न पावतांच, अधमनामेंकरूनी । जे गति बोलिलों, पावती तीतें. ॥ ४१७ ॥ ऐसे ब्रह्मप्रलय कोटी कोटी, । आणि कोटीच कोटी सृष्टी । जाल्या, तरी तयांच्या अदृष्टीं । असुरयोनि, अधमगति, पुनःपुन्हा. ॥ ४१८ ॥ प्रगट होय ऐसा भाव, ये रीति बोले देवाधिदेव, । त्याची टीका तेची स्वयमेव । भक्तपक्षपाती करितसे. ॥ ४१९ ॥ ऐसेंची भक्ताचें भजन, । कीं सर्वसमही भवभंजन, । भक्तद्रोह करिती जे जन, । क्रोध त्यांवरी ऐसा करितसे. ॥ ४२० ॥ ऐसे वेदाश्रित । जे यजनयाननिपुण पंडित, । आणि ज्ञानिया भक्तांचा अत्यंत । द्वेष करिती, ते वर्णिले. ॥ ४२१ ॥ जे ऐसे वर्णिले असुरजन, । मनुष्यांतच त्यांचें जनन, । परंतु दुर्गुणांच्या अतिशयें दुर्जन । असुर जाले. ॥ ४२२ ॥ ते दुर्गुण, सुलक्षण, । सांगावे, तरी पुढें आरंभलें रण, । म्हणूनी दुर्गुणाचें बीज सांगतो कमलेक्षण । आतां या श्लोकीं. ॥४२३॥

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥**

अगा ! हें नरकाचें द्वार । त्रिविध म्हणजे त्रिप्रकार, । काम, क्रोध, लोभ, हे तीनी विकार । बीज आसुरी सृष्टीचें. ॥ ४२४ ॥ हें नरकाचें द्वार म्हणोनी, । इदंशब्देंकरूनी । जें जें प्रस्तुतीं बोलिलों, म्हणे, यावरूनी । आ-सुरी संपत्तिच द्वार नरकाचें. ॥ ४२५ ॥ त्यास मूळ सांगे श्रीवल्लभ । काम, क्रोध, लोभ, । त्याचमुळें मद, अभिमान, दंभ, । इत्यादि. ॥ ४२६ ॥ सर्वां अनर्थांस मूळ । हेची तिन्ही, यांपासूनी सकळ । अनर्थमूळें, मेघनीळ । हे

१. निवाडा केला, निर्णय केला, निश्चित केलें. २. बेटीवांकडी, नीच. ३. जन्मोजन्मीं. ४. नशिबीं, दैवीं.

तिन्ही त्यजावे म्हणतसे. ॥ ४२७ ॥ जो हे त्यजी तिन्ही, । तोची मुक्ति पावेल म्हणोनी । असुर सृष्टीचें मूळ छेदूनी, । बोलतसे हा श्लोक. ॥ ४२८ ॥

एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥

अगा ! कुंतीसुता ! । या तिहींपासूनी सुटला जो तत्वता, । आणि आचरे आपल्या स्वहिता, । तो परमगतीतेंची पावे तदनंतर. ॥ ४२९ ॥ जो तमोगुण संसार, । त्याचेंही जें प्रवेशद्वार, । ते हेची त्रिप्रकार, । सुटे यांपासूनी तोची पावे मुक्तीतें. ॥ ४३० ॥ ऐसें नरकाचें द्वार । काम, क्रोध, लोभ, त्रिप्रकार; । बोलतांच संदेहाचा संचार । जाला येथें. ॥ ४३१ ॥ 'ज्योतिष्टोम स्वर्गकाम । यजितां, पावे स्वर्गधाम,' । ऐसें बोलती निगम, । तरी काम कैसें द्वार नरकाचें ? ॥ ४३२ ॥ ऐसें संदेहाचें स्थळ, । तरी तो शास्त्रोक्त काम, त्याचें तें फळ, । अशास्त्रकाम अमंगळ, । ऐसें बोलतसे या श्लोकीं. ॥ ४३३ ॥

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥

अगा ! जो शास्त्रविधि सोडूनी, । वर्ततो कामाच्या बळेंकरूनी, । तो सिद्धि पावेना; यावरूनी । शास्त्रोक्त काम सुचवी कीं निंद्य नव्हे. ॥ ४३४ ॥ जो शास्त्रविधि सोडी, । आणि वर्ते धरूनी कामभोगाची गोडी; । तो स्वर्गसिद्धि न पावे, हे गोष्टी थोडी, । तो या लोकींही सुख पावेना. ॥ ४३५ ॥ ज्यास नाहींत लोक दोनी, । तो मोक्ष पावेना, म्हणोनी । सांगणेंची न लगे; यावरूनी । परी सांगतों कीं मोक्षही तो पावेना. ॥ ४३६ ॥ तरी आतां अर्जुना ! । तूं सर्वथा शास्त्रविना । वर्तों नको, या वचना । बोलतो शेवटीं या श्लोकीं. ॥ ४३७ ॥

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥

शास्त्र सोडितां ऐसा अनर्थ, । अर्जुना ! म्हणोनी तदर्थ । तुज सांगतों मी यथार्थ, । कीं शास्त्रप्रमाण तुजलागीं. ॥ ४३८ ॥ जें करूं ये, तें कार्य, । जें करूं नये, तें अकार्य, । प्राप्त होतां या दोहींचा निर्णय । शास्त्रच प्रमाण तुजलागीं. ॥ ४३९ ॥ त्या कार्याअकार्याचें विधान । शास्त्रीं बोलिलें असे, त्याचें ज्ञान । संपादोनी, पावोनी समाधान, । कर्म कराया होशील योग्य या लोकीं.

॥ ४४० ॥ शास्त्रोक्तरीती सकाम । पावले स्वर्गाख्य धाम, शास्त्रोक्तरीतीच निष्काम । मोक्ष पावती. ॥ ४४१ ॥ शास्त्रोक्तरीती वर्तती । तेची पावती दैवी संपत्ती,, । तेची अधिकारी अर्जुना! होती, । जे पूर्वाध्यायोक्त ज्ञानाचे. ॥ ४४२ ॥ या कारणें शास्त्रविधी । सोडूं नको तूं कधीं, । मग मोक्ष पावाव-यास अवधी । निपट थोडा, हा भाव. ॥ ४४३ ॥ ऐसा अध्याय सोळावा । उपयोगी व्हावा सदैवा, । म्हणोनी संतांचा आत्मविसावा । पांडवातें उपदेशी. ॥ ४४४ ॥ नेणों टाकूं आसुरी संपत्ती, । नेणों धरूं दैवी संपत्ती, । नेणों संपत्ति, नेणों विपत्ती, । पाय जाणों शेषशायी श्रीपतीचे. ॥ ४४५ ॥ ऐसी षोडशाध्यायटीका । नाम जीचें यथार्थदीपिका, । ती समर्पितां चरणीं शेषपर्यंका, । धरिली हृदयीं श्रीकांतें. ॥ ४४६ ॥ हे त्याचीच करणी । समर्पिली त्याच्याच चरणीं, । तो म्हणे, जें माझे अंतःकरणीं, । तेंची वामना! बोलसी तूं. ॥ ४४७ ॥

---

## अध्याय सतरावा.

जयें जय श्रीगोविंद! । जय जयानादि! गोवृंद!। जय जय निःशब्द! शब्द-कंद! । प्रणवाभिधेय! गेयकीर्ते!॥ १ ॥ जयजयाशेष! तद्रूप!। जय जय तत्प्र-काश! सत्स्वरूप! । जय जय नामरूप! रूपारूप! । सर्वरूप! भगवन्! ॥२॥ जय जय परमपुरुष! । जय जय नामामृतहृतनिखिलकर्मकलुष! । जय जय निर्दोषनामपीयूष! । अशेषात्मन्! ॥ ३ ॥ जय जयामंदसांद्रसुख! । जय जय मंदहासमुख! । जय जय विश्वतश्चक्षुर्विश्वतोमुख! । विश्वतोबाहो! ॥ ४ ॥ जय जगदेकसुंदर! । जय जय सगुणसद्गुणसागर!। जय जय मंदरधर! रमामंदिर!। कौस्तुभकंधर! श्रीपते! ॥ ५ ॥ जय जय जगदुदर! । जय जय दामोदर! । जय जय चरणशरणसादर! । पार्थसारथे ! ॥ ६ ॥ जय जय कृष्णामानद! । जय जय कृष्ण ज्ञानद! । जय जय कृष्णात्मप्रद! । अशेषगुरो! ॥ ७ ॥ जय जय निगमगेयाचरण ! । जय जय स्वजनमंगलाचरण! । जय जय विश्ववेद्य-चरण! । भगवत्तम! सर्वोत्तम! पाहि, पाहि. ॥ ८ ॥ जी! जी! तुझें मंगलाच-रण । तूंची तुझेंची सकल आचरण,। स्मरोनी तुझे श्रीचरण, । टीका करीन तेही तूं. ॥ ९ ॥ कांहींच न दिसे तुजविण, । तुवांच ऐसें केलें प्रवीण, । केलें

१. या अध्यायाचें 'दैवासुरसंपद्विभागयोगः' असें नांव आहे. २. या अध्यायांत या पहिल्या ओवीपूर्वी पुढील गद्य नमन आढळतें:—श्रीमते भगवते भगवत्तमाय शास्त्ररूपाय प्रणवातीतस्वरूपाय प्रणवाभिधेयाय तद्रूपाय सत्स्वरूपाय चित्स्वरूपाय स्वस्वरूपाय नमः ।

स्फुरण भेदाचें क्षीण, । अक्षीण अद्वैत बोधोनियां. ॥ १० ॥ या कृपेस न दिसे पार, । तूंची जालासी माझे सकळही व्यापार, । हें बोलतां ग्रंथ अपार । होईल; फार काय बोलों? ॥ ११ ॥ विषयासक्त केला विरक्त, । अभक्त केला निजभक्त, । बद्ध केला जीवन्मुक्त, । किती वर्णूं हे दया? ॥ १२ ॥ खापराचा केला परीस, । थोरपण आतां काय यापरीस? । किंबहुना देवा! हे गोष्टी पैरीस, । तूंची मी, ऐसें केलें तुवां; आण तुझी. ॥ १३ ॥ निजसुखाहूनीही बहु सुख । मज दिधलें, नाशूनी असुख, । सुखची केलें, कीं तुवां मुख । देखिलेंची नाहीं दु:खाचें. ॥ १४ ॥ तूं नित्य निजसुखच्छायावासी, । नित्य असुख उष्ण संताप जीवांसी, । तुझी सुखच्छाया येतां अनुभवासी, । अधिक सुख आमुचें तुजपरीस. ॥ १५ ॥ जो उष्णें श्रमोनी आला, । छायासुख जैसें तयाला, । नित्य छायावासियांला । तैसें नसे. ॥ १६ ॥ आपणापरीस सुख अत्यंत । देणार एक तूंची अनंत, । अनंतकल्याणगुण अनंत । दिगंतर भरलें या यशें. ॥ १७ ॥ हा महिमा असंख्यात । अनंत वेद न शकती करूं ख्यात, । सहस्रमुख जो विख्यात, । तो अंत न पावला वर्णितां अद्यापि. ॥ १८ ॥ कृपामहिमा वर्णूं न शकें, । इतकेंची देवा बोलों शकें, । तुझ्या गुणाच्या उपासकें । म्हणावें शेवटीं इतकेंची. ॥ १९ ॥ आतां **सतराविया अध्याया** । तूंची वाखाणिसी, देवराया! । तूंची श्रोते, तूंची श्रोतयां । पूर्वापर अनुसंधान बोलसी, तें ऐसें. ॥ २० ॥ पूर्वाध्यायाचे शेवटीं । 'तूं शास्त्रानुरूपची वर्ते गा! किरीटी!' । ऐसें बोलतां अर्जुनाच्या पोटीं । जें पुसणें, तें पुसतसे या श्लोकें अर्जुन. ॥ २१ ॥

अर्जुन उवाच—**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयान्विताः ।**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥**

अर्जुन म्हणे, शास्त्रविधी । सोडूनी, जे श्रद्धा निरवधी । धरूनी यजिती अविधी, । निष्ठा त्यांची तों मज कळावी. ॥ २२ ॥ म्हणूनी तूं सर्वोत्तम । जो सर्वज्ञ पुरुषोत्तम, । तो तूं जाणसी कीं ते निष्ठा सत्त्व उत्तम, । कीं रज, कीं तम ? अजी! देवा! ॥ २३ ॥ "**तेषां निष्ठा तु**" म्हणोनी, । या श्लोकीं या तुशब्देंकरूनी, । आणि आपण शास्त्रश्रद्धा धरूनी । पुसतसे. ॥ २४ ॥ परी शास्त्रविधि सोडिती, । आणि श्रद्धेनेंच ते तरी यजिती, । कीं करिती तें उत्तम म्हणूनी मानिती, । आणि सोडिती विधि शास्त्रोक्त. ॥ २५ ॥ हें

१. ऐक. २. शेष.

तों मज कळावें, । तुशब्द योजीं या भावें, । कीं मज तुवां देवाधिदेवें । सांगितलें तें मी समजलों. ॥ २६ ॥ कीं 'अर्जुना! शास्त्रानुसार । वर्ते' म्हणूनी तूं सर्वेश्वर । मज बोलिलासी, तरी यथाधिकार । म्यां शास्त्रोक्त कर्म आचरावें. ॥ २७ ॥ तरी मी अनन्यशरण । जाणें एका तुझेची चरण, । कीं अव्यभिचारिणी भक्तीचें विवरण । म्यां वारंवार ऐकिलें. ॥ २८ ॥ हे सर्व शास्त्रमयी गीता, । येथें कर्मकांडनिर्णय जाला तत्त्वता, । कीं निष्काम एका यज्ञनामका तुज अर्पितां । बंध नव्हे, वरकड सर्व बंधक. ॥ २९ ॥ "**यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र । लोकोयं कर्मबंधनः**" म्हणूनी तूं पद्मनेत्र । बोलिलासि आणि "**यत्करोषि**" इत्यादि सर्वत्र । "**तत्कुरुष्व मदर्पणं**" म्हणूंनी बोलिलासी. ॥ ३० ॥ आणि पूर्वाध्यायाच्या अंतीं । बोलिलासी जी मजप्रती, । कीं कार्याकार्य दोहींची व्यवस्थिती । शास्त्रोक्तरीती तूं जाण. ॥ ३१ ॥ एवं निष्काम शास्त्रोक्त हें कार्य, । सकाम तुज अर्पित हें अकार्य, । दोहींची व्यवस्था तूं सुरवर्य । या गीतेंत वदसी. ॥ ३२ ॥ "**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते**" या श्लोकेंकरूनी । "**कार्याकार्यव्यवस्थितौ**" म्हणोनी । बोलिलास मज तों, यावरूनी । यथाधिकार प्रमाण हें शास्त्र. ॥ ३३ ॥ तरी निष्काम आणि कृष्णार्पण । हें मोक्षसाधन असाधारण, । हे श्रद्धा, हे निष्ठा शुद्ध सत्त्वगुण; । ऐसा निपुण मी तुझ्या प्रसादें. ॥ ३४ ॥ परंतु सोडोनी शास्त्रविधी, । आणि आरंभिलें त्या कर्माची श्रद्धा निरवधी, । कर्तव्य तों अविधी, । त्यांची निष्ठा तों काय तें मी नेणें ? ॥ ३५ ॥ तरी तें काय मिश्रसत्त्व? कीं त्या निष्ठेस राजसतामसत्त्व, । हें तों कळावें मज तत्त्व, । ऐसें एका अक्षरें तुशब्दें सुचवी. ॥ ३६ ॥ "**तेषां निष्ठा तु का**" म्हणोनी । या श्लोकीं या तुशब्देंकरूनी । इतका अर्थ सुचवूनी, । बोलिला अर्जुन. ॥ ३७ ॥ कीं यथाधिकार । मनीं धरावा शास्त्रोक्त प्रकार, । कार्य अकार्य व्यवस्थाविचार । मोक्षमार्गी नसे यावेगळा. ॥ ३८ ॥ कीं टाकूनी काम, ॥ क्रिया करूनी निष्काम; । भगवदर्पण करावें कर्म; । हें कार्य, अकार्य यावेगळें. ॥ ३९ ॥ कीं सकाम करणें, । आणि ईश्वरीं न अर्पणें, । हें कर्म टाकणें । मुमुक्षूनें. ॥ ४० ॥ हें तों अर्जुन समजला, । तरी ये विषयीं न पुसतां उगा राहिला, । अशास्त्रविधि यजिती, आणि ज्यांला । श्रद्धा अशास्त्रीं, त्यांचीच निष्ठा पुसतसे. ॥ ४१ ॥ ऐशा पूर्वापर विचारें । तुशब्द वाखाणिला या प्रकारें, । मूळीं नसोनी ग्रंथविस्तारें । ग्रंथ नाहीं

---

१. अ० ३, श्लोक ९. २. अ० ९, श्लो० २७.

वाढविला. ॥ ४२ ॥ आतां यास उत्तर । मोक्षमार्गावेगळेची सर्वेश्वर । मिश्रसत्वादि श्रद्धाभेद इतर । या श्लोकीं बोलतो श्रीभगवान्. ॥ ४३ ॥

श्रीभगवानुवाच—त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।
सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति मां शृणु ॥ २ ॥

भगवंत बोलता जाला, । कीं त्रिविध श्रद्धा होते देहधारियाला, । ते **स्वभावजा** म्हणजे उद्भव बोलिला । त्रिविधांसही संस्कारापासुनी. ॥ ४४ ॥ कीं स्वभाव । संस्काराचें नांव, । संस्कारानुरूप भाव । उपजतो श्रद्धेचा. ॥ ४५ ॥ कीं शुद्ध सत्त्वाचरण । जन्मांतरीं केलें, त्याचें अंतःकरण । शुद्धसात्त्विकी श्रद्धेचेंची स्फुरण । घेऊनी उठे. ॥ ४६ ॥ मिश्रसत्त्व रज तम । जन्मांतरीं जसजसें कर्म, । तसतसेची संस्कारधर्म । श्रद्धा जन्मांतरीं उपजविती. ॥ ४७ ॥ प्रस्तुतीं मिश्रसत्त्वादि संस्कार । ते सात्त्विक राजस तामस प्रकार, । त्यांपासूनी श्रद्धा तदनुसार । त्रिविध भेदें उपजे. ॥ ४८ ॥ तें तूं अर्जुना! ऐक, । म्हणोनी बोले मुक्तिदायक; । तों अर्जुनाचे मनीं संदेह कांहींएक, । तदर्थ उत्तरश्लोक प्रवर्ततो. ॥ ४९ ॥ संदेह अर्जुनाचा ये रीती, । कीं त्रिविधा श्रद्धा बोलती श्रीपती, । परंतु श्रद्धा तों शुद्धसत्त्ववृत्ती, । ते कैसी म्हणावी त्रिविधा? ॥ ५० ॥ हे अर्जुनाची शंका । कळली सर्वसाक्षी शेषपर्यंका, । म्हणोनी तत्परिहारार्थ या श्लोका । बोलतसे उत्तमश्लोक. ॥ ५१ ॥

सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥

अगा! सत्त्ववृत्ति जैसी, । श्रद्धाही होते तैसी, । सत्त्वानुरूप श्रद्धा ऐसी, । अगा! भारता! ॥ ५२ ॥ श्रद्धावृत्ति शुद्ध सत्त्व, । हे गोष्टी तों तत्त्व; । परंतु जैसें त्यास मिश्रत्व, । तैसी श्रद्धा ते उपजे अगा! भारता. ॥ ५३ ॥ भरतवंशज तूं अर्जुन, । भरतवंशजच दुर्योधन, । तूं माझ्या संगतीनें सज्जन, । दुर्जन तो संगें शकुनीच्या. ॥ ५४ ॥ श्रद्धा सर्वांस ये रीती, । म्हणोनी म्हणे जगत्पती, । कीं शुद्ध सत्त्वाची श्रद्धा धरी निवृत्ती, । प्रवृत्ति धरी श्रद्धा राजसतामसांची. ॥ ५५ ॥ सत्त्वानुरूपा श्रद्धा बोलिली, । त्याची टीका ऐसी जाली; । आतां त्या श्रद्धेनें भक्ति ज्याची घडली, । तोची तो होतसे. ॥ ५६ ॥ श्रद्धामय पुरुष जीव, । श्रद्धेनें वरिला जो जो भाव, । तो तेची गति पावे. ऐसें देवाधिदेव । बोलतो उत्तरार्धेंकरूनी. ॥ ५७ ॥

उत्तरार्ध ॥ **श्रद्धामयोयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥**

हा पुरुष श्रद्धामय, । ज्याची श्रद्धा तोची होय, । मागें गीतेमध्यें निर्णय । जाला ऐसा. ॥५८॥ याचें ऐसें तत्त्व, । कीं श्रद्धा म्हणजे शुद्धत्व, । ज्या सत्त्वीं जीवत्व । तें सत्वची श्रद्धा. ॥ ५९ ॥ याकारणें श्रद्धामय । हा जीव पुरुष, ऐसा निश्चय; । म्हणोनी म्हणतो रुक्मिणीप्रिय । "**यो यच्छ्रद्धः स एव सः**". ॥ ६० ॥ म्हणजे ज्याची श्रद्धा जया, । तो पुरुष पावतो[१] तया, । कीं ज्याची श्रद्धा, तेंची हृदया । ध्यानीं, मनीं, दिसतसे. ॥ ६१ ॥ मग तो तद्रूप होतो, । देहांतीं तेंची रूप तो पावतो; । जो ज्या देवास भजतो, तोची आठवतो देहांतीं. ॥ ६२ ॥ अथवा लौकिक रीती, । जो पदार्थ आवडे अंतीं, । तोची सर्वदा स्मरे मती. । तेची श्रद्धा तयाची. ॥ ६३ ॥ त्यासी तेंच देहावसानीं । प्राण निघतां आठवे, म्हणोनी । तो तद्रूपची होउनी । उत्पन्न होतो. ॥ ६४ ॥ हें अष्टमीं बोलिला भगवंत । कीं सदा जो ज्या भावें भावित, । तो त्यातेंची असे पावत, । त्यासही मूळ हे श्रद्धा. ॥ ६५ ॥ कीं श्रद्धा जयाची जया, । तो आठवी सर्वदा तया, । देह सोडितां आठवावया । हे श्रद्धाच हेतू. ॥६६॥ कीं हा श्रद्धामय जीव, । सत्त्वोपाधि जो त्या सत्त्वास आठव, तदनुसार होतो भाव । त्या सत्त्वाचा. ॥ ६७ ॥ उपाधींचा भाव जैसा, । जीव होतसे तैसा, । म्हणोनी बोलिला भगवंत ऐसा, । कीं "**यो यच्छ्रद्धः स एव सः**".॥६८॥ वर्तुळ, चतुष्कोण, जैसें स्थळ, । तैसेंच त्यामध्यें जें जळ, तैसेंच त्यामध्यें केवळ । आकाश प्रतिबिंबतें. ॥ ६९ ॥ देहावसानीं जैसी स्मृती, । तैसीच पावे देहाकृती, । तैसीच परस्परें सत्त्वप्रकृती । सत्त्वानुरूप प्रतिबिंबा. ॥ ७० ॥ एवंच ज्याची श्रद्धा त्यास पावती, । तरी बरीच श्रद्धा कां न धरिती? । याची शंकानिवृत्ती । पूर्वार्धींच केली. ॥ ७१ ॥ कीं सत्त्वानुरूप श्रद्धा, म्हणोनी । सत्त्व ज्याचें जैसें, तैसी मनीं । श्रद्धा होते, त्या श्रद्धेंकरूनी । तदनुरूप देवताही तो भजे. ॥ ७२ ॥ त्यांत शुद्धसत्त्व ज्यांची श्रद्धा बरी, । ते मुमुक्षु सेविती हरी, । प्रस्तुतीं मिश्रसत्त्व श्रद्धेपासूनी वैखरी । देवताभजनविषयीं या श्लोकीं बोलतो. ॥ ७३ ॥

**यजंते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः ॥ ४ ॥**

---

१. यं यं वापि स्मरन् भावं त्यजत्यन्ते कलेवरम् । तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥ ८ । ६.

अगा! पार्था! जे सात्त्विक। मिश्रसत्त्व होऊनीही कोणीएक। सकाम स्वर्गादिकामुक,। ते यजिती यथाशास्त्र सात्त्विकां देवांतें. ॥ ७४ ॥ ते देवांतेंची पावती,। हें मागें बोलिला श्रीपती,। कीं "देवयजो यांति" जे देव यजिती, ते पावती त्या देवांतें ॥ ७५ ॥ ऐसेची जे राजस,। ते यजिती यक्षराक्षस,। रजोगुण प्रधानें विलास। यक्षांराक्षसांचे. ॥ ७६ ॥ राक्षसां भजती राजस,। तेची गती अंतीं तयांस,। यावेगळे जे तामस,। तामस श्रद्धा तयांची. ॥ ७७ ॥ ते तामसां प्रेतांतें। यजिती आणि भूतांतें,। ते देहावसानीं पावती तयांतें,। हें मागें भगवंत बोलिला. ॥ ७८ ॥ मरोनी जे पिशाच जाले,। ते प्रेतशब्दें बोलिले,। भूतशब्दें लेखिले। वेताळादिक. ॥ ७९ ॥ एसे त्रिविध जन,। त्रिविध श्रद्धा, त्रिविध भजन,। त्यास तेची गति भवभंजन। बोलिला जे "यो यच्छ्रद्धः स एव सः" म्हणोनी. ॥ ८० ॥ आतां ज्या प्रसंगावरूनी। प्रसंग चालिला त्रिविधा श्रद्धा म्हणोनी,। त्या अर्जुनप्रश्नाचें उत्तर या वचनीं। नाहीं जालें. ॥ ८१ ॥ कीं शास्त्रविधि सोडोनी। वर्तती श्रद्धा धरूनी,। त्यांची सत्त्व, कीं रज, तम, कोण निष्ठा? म्हणोनी। प्रश्न ऐसा. ॥ ८२ ॥ त्या प्रश्नावरूनी। सांगितले श्रद्धाभेद तीनी,। आतां शास्त्रविधि सोडूनी। वर्तती ते दों श्लोकीं वर्णितो. ॥ ८३ ॥

**अशास्त्रविहितं घोरं तप्यंते ये तपो जनाः।**
**दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥**
**कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः।**
**मां चैवांतःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥**

अगा! जें नव्हे शास्त्रविहित,। तें तप घोर तपती अत्यंत;। दंभ अहंकारसहित,। युक्त कामें, विषयप्रीतीनें, बळेंकरूनी. ॥ ८४ ॥ जडा भूतांचा हा ग्राम,। नवद्वार पुर ज्याचें नाम,। यास कष्टी करिती अधम,। त्यामुळें मजही दुःख देती. ॥ ८५ ॥ कीं मी या शरीरीं। जीवत्व पावोनी असतों जो अंतरीं,। त्या मज नानापरी। दुःख देती, दुःख देतां शरीरातें. ॥ ८६ ॥ अशास्त्र उपवासव्रत,। देहदंड जे नव्हती शास्त्रविहित,। तें तप तपतां, अत्यंत। दुःखी शरीर आणि जीव त्यांचा. ॥ ८७ ॥ तो त्यांचा जीव,। परी अंशरूपें मीच देवाधिदेव,। पंचदशीं मीच स्वयमेव। "ममैवांशो जीव" बोलिलों.

---

१. अ० ७, श्लो० २१. २. यांति देवव्रता देवान् पितॄन् यान्ति पितृव्रताः। भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोपि माम् ॥ ९।२५. ३. अ० १५, श्लो० ७.

॥ ८८ ॥ मी सर्वगत अनंत, । परी अंशरूपें असतों शरीरांत, । या भावें बोले भगवंत । "अंतःशरीरस्थं" म्हणोनी. ॥ ८९ ॥ कीं अंश देहाबाहेर नसे, । व्यापूनी देहमात्र वसे, । भोग भोगितां गवसे । ज्ञानचक्षु ज्यांस त्यांला. ॥ ९० ॥ तरी तो माझाची अंश, । सत्त्वोपाधि उदकीं प्रतिबिंबला चिदंश; । अविद्यायोगें बुद्धिभ्रंश, । म्हणूनी संसारी, तो जाला. ॥ ९१ ॥ यापरी जीवलोकीं । जीव जाला अंश माझाच कीं, । माझा अंश मीच ऐसें सुज्ञलोकीं । अनुभवें देखिलें. ॥ ९२ ॥ जे दुःख देती त्याला, । ते दुःख देती मला; । तो देहावेगळा, परंतु जाला । देहात्मभावें देहची तो. ॥ ९३ ॥ त्या शरीरातें लेश । दुःख होतां, पावतो क्लेश, । तो क्लेशी, तेव्हां मीच हृषीकेश । क्लेशी होतों त्या रूपें. ॥ ९४ ॥ त्यांत जे क्लेश शास्त्रविहित, । त्या क्लेशें त्यांचें स्वहित; । अशास्त्र क्लेश देती, अत्यंत । ते नरकातेंची पावती. ॥ ९५ ॥ वैद्य सांगे उपवास, । तो हितावह रोगियास; । वृथा उपवास आयास, । अशास्त्र तप ये रीती. ॥ ९६ ॥ त्या श्रमाचें दुःख एक, । फल त्याचें नरक; । असुरजनांचा हा विवेक, । नरक अर्ती तयातें. ॥ ९७ ॥ कीं पूर्वाध्यायांत असुरजन । जे बोलिलों, त्यांतें नरकींच पतन, । म्हणूनी हे दुर्जन । असुर निश्चयें जाणावे. ॥ ९८ ॥ शास्त्रविधि सोडोनी । वर्तती श्रद्धेंकरूनी । त्यांची कोण निष्ठा? म्हणोनी । प्रश्न तुझा. ॥ ९९ ॥ तरी श्रद्धेविना । कोणी प्रवर्तेना; । जे प्रवर्तती, ते अर्जुना! । असुर, निश्चयें ऐसें तूं जाण. ॥ १०० ॥ शास्त्रविधि सोडिती, । हें प्रश्नोत्तर बोलिला स्पष्ट श्रीपती, । श्रद्धेवांचूनी कां क्लेशी होती? । म्हणोनी श्रद्धेची सूचना. ॥ १०१ ॥ शास्त्र सोडोनी वर्तती, । त्यांस क्लेशची सफळ वाटती, । म्हणोनी देह कष्टी करिती, । त्यायोगें दुःख देती आत्मयातें. ॥ १०२ ॥ तो जीवात्मा क्लेशी वृथा । करिती असुरजनची सर्वथा, । त्यांच्या दुर्गतीची कथा । पूर्वाध्यायीं बोलिलों. ॥ १०३ ॥ उत्तर प्रश्नाचें ये रीती । देऊनियां जगत्पती, । आतां आहारादि जाती । सत्त्वादि भेदें ऐक, म्हणतो या श्लोकीं. ॥ १०४ ॥

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥**

अगा! सर्वांसही त्रिप्रकार । प्रिय होतो आहार; । यज्ञ, तप, दानही, यथा-

१. अ० १६, श्लो० ७-२०.

धिकार । प्रिय होती. ॥ १०५ ॥ ऐसे त्रिविध आहारादिक । त्यांचे भेद सांगतों, ऐक, । म्हणोनी शेषपर्यंक । सात्त्विक आहार बोलतो या श्लोकीं.॥१०६॥

**आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।**
**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥ ८ ॥**

सात्त्विकप्रिय आहार । सेवितां, होय आयुष्य फार, । या गोष्टीचा ऐसा निर्धार । कीं **आयुष्य** म्हणजे देहपुष्टी. ॥ १०७॥ आणि **वृद्धि सत्त्वाची** । म्हणजे बुद्धि राजसातामसांची । सात्त्विकाहारें होऊं लागे साची । दिवसेंदिवस सात्त्विक. ॥ १०८ ॥ एवं सात्त्विकास जे जे प्रीती, । ते ते प्रीति जे धरिती, । ते सात्त्विकची होती, । सत्त्वाची वृद्धि होतां. ॥ १०९ ॥ अथवा **वृद्धि सत्त्वाची** । म्हणजे मनाचे उत्साहाची, । आणि वृद्धि बळाची, आरोग्याची, । सात्त्विक आहार भक्षितां. ॥ ११० ॥ सुख वाढे, वाढे प्रीती, । **प्रीतिशब्दें** रुचि उपजती, । जे आहार सात्त्विकप्रिय भक्षिती, । त्यांतें इतर्केही होय अर्जुना! ॥ १११ ॥ ते आहार **रस्य** म्हणजे रससहित, । **स्निग्ध** घृतमिश्रित, । आणि **स्थिर** जे देहांत । रस होऊनी पुष्टि देती. ॥ ११२ ॥ आणि **हृद्य** म्हणजे मनोरम, । दृष्टीं देखतां, चाखतांही, मनास वाटे उत्तम, । अन्न निर्मळ परम । म्हणावें. ॥ ११३ ॥ ऐसे सात्त्विकप्रिय आहार, । त्यांचे कोण कोण प्रकार? । त्याचा करावा विचार । पूर्वापर अनुसंधानेंकरूनी. ॥ ११४॥ रस्य आणि स्निग्ध म्हणोनी । सात्त्विकप्रियआहारलक्षणें दोनी, । वरकड आयुःसत्त्वबलादिवृद्धीकरूनी । गुण त्यांचे जाणावे. ॥ ११५ ॥ आतां रस्य आणि स्निग्धलक्षण, । आणि राजसतामसांहूनी विलक्षण । पाहतां, दुग्ध-शर्करा, घृत, आणि धान्यगण, । गोधूम, तंदुल, इत्यादि. ॥ ११६ ॥ कीं कटु, अम्ल, लवण, । आणि राजसप्रिय तीक्ष्ण, । आणि ज्या पदार्थास रूक्ष-पण, । ते राजसप्रिय. ॥ ११७ ॥ एवंच क्षीर, शर्करा, घृत, । अन्न गोधूम-तंदुलादिकृत, । आणि पाक निर्मळ अत्यंत । जो हृद्य रम्य वाटे हृदयातें. ॥ ११८ ॥ बहुत उष्ण राजस, । बहुत शीतळ तामस, । अल्प उष्ण सद्यः-पाकरस । आहार सात्त्विकप्रिय इत्यादि. ॥ ११९ ॥ आणि राजसाहारलक्षण । अत्यंत कटु, अम्ल, लवण, तीक्ष्ण; । तेव्हां अल्प कटु, अम्ल, लवण, तीक्ष्ण-पण, । सात्त्विकाकडेही लागलें. ॥ १२० ॥ कीं कटुअम्लादि अतिशय । तेची आहार राजसप्रिय, । अल्पकटुअम्लादिमय । आहार सात्त्विकाही आवडती. ॥ १२१ ॥ ग्रंथ पाहतां पूर्वापर, । निर्णय करितां, हे सात्त्विकप्रिय आहार, । आतां राजसप्रियांचा विचार । देव बोलतो या श्लोकीं. ॥ १२२ ॥

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥**

जे पदार्थ अत्यंत कडवट, । आणि जे अत्यंत आंबट, । आणि अत्यंत खारट, । आणि अत्यंत उष्णही. ॥ १२३ ॥ आणि तिखट जे बहु फार, । आणि रूक्ष धान्याचे प्रकार, । रूक्ष धान्याचा निर्धार । जीं चिकण धान्यें न असती; ॥ १२४ ॥ पिष्ट धान्याचें न वळे । जें गिळितां शीघ्र न गिळे, । हातीं धरितांची गळे । पिष्ट तिंबिलेंही ज्या धान्याचें; ॥ १२५ ॥ अत्युष्ण शब्दीं अतिशय, । याचा सर्वत्र अन्वय; । अतिशय नसे, तरी प्रिय । सात्विकासही होती. ॥ १२६ ॥ अन्यथा अलवण । जें अन्न, त्यास हृद्यपण । नये, कीं गोडीवांचून जेवण । हृद्य नव्हे, न रुचतां हृदयातें. ॥ १२७ ॥ आतां या राजसप्रिय आहारजाती । भक्षितांच जाळूं लागती, । तेणेंकरूनी दुःख देती, । शोक उपजविती चित्तातें. ॥ १२८ ॥ ते आहार निंवतां पोटीं । रोग उपजविती शेवटीं, । श्रीकृष्ण म्हणे, अगा! किरीटी! । हे आहार इष्ट राजसांचे. ॥ १२९ ॥ एवंच जैसा पूर्वसंस्कार, । आहार आवडे तदनुसार, । आतां तामसांचे आहार । सांगतसे या श्लोकीं. ॥ १३० ॥

**यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥**

अन्न शिजलियावरी । प्रहर एक लोटे जरी, । तें "**यातयाम**" तदुपरी । म्हणावें अन्न. ॥ १३१ ॥ तें प्रीतीनें खाती तामस, । आणि जें **गतरस** । म्हणजे वाळूनी जालें विरस । अन्न जें कां; ॥ १३२ ॥ आणि जें करपलें, । रस जळोनी जातां, जें भाजलें, । आणि रस घेऊनी गतरस टाकिलें । वेळिलें[2] वेळैण भाताचें; ॥ १३३ ॥ आणि सुरस दाळी उडिदांची घेती, । कैळणा विरस टाकिती, । त्या गतरसांचीं भक्ष्यें आवडती । तामसांतें. ॥ १३४ ॥ शुभ्र गोधूमांश सुरस । घेऊनी; तांबडा अंश कुरस । टाकिती, तो भाग गतरस, । तामसांस प्रिय भक्ष्यें तयाचीं. ॥ १३५ ॥ गतरसांचे आहार । इत्यादि जे जे प्रकार, । ते तामसांस आवडती फार; । आणि **पूति** म्हणजे दुर्गंधीही; ॥ १३६ ॥ पिष्ट जळें कालविती, । तें जोंवरी आंबे तोंवरी ठेविती, । तो

---

१. रिघतां, शिरतां. २. वेळणें—पेज काढणें. ३. पेज काढून फडफडीत व नीरस केलेला भात. ४. कणी, चूर. ५. गव्हाचें सपीठ, शुद्ध कणीक.

आंबट वास गोड मानूनी पिती, । आंबिल म्हणती तयातें. ॥ १३७ ॥ अन्न बिटलें सांपडें; । तें अत्यंत आवडे, । सुगंध मानिती बापडे । दुर्गंधातें. ॥ १३८ ॥ अतएव पूर्वदिनीं रांधिलें, । तें दुसरें, तिसरें, दिवशीं मिळालें, । तैसेंच अत्यंत आवडलें, । तामसांतें. ॥ १३९ ॥ आणि कोणी जेवितां अवशिष्ट । अन्न उरलें उच्छिष्ट, । तेंही तयांस वाटे इष्ट, । रसनालोभें कंटाळा उपजेना. ॥ १४० ॥ या भावेंकरूनी । "उच्छिष्टमपि च" म्हणोनी, । अपिशब्दें चकारेंकरूनी । अर्थ ऐसा सुचविला. ॥ १४१ ॥ अन्यथा उच्छिष्ट होतां जरी । कांहीं रस विशेष उपजता, तरी । तें कांहीं एके परी । आवडतें, म्हणावें. ॥ १४२ ॥ जें "यातयाम" अन्न जालें, । तें अत्यंत जेव्हां निवालें, । गोडी उष्णत्वाची जाऊनी आलें । रसविशेषें तामसप्रियत्व. ॥ १४३ ॥ ऐसीच गतरसादिकांची । कांहीं विलक्षण उपजे रुची, । तैसी उच्छिष्टास कैंची ? । रुचि कांहीं कीं तें आवडे. ॥ १४४ ॥ उच्छिष्टपणीं अन्नाचा कर्दम । गोड मानावा, तरी तें कर्म । अनुच्छिष्टासही करूं शके अधम; । गोडी विशेष कोण उच्छिष्टीं ? ॥ १४५ ॥ वाइटाचीही उपजे कांहीं गोडी, । तरीच तें भक्षावें ऐसी खोडी; । गोडी नसे बहुत, ना थोडी, । तरी कां खोडी ते लागेल ? ॥ १४६ ॥ आतां या अर्थास गती । न लागतां, बोलावी भलतैसी रीती, । अर्थास गति दावूनी बोले श्रीपती । "उच्छिष्टमपि च" म्हणोनी. ॥ १४७ ॥ कीं उच्छिष्टही आवडे, । जरी कांहीं आवडीचें दृष्टीं पडे, । हें कर्म इतरांपासूनी न घडे । तामसांवांचूनी. ॥ १४८ ॥ गोडीवांचूनी प्रीती । कोण्हासही न उपजती, । परंतु संस्कारानुरूप प्रवृत्ती । आवडीच्या. ॥ १४९ ॥ अर्थ न लागतां अगत्य, । उदंड येविषयीं केलें पांडित्य, । तें सर्वेही असत्य, । गोडी विशेष उच्छिष्टशब्दीं न बोलतां. ॥ १५० ॥ आतां "अमेध्य" म्हणिजे जें नव्हे पवित्र, । कांदे, लसुण, जें जें अपवित्र, । इत्यादि भोजन विचित्र । प्रिय तामसां जनांतें. ॥ १५१ ॥ ऐसें बोलोनी आहार, । आतां यज्ञ त्रिप्रकार । बोलतसे सर्वेश्वर, । त्यांत सात्त्विक यज्ञ या श्लोकीं. ॥ १५२ ॥

**अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।**
**यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥ ११ ॥**

फलाची कांक्षा नसे, । आणि विधिदृष्टि दिसे, । विधि पाळावा म्हणूनीच

---

१. सांपद् व उबट वास ज्यास येत आहे असें. 'सांपडे' असा पाठ आढळतो.

यजन होतसे । समाधानें मनाच्या; ॥ १५३ ॥ तो सात्त्विक यज्ञ, । कर्ता सात्त्विकची सुज्ञ, । आतां सांगतो सर्वज्ञ । राजसयज्ञ या श्लोकीं. ॥ १५४ ॥

**अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।**

**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥**

उद्देश फळलाभाचा करूनी । आणि आपण यज्ञकर्ता म्हणोनी । प्रसिद्ध व्हावें ऐसी इच्छा धरूनी, । यज्ञ करी दंभार्थ. ॥ १५५ ॥ ज्या यज्ञेंकरूनी इच्छी प्रतिष्ठा, । तो यज्ञ राजस अगा! भारतश्रेष्ठा! । तो राजस आणि त्याची निष्ठा । जाण अवघें राजस. ॥ १५६ ॥ राजस यज्ञप्रसंग । आणि 'भरतश्रेष्ठा!' म्हणे श्रीरंग । या संबोधनीं भाव अंतरंग । दाखवी ऐसा. ॥ १५७ ॥ कीं वेदोक्त यज्ञ होय, परी । दंभ आणि फळाची अपेक्षा अंतरीं, । तरी तो भरतवंशीं अधम ज्यापरी । दुर्योधन. ॥ १५८ ॥ तो भरतवंशांत अधम, । तरी तू अर्जुन त्याच वंशीं उत्तम, । या भावें म्हणे पुरुषोत्तम । 'अगा! भरतश्रेष्ठा!' म्हणोनी. ॥ १५९ ॥ कीं यज्ञ उत्तम जाला; । परी भरतवंशीं दुर्योधन उपजला, । तैसा रजोगुण निवाला । त्या यज्ञांत. ॥१६०॥ अर्जुनाचें श्रेष्ठपण । बोलतां, दुर्योधनाचें अधमपण । सुचवूनी, बोले आतां लक्षण । तामसयज्ञाचें या श्लोकीं. ॥ १६१ ॥

**विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।**

**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥**

जो यज्ञ विधिहीन, । विधि सोडूनी मांडिलें यजन । आणि ब्राह्मणार्थ न शिजलें अन्न, । यज्ञ मंत्रदक्षिणाविवर्जित, ॥ १६२ ॥ आणि श्रद्धा नसे मनीं, । करी 'लौकिकार्थ करावें' म्हणोनी, । श्रद्धा नाहीं यावरूनी । विधिमंत्रअन्नदक्षिणाविवर्जित. ॥ १६३ ॥ आतां सात्त्विकादि क्रम । तपांचा सांगेल पुरुषोत्तम, । त्या तपांचे त्रिविध भेद प्रथम । सांगतो. ॥ १६४ ॥ तप शारीर एक, । एक तप वाचिक, । एक तप मानसिक, । त्यांत शारीर तप बोलतो या श्लोकीं. ॥ १६५ ॥

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।**

**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥**

पूजा देवांची, द्विजांची, । आणि पूजा गुरूची, । आणि इतरांही ज्ञानियांची, आणि शौच; ॥ १६६ ॥ आणि आर्जव । भलत्यासी सरळ भाव; । धरूनियां वक्र स्वभाव, । न वर्तवणें शरीरातें. ॥ १६७ ॥ ब्रह्मचर्याच्या दोन

रीती, । एक नैष्ठिक स्त्री न करिती, । एक संतानार्थ ऋतुकाळीं रति देती, । द्विविधही तप शारीर तें. ॥ १६८ ॥ आणि **अहिंसा** । म्हणजे न करणें हिंसा, । म्हणजे पीडा कोणासी न करणें, ऐसा । अर्थ अहिंसा शब्दाचा बोलती. ॥ १६९ ॥ हीं इतकीं शरीरेंची घडती, । म्हणोनी. **शारीरतपें** हीं बोलती, । आतां वाचिक तपें जगत्पती । बोलतसे या श्लोकीं. ॥ १७० ॥

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥**

उद्वेग नाहींसा करी, । सत्य आणि प्रिय हित वाटे, यापरी । वाक्य बोलणें त्यास हरी । वाचिक[1] तप म्हणतसे. ॥ १७१ ॥ एवंच बोलावा परमार्थ, । हाची सिद्ध होतो अर्थ, । प्रपंचाकडे लावितां अनर्थ, । विरुद्धार्थ होतो ये रीती. ॥ १७२ ॥ कीं शब्द बोलतां, क्लेश । ऐकेल त्याला न उपजे लेश, । ऐशा बोलण्यातें हृषीकेश । जरी म्हणावें वाङ्मय तप म्हणतसे; ॥ १७३ ॥ तरी सत्य बोलतां । दुःखी होणार ऐसा श्रोता, । गोष्टी त्यास अनृता । बोलणें लागलें मुखाकारणें; ॥ १७४ ॥ तेव्हां अनुद्वेगकर । तें वाक्य त्यास होणार, । बोलतां तों असत्यदोष लागणार, । न बोलतां तप वाङ्मय मग न घडे. ॥ १७५ ॥ या संदेहाची निवृत्ती । न दिसे, ऐसें न बोले श्रीपती, । आतां भगवद्वचन लागे जे रीती, । ते रीतीनें अर्थ बोलावा. ॥ १७६ ॥ कीं संसारउद्वेगहर । अध्यात्मवाक्य तें अनुद्वेगकर, । तें सत्य, तें प्रिय, तें हितकर, । यानेगळा अर्थ लागेना. ॥ १७७ ॥ शत्रु मारावया येतो, । हें सांगतांची तो भितो, । न सांगतां घात होतो, । 'नाहीं' म्हणतां लागतें असत्यत्व. ॥१७८॥ जो करितो अधर्म, । त्यास अप्रिय सांगणें धर्म; । प्रिय बोलतां, तें कुकर्म । नेणार नरका, तें हित नव्हे. ॥ १७९ ॥ आतां बहुत बोलोनी काय ? । ऐसी प्रपंचवार्ता बोलिली नवजाय[2]; । आत्मचर्चेवांचूनी उपाय । वाङ्मयतपाचा न सांपडे. ॥ १८० ॥ उद्वेग नाहींसाच करी, । ते आत्मचर्चाच खरी, । आणि सत्यही तेची वैखरी, । कीं सत्यातेंची सत्य म्हणतसे. ॥ १८१ ॥ आणि तेंची वाक्य प्रिय, । कीं ज्या वाक्यांत प्रिय आत्मा अद्वय, । वेदीं ज्याच्या प्रियत्वाचा निर्णय, । जो प्रियपणें सर्वांस अनुभवा येतसे. ॥ १८२ ॥ सर्वांपरीस देह प्रिय, । तोही आत्मार्थ होतो अप्रिय, । हात पाय घावयाचा निश्चय । करितो आत्मयाकारणें. ॥ १८३ ॥ ज्या वाक्यांत तो प्रिय वसे, । प्रिय त्या-

१. 'सात्त्विक' असा पाठ आढळतो. २. जात नाहीं.

हूनी काय असे? । आणि हित दुसरें न दिसे । आत्मचर्चेवांचुनी. ॥ १८४ ॥ सर्व उद्वेग जाती, । सत्य होऊनीही, प्रिय हित अती, । ऐसी आत्मचर्चा म्हणे श्रीपती । 'वांङ्मय तप' बोलिजेते. ॥ १८५ ॥ आतां ऐसें बोलावयालागीं । साधक मुमुक्षु पाहिजे योगी, । तो तों दुर्लभची जगीं, । भेटला, तरी न भेटे सर्वदा. ॥ १८६ ॥ तेव्हां हें तप स्वाधीन । नव्हे, ऐसें मानील अर्जुन, । तरी स्वाधीनही आहे ऐसें वचन । बोले "**स्वाध्यायाभ्यसनं**" म्हणोनी. ॥ १८७ ॥ कीं **स्वाध्याय** म्हणजे वेद, । ज्यांत बोलिला आत्मत्वाचा अभेद, । जेथें निषेधिला जडजीवेश्वरांचा भेद, । युक्तिदृष्टांतअनुभवें. ॥ १८८ ॥ ऐसे वेद, त्यांचा निर्णय । ज्या ज्या ग्रंथीं बोलिला अद्वय, । त्या ग्रंथांचा अभ्यास होय, । तरी वाङ्मय तपची तें बोलावें. ॥ १८९ ॥ एवंच कोणाशीं घडे संवाद, । तो सत्य, प्रिय, हित, आत्मवाद; । तैसे न भेटतां, साल्हाद । अभ्यास करावा अद्वैत ग्रंथांचा. ॥ १९० ॥ हें तप वाङ्मय, । त्या वाङ्मयतपाचा ऐसा निर्णय, । आत्मचर्चा, कीं अद्वैतशास्त्र, कीं मौननिश्चय, । बोलणें यावेगळें सर्व वृथा. ॥ १९१ ॥ भगवद्गुणकथाकीर्तन, । त्यांत सत्यवस्तु, सत्यप्राप्तिसाधन, । प्रिय, हित, सर्व उद्वेगनाशन; । एवंच लोकवार्ता त्याच वृथा. ॥ १९२ ॥ परमार्थावांचूनी दुष्कर । **वाङ्मयतप** ऐसें बोलिला सर्वेश्वर, । तोची आतां बोलतो परात्पर । मानस तप या श्लोकीं. ॥ १९३ ॥

**मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।**
**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥**

मनाचा प्रसाद, । स्वहितविषयीं मनाचा आल्हाद, । विषयासक्तीचा प्रमाद । मनांत नसणें. ॥ १९४ ॥ हें मानस तप, आणि सौम्यत्व । म्हणिजे मनीं नसणें क्रूरत्व, । आणि मौन म्हणिजे निःशब्दत्व । तन्मयपणें असणें मनाचें. ॥ १९५ ॥ पैरा. पश्यंती, मध्यमा, वैखरी, । निश्चळ राहती वाचा चारी, । तें मनाचें मौन बोले हरी । मानस तप. ॥ १९६ ॥ तथापि तेथूनी मन । उठे, करी विषयचिंतन, । तेव्हा प्रैत्याहार त्या मनाचें साधन, । मानस तप तेंही म्हणावें. ॥ १९७ ॥ विषयस्फूर्ति ज्या वस्तूकरूनी, । तो आत्मा हेम, तो विषय नग, म्हणोनी । स्मरतां अन्वयबोधें अनुभवेंकरूनी । मन यथापूर्व चित्स्वरूपींच थारते. ॥ १९८ ॥ मुख्य हाच प्रत्याहार, । मनोनिग्रह एतत्प्रकार, । त्यास आत्मनिग्रह म्हणे सर्वेश्वर । तप मानस हेंही म्हणावें. ॥ १९९ ॥

१. या अनुक्रमें स्मृतिरूप, भासरूप, मननरूप, व शब्दरूप वाणी होत. २. आवरून परत फिरविणें, अंतर्मुख करणें.

विरक्ताचा पूर्वसंस्कार । मन करी विषयाकार, । त्यास परतवणें प्रत्याहार । ये रीतीचा. ॥ २०० ॥ तरी चित्तशुद्धीविना । विरक्त ऐसा होईना, । म्हणूनी देव म्हणतो अर्जुना । भावसंशुद्धीही तप मानस. ॥ २०१ ॥ भावशब्दें चित्त, । शुद्धी त्याची ऐसी, कीं तें सुचित्त । अभ्यासीं प्रवर्ते, आणि विषयानिमित्त । चंचळ नव्हे चित्स्वरूपीं. ॥ २०२ ॥ मानस तप हें ये रीती । बोलिजेत, म्हणे श्रीपती, । आतां सात्त्विकादि तपजाती । बोलेल, त्यांत हा श्लोक. ॥ २०३ ॥

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।**

**अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥**

परम श्रद्धेंकरूनी । तप केलें, आस्तिकबुद्धि धरूनी, । तें सात्त्विक, राजस, तामस, म्हणोनी । त्रिविध, त्यांत ऐसें सात्त्विक. ॥ २०४ ॥ फळाची इच्छा न धरूनी । तप केलें स्थिर मनेंकरूनी, । तें **तप सात्त्विक** ह्मणोनी । बोलिजेतें. ॥ २०५ ॥ तप फळेच्छारहित, । आणि त्या तपाच्याच ठायीं योजिलें चित्त, । ऐसे पुरुष ते निश्चित । म्हणावे **युक्त** म्हणोनी. ॥ २०६ ॥ ऐसे निष्काम युक्त नर, । तप त्यांचें सात्त्विक, म्हणे **सर्वेश्वर**, । आतां राजसतपप्रकार । बोलतसे या श्लोकीं. ॥ २०७ ॥

**सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।**

**क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥**

**सत्कार** म्हणिजे साधुकार, । साधुकार म्हणिजे साधूसारिखा आकार, । हा तपस्वी भला, ऐसा आपला प्रकार । दिसो, म्हणोनी तप करी. ॥ २०८ ॥ आणि आपला व्हावा मान, । लोकीं द्यावा सन्मान, । आणि धनादिकीं स्वपूजन जन । करोत, म्हणोनी तप करी. ॥ २०९ ॥ निष्ठा नसे अंतरीं । दंभकरूनी तप करी, । **राजस** म्हणावें यापरी, । जें चचळ, अध्रुव, अशाश्वत. ॥ २१० ॥ यासी चळ आणि अध्रुव । दोनी नावें ठेवी देव, । परी जें चळ, तेंची नव्हे ध्रुव, । यालागीं अर्थ वेगळे योजावे. ॥ २११ ॥ तपःस्वरूप चळ, । कीं करितां शरीर, वाचा, मन, चचळ; । सत्कार मान पूजादि दृष्टफळ । तेंही अध्रुव, अशाश्वत, म्हणावें. ॥ २१२ ॥ कीं दंभ होतां प्रगट, । दिसों लागे वाईट, । सन्मानाचा निपट । अपमान होतसे. ॥ २१३ ॥ धनादिकीं पूजा जाली, । तीं धनें राजगृहा गेलीं, । किंवा ज्यांचीं तिहीं नेलीं, ।

१. 'या सचळ' असा पाठ आढळतो.

कळतां दांभिक. ॥ २१४ ॥ एवंच तप चळ, । अध्रुव त्यांचें *फळ, । आतां तामस तप अमंगळ । बोलतसे या श्लोकीं. ॥ २१५ ॥

**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥**

मूढ पात्रें आग्रह, । तो म्हणावा **मूढग्राह,** । त्या दुराग्रहें पीडूनी, स्वदेह । दुःखी करी जीवात्मा; ॥ २१६ ॥ हें एक **तप तामस** । अथवा परास । तप करी दुःख द्यावयास, । मारण, जारण, उच्चाटनादि. ॥ २१७ ॥ पराच्या नाशाकारणें । तपें जपहोमादि दारुणें । करिती तामस, ज्यानें । नरक अंतीं. ॥ २१८ ॥ ऐसें त्रिविध तप । बोलिलें, आतां दानाचें रूप । त्रिविध बोलतो अध्यात्मदीप, । त्यांत सात्त्विक दान या श्लोकीं. ॥ २१९ ॥

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥**

देणें बरें सर्वांहुनी, । यालागीं द्यावेंच, म्हणोनी । जें दान करिजेतें उपकारावांचूनी । उत्तम देशीं, काळीं, सत्पात्रीं, तें **सात्त्विक** ॥ २२० ॥ याचा ऐसा अर्थ, । कीं जें देणें प्रत्युपकारार्थ । तें दान राजस, न म्हणावें समर्थ । सात्त्विकासारिखें. ॥ २२१ ॥ दान जें कां सात्त्विक, । तें उत्तम क्षेत्राचें पीक, । त्या पिकाचें पुढें पीक अधिक । तैसें देणें सत्पात्रीं. ॥ २२२ ॥ सत्पात्रीं जालें समर्पण, । तेंची तों फळ दे कोटिगुण, । सत्पात्र तेंची जेथें दातृत्वगुण, । कीं षट्कर्मांतें प्रतिग्रह आणि दानही. ॥ २२३ ॥ घेऊनियां धन, । आपण न करी त्यामधूनी दान, । तो लोभी, त्यालागीं मान । सत्पात्रासमान होय कैसा ? ॥ २२४ ॥ एवंच सत्पात्रीं अर्पितां वित्त, । पुण्य अगण्य, आणि पुढें पुण्याचें निमित्त, । कीं त्या सत्पात्राचें दयाळु चित्त, । भूतदयेनें तें वेंची. ॥ २२५ ॥ देणें निष्काम केवळ, । ईश्वरार्पण, न इच्छूनी फळ, । परंतु जों जों तें सफळ, । तों तों संतुष्ट परमात्मा. ॥ २२६ ॥ ऐसें सत्पात्रदान सफळ, । परंतु द्यावेंच म्हणोनी; जरी दे उपकारमूळ, । तरी तें प्रत्युपकारची, केवळ । दान नव्हे. ॥ २२७ ॥ "या ब्राह्मणाचे घरीं । अन्नें जेविलों आम्ही बरीं', । भाव धरूनी ऐसा अतरीं । जें देणें, तो प्रत्युपकार. ॥ २२८ ॥ अथवा, 'या ब्राह्मणें । कष्ट केले आम्हांकारणें', । म्हणोनी जें द्रव्य देणें, । तें सेवाऋणपरिहार, दान नव्हे. ॥ २२९ ॥ एवंच, देखतां सत्पात्र, । 'यास

द्यावें', इतकेंची मात्र । मनीं धरूनी देतां, विश्वगात्र[1] । जगदात्मा संतोषे. ॥ २३० ॥ असोनी ऐसें सत्पात्र, । आणि असे सुक्षेत्र, । आणि सर्वकाळ पवित्र, । अत्यंत सात्त्विक दान तें. ॥ २३१ ॥ आतां देश उत्तम असे सत्क्षेत्र, । न सांपडे तेथें सत्पात्र, । आणि नाहीं काळही पवित्र, । साधारण ब्राह्मण तीर्थवासी. ॥ २३२ ॥ येणें तीर्थोद्देशें घडलें, । अथवा कांहीं कार्य पडलें, । मार्गीं अकस्मात् सांपडलें । पुण्यतीर्थ सत्क्षेत्र. ॥ २३३ ॥ तीर्थवासी विप्र मात्र । विचारितां नव्हती सत्पात्र, । आणि काळही नव्हे पवित्र, । तरी काय देऊं नये तयांतें? ॥ २३४ ॥ अथवा थोर पर्वकाळ, । आणि देश कैकट[2], फैटकाळ[3], । सत्पात्र सांपडेना तत्काळ, । तरी साधारणास द्यावें कीं न द्यावें? ॥ २३५ ॥ अथवा भेटलें सत्पात्र, । आणि नव्हे तें पुण्य क्षेत्र, । अथवा नाहीं काळही पवित्र, । तरी सत्पात्रीं कांहीं द्यावें कीं न द्यावें? ॥ २३६ ॥ अथवा दिधलें, । तरी तें सात्विक, कीं राजस, तामस, बोलिलें? । ऐशा बहुतां संदेहांचें स्थळ देखिलें । सर्वज्ञें ये स्थळीं. ॥ २३७ ॥ म्हणोनियां संशयाचा परिहार । "देशे काले च पात्रे च" हे चकार, । दों चकारें तिन्ही प्रकार । सात्त्विकची बोलिले दानाचे. ॥ २३८ ॥ देशशब्दापुढें चकार । नाहीं, कीं अधिक होतें अक्षर, । पुढिल्या चकाराच्या अन्वयें परिहार । सत्क्षेत्रदानसंदेहाचा. ॥ २३९ ॥ **"देशे च यद्दानं दीयते । तच्च सात्त्विकं स्मृतं"** ऐसी भगवद्वाणी बोलते, । **"काले च यद्दानं दीयते । तच्च सात्त्विकं स्मृतं"** म्हणे भगवंत. ॥२४०॥ **"पात्रे च यद्दानं दीयते । तच्च सात्त्विकं स्मृतं"** गीता म्हणते । चकार दोन्ही दों ठायीं योजिते । भगवद्वाणी ये रीती. ॥ २४१ ॥ याचा अर्थ ये रीती । कीं सत्क्षेत्रीं जे वास करिती, । जे त्यातें अपात्रत्वें न पूजिती, । तीर्थफळच नाहीं तयातें, स्मृति म्हणे. ॥ २४२ ॥

स्मृति—**यस्मिन्तीर्थे तु ये देवा यस्मिन् तीर्थे च ये द्विजाः ॥**
**पूजनीयाः प्रयत्नेन स तीर्थफलमश्नुते ॥**

ज्या तीर्थी जे देव, । ज्या तीर्थी जे विप्र भूदेव, । ते प्रयत्नें पूजावे; तरी जो सदैव । पूजी, तोची फळ पावे तीर्थाचें. ॥ २४३ ॥ एवंच तीर्थवासी ब्राह्मण । ते जरी साधारण, । तरी जो विचक्षण, ते त्याणें पूजावे. ॥ २४४ ॥ यथाशक्ति तीर्थवासियांतें । जो नेदी, नसे तीर्थफळ तयातें, । यालागीं येथें ऐसें

१. विश्वदेही, विराट्स्वरूपी. २. किकट. रानवट, घाणेरडा. ३. दुर्वर्तनी, दुराचारी, दुष्ट.

बोलिलें भगवंतें, । कीं पुण्यदेशींही जें दान, तें सात्त्विक. ॥ २४५ ॥ "देशे च यद्दानं म्हणोनी" । "तच्च सात्त्विकं स्मृतं" या दों चकारेंकरूनी, । सत्काळ, सत्पात्र, या दोहींवांचुनी । जें दान, बोलिलें तें सात्त्विक. ॥ २४६ ॥ तैसाच पुण्यकाळ, । आणि ज्या स्थळीं आहे तो देश फटकाळ, । आणि सत्पात्रही नाहीं तत्काळ, । तथापि साधारण ब्राह्मणा धन द्यावें. ॥ २४७ ॥ तैसेंची, भेटलें सत्पात्र, । आणि देशकाळ नसती पवित्र, । आणि असे सत्पात्र मात्र, । तथापि जें द्यावें, तें सात्त्विक, देव म्हणे. ॥ २४८ ॥ ज्या भलतशा देशीं भेटे सत्पात्र, । तेंची पुण्यतीर्थ पुण्यक्षेत्र; । ज्या काळीं भेटे सत्पात्र, । तोची पवित्र पर्वकाळही. ॥ २४९ ॥ येविषयीं प्रमाणें अपार, । बोलतां, ग्रंथ वाढतो फार; । एवंच सात्त्विकदानप्रकार । ये रीती. ॥ २५० ॥ हा सुवर्णादिदानप्रकार; । अन्नदानीं कांहीं नलगे विचार, । क्षुधितातृषितासही यथाधिकार । अन्न, उदक, अर्पावें. ॥ २५१ ॥ ऐसा **सात्त्विकदानाचा** विचार, । आतां राजसदानप्रकार । बोलतसे जगदाधार । या श्लोकीं. ॥२५२॥

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।**
**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥**

स्मरोनी ब्राह्मणाचा उपकार, । दान करी, मानी प्रत्युपकार, । तो **राजसदानप्रकार;** । आणि राजसदान, त्याचें फळ इच्छितांही. ॥ २५३ ॥ फलाकारणें जे दान, । ते धनें धन मेळवायाच्या उद्यमासमान, । राजसदान तितकें निदान । बंधाचें. ॥ २५४ ॥ आणि जें देणें परिक्लिष्ट, । म्हणिजे देऊनीही मानणें कष्ट, । हेंही दान राजस स्पष्ट; । आतां तामसदान या श्लोकीं. ॥ २५५ ॥

**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।**
**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥**

वाईट देश, वाईट काळ, । ज्यास देणें, तें अपात्र फटकाळ, । या तिहींचा होतां मेळ, । दान देणे तें **तामस** बोलिलें. ॥ २५६ ॥ या तिहींमध्यें एक बरें, । तें दान सात्त्विकचीं खरें; । देश, काळ, पात्र, तिन्ही एकसरें । वाईट, तेव्हां तामस तें दान. ॥ २५७ ॥ अथवा हे योग तिन्ही । अनुकूळ एकसरें असोनी, । सत्कार पात्राचा न करूनी, । अपमानें देणें तें तामस. ॥ २५८ ॥ पादक्षालनादि सत्कार, । आणि सत्पात्राचा न करितां तिरस्कार, । 'उत्तम देश, उत्तम काळ, तो प्रकार । सात्त्विक दानाचा. ॥ २५९ ॥ देश

काळ, पात्रही, बरें; । आणि देणें अनादरें, । पात्रास तुच्छ करणें तिरस्कारें, । तें दान तामस बोलावें. ॥ २६० ॥ ऐसे यज्ञतपदानक्रम, । यांत सात्त्विक तितके उत्तम; । परी त्या उत्तमाचेंही कर्म अधम, । अंगहीन होतां, होतसे. ॥ २६१ ॥ जें अंगहीन जालें, । त्यास उत्तमत्व कैचें आलें? । तेव्हां राजसतामसाचमध्यें पडलें । सात्त्विकही. ॥ २६२ ॥ एक अंगहीन जालें, । एक अपूर्णचि राहिलें, । तेव्हां तें व्यर्थचि गेलें, । तरी हें करोनीही कोण फळ? ॥ २६३ ॥ ऐसें असतां, हें जाण राजस. । आणि हें जाण तामस, । आणि हें जाण सात्त्विक, ऐसें श्रीनिवास, । कां बोलतो? ॥ २६४ ॥ ऐसें संशयाचें स्थळ, । तरी अंगहीन, सकळ । होती परिपूर्ण सफळ । हरिनामेंकरूनी. ॥ २६५ ॥ **"यस्य स्मृत्या च नामोक्त्या"** हे स्मृती । म्हणे **"न्यूनं संपूर्णतां याति"** । कीं हरिस्मृतीनें आणि नामोच्चारें होती । न्यूनें, अंगहीनेंही. परिपूर्ण. ॥ २६६ ॥ याप्रकारें स्मृती । कर्मसिद्धि हरिनामें बोलती, । त्याचा मूळ हेतु जगत्पती । बोलतसे या श्लोकीं. ॥ २६७ ॥

**ओंतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥**

अगा! जें ब्रह्म नामरूपा आलें, । तें त्रिविध नामनिर्देशें बोलिलें, । आणि जें त्रिप्रकारें नाम पावलें । **'ओं तत् सत्'** म्हणोनी. ॥ २६८ ॥ या त्रिविध नामनिर्देशेंकरूनी । पूर्वी ब्राह्मण, वेद, यज्ञ, निर्मिले; यावरूनी । नामें कर्म सांग, परिपूर्ण, म्हणोनी । स्मृति बोलती, हा भाव. ॥ २६९ ॥ त्यास प्रमाण आचार, । प्रस्तुत आतांही ओंकार । प्रथम त्याचा उच्चार । सर्व करिती, म्हणतसे या श्लोकीं. ॥ २७० ॥

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।**
**प्रवर्तंते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥**

या त्रिविध नामेंकरूनी । ब्राह्मण, वेद, यज्ञ, निर्मिले; म्हणोनी । त्या कारणास्तव **'ओं'** म्हणूनी उच्चारूनी । प्रवर्तती यज्ञदानतपःक्रिया. ॥ २७१ ॥ आधीं ओंकार म्हणती, । मग यज्ञ आरंभिती, । यज्ञाचे भेद यदुपती । चतुर्थी मागें बोलिला. ॥ २७२ ॥ नाना यज्ञ बोलोनी । **"एवं बहुविधा यज्ञा"** या श्लोकेंकरूनी । जे उत्तम क्रिया, ते यज्ञ, म्हणोनी । देवाधिदेवें सुचविलें. ॥ २७३ ॥ पूर्वश्लोकीं, ब्राह्मण, वेद, यज्ञ, । या त्रिविध नामें

१. अ० ४, श्लो० २३-३१ पहा. २. अ० ४, श्लो० ३२.

निर्मिले म्हणे सर्वज्ञ; । या श्लोकीं म्हणे, त्या कारणास्तव अभिज्ञ । ओंकार उच्चारूनी सत्क्रिया करिती. ॥ २७४ ॥ करूनी ओंकाराचा उच्चार, । यज्ञदानतपक्रियांचे प्रकार । प्रवर्तती, म्हणे सर्वेश्वर; । प्रत्यक्ष सदाचार दाखवी. ॥ २७५ ॥ कीं, ब्राह्मण, वेद, यज्ञ सकळ । उपजले, याचें हें त्रिविध नाम बोलिलें मूळ, । याच नामेंकरूनी सांग सकळ । क्रिया होती अवघिया. ॥ २७६ ॥ एवं ओंकारेंची ब्राह्मण । उपनयनें पावले ब्राह्मणपण, । द्विजंत्वसंस्कारलक्षण, । यज्ञ प्रवर्तती वेदवादियांचे. ॥ २७७ ॥ ऋग्वेदी म्हणती ऋग्वेदवादी, । यजुर्वेदी यजुर्वेदवादी, । सामवेदी सामवेदवादी, । ऐसेची अथर्वणादि भेद शाखांचे. ॥ २७८ ॥ ऐसिया ब्रह्मवादियांचिया । उपनयनादि यज्ञक्रिया । ब्राह्मण्यसंपादका धनंजया! । क्रिया प्रवर्तती उच्चारूनी ओंकार. ॥ २७९ ॥ कीं ब्राह्मण निर्मिले देवें । 'ओम् तत् सत्' या त्रिविध निज नांवें, । आणि वेदही निर्मिले या प्रभावें, । वेदपठणही आधीं उच्चारूनी ओंकार. ॥ २८० ॥ आधीं ओंकार उच्चारिती. । मग वेदपाठक यज्ञ आरंभिती, । वेदवादियांच्या ये रीती । दिसती त्याच कारणास्तव. ॥ २८१ ॥ तैसेच यज्ञ विविध । त्यांस हेतु हें नाम त्रिविध, । हा अनादि कारणसंबंध । ऐची रीती. ॥ २८२ ॥ म्हणोनी ओंकार उच्चारिती, । मग यज्ञीं प्रवर्तती, । वेदवादियांचे ऐसे श्रीपती । तच्छब्दें सुचवी पूर्वसंबंध. ॥ २८३ ॥ आतां, दान, तप, इत्यादि क्रिया । यज्ञशब्दांतची आलिया, । या भावें त्रिविध नामें यज्ञ निर्मिले म्हणोनियां । पूर्वश्लोकीं बोलिला देव. ॥ २८४ ॥ या श्लोकीं त्या कारणास्तव । यज्ञदानतपक्रिया म्हणे देव । ओंकार उच्चारूनी मग सर्व । ब्रह्मवादियांच्या प्रवर्तती. ॥२८५॥ ब्रह्मवादी क्रिया प्रवर्तविती, । ऐसें म्हणावें, तेथें म्हणे श्रीपती । कीं यज्ञदानतपक्रिया प्रवर्तती । विधानोक्त ब्रह्मवादियांच्या. ॥ २८६ ॥ ऐसें बोलतां देव । सुचवी ऐसा भाव, । कीं हें प्रसिद्ध स्वयमेव, । जें त्रिविधनामें उत्पत्ति यांची. ॥ २८७ ॥ ज्या त्रिविध नामें निर्माण, । त्याच नामें प्रवर्तती, हें प्रमाण; । याल्यगीं अर्जुना! जाण । कीं या त्रिविध नामें उत्पत्ति यांची. ॥ २८८ ॥ याकारणें हें नामत्रय । न्यूनास पूर्ण करी हा निश्चय, । त्यांत ओंकार शब्दमय । प्रकट दिसतो. ॥ २८९ ॥ म्हणूनी आधीं हा प्रणवउच्चार । अनादि परंपरागत सदाचार । तुज कळावा, म्हणूनी तो प्रकार । 'प्रवर्तती' म्हणूनी तुज बोलिलों. ॥ २९० ॥ आतां तत्पद, । आणि जें सत्पद, । त्याच्या अर्थानुसंधानें विशद ।

१. झाले.

या क्रिया आचरती. ॥ २९१ ॥ त्याचा अनुभवप्रकार । म्यां सर्वज्ञें सांगावा विचार, । हा प्रसिद्ध प्रकट ओंकारोच्चार । तुजही ठाउका. ॥ २९२ ॥ म्हणूनी यज्ञदानतपःक्रिया । प्रणवोच्चारें प्रवर्तती, धनंजया! म्हणूनी प्रत्यक्ष आचार दाखवाया, । ऐसें तुज बोलिलों. ॥ २९३ ॥ आतां तत्पदें ये रीती । यज्ञादि क्रिया आचरती, । म्हणूनी सांगेन तुजप्रती; । या भावें बोलतो हा श्लोक. ॥ २९४ ॥

तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपः क्रियाः ।
दानक्रियाश्च विविधाः क्रियंते मोक्षकांक्षिभिः ॥ २५ ॥

अगा! तत्पदवाच्य ब्रह्म । तेंची यज्ञतपःक्रियाकर्म, । म्हणूनी मोक्षार्थी ज्ञानी परम, । फलाभिसंधि सोडूनी ते आचरती. ॥ २९५ ॥ ज्ञानी कर्म आचरती, । हे त्यांच्या कर्माचरणाची रीती, । जे कर्मी ब्रह्मची पाहती । ज्वालारूपांत अग्नि जैसा. ॥ २९६ ॥ तें जें तत्पद ब्रह्मनाम । त्या नामें कर्मी ब्रह्म । देखती, आणि, सोडूनी फलकाम, । यज्ञतपदानादि क्रिया आचरती. ॥ २९७ ॥ ते ज्ञानी, ज्यांस मोक्षाची इच्छा परम, । ते तत्पदेंकरूनीच ब्रह्म । कां कर्मी देखोनी करिती कर्म? । तरी 'ओं तत् सत्' या नामत्रयें उत्पत्ति कर्माची. ॥ २९८ ॥ त्यांत तत्पदवाच्य ब्रह्म । कां कर्मी देखोनी आचरती कर्म? । तरी मोक्षकांक्षा ज्यांस, ते परम । आत्मवेत्ते. ॥ २९९ ॥ ज्ञानदृष्टीकरूनी । कर्मी तत्पदवाच्य देखती, म्हणोनी । सिद्ध होतो यावरूनी । तत्पदीं कर्मी ब्रह्म हा अर्थ. ॥ ३०० ॥ कीं 'तत्' म्हणजे 'तें' म्हणावें, । तें अमुकें म्हणूनी जाणत्यानें जाणावे, । आणि 'तें' म्हणतां वेगळें गणावें । जाण त्याहूनी. ॥ ३०१ ॥ तरी जो जाणता, ज्ञानस्वरूप, । रूपातीत तो अरूप, । त्यावेगळें जडत्वरूप । जो बुद्धीकरूनी त्यास 'तें' म्हणतसे. ॥ ३०२ ॥ ते बुद्धीसही तें म्हणे, । तिच्या योगेंची तीस अन्वयत्वें जाणे, । आणि बुद्धि जड तीस बाणे । त्याचकरितां सचेतनत्व. ॥ ३०३ ॥ तथापि सत्ता जेथें, । द्रष्टेपण स्थापिलें तेथें, । प्रस्तुत बोलणें इतकेंची येथें, । कीं जें वेगळें, त्यास 'तें' म्हणूनी तो म्हणे. ॥ ३०४ ॥ एव द्रष्टा, जाणता, तो चैतन्य; । त्यावेगळें जड अन्य; । तत्पदें आधीं सामान्य । अर्थ, वेगळें चैतन्याहूनी जड, ऐसा होतसे. ॥ ३०५ ॥ ऐसें तत्पदें जड मात्र, । तें ब्रह्मनिर्देश नाम पवित्र, । कीं जडीं तें ब्रह्म सर्वत्र, । घटीं माती जे रीती. ॥ ३०६ ॥ हा अर्थ या श्लोकमध्यें मागें । वारंवार बोलिला श्रीरंगें, । अनुभवें, युक्तीनें, अंतरंगें, । श्रुतिसिद्ध

निर्णय जाला. ॥ २०७ ॥ कीं जगदुपादानकारण । घटीं माती ऐसें जडीं ब्रह्म पूर्ण, । अलंकारीं जैसें सुवर्ण, । पटीं तंतु, सागर तरंगीं. ॥ २०८ ॥ तेव्हां तो कुंभ म्हणतां माती, । तो नग म्हणतां सोनें पाहती, । तो पट म्हणतां तंतु दिसती, । ते तरंग म्हणतां दिसे सागर. ॥ २०९ ॥ ये रीती जडास द्रष्टा 'तें' म्हणे, । तो आपणच त्या रूपें ऐसें जाणे, । तेव्हां, 'तें' म्हणतां, बाणे । जडीं चिदात्मत्व. ॥ २१० ॥ तेव्हां जड नसे, । चित्स्वरूप ब्रह्मची असे, । एवं जडत्व म्हणणें दिसे । नामचीं चित्स्वरूपा ब्रह्माचें. ॥ २११ ॥ मातीचेंची नाम घट, । तंतूचेंची नाम पट, । सुवर्णाचें नाम मुकुट, । तैसें जड नाम ब्रह्माचें. ॥ २१२ ॥ जड ब्रह्माचें नाम, । तेव्हां ब्रह्मनामची कर्म, । तत्रापि ब्राह्मणवेदयज्ञादि धर्म । त्रिविध नामेंची निर्मिले. ॥ २१३ ॥ त्यांत ओंकाराचा उच्चार । प्रथम करिती, हा विचार । बोलोनी आतां तत्पदप्रकार । या श्लोकीं. ॥ २१४ ॥ कीं यज्ञतपःक्रिया, । 'तदिति' म्हणजे तत्‌नामक ब्रह्म म्हणूनियां, । करिजेताती, फळ टाकूनियां, । ज्यांस मोक्षाची अपेक्षा, त्या जनीं. ॥ २१५ ॥ तरी जैसा ओंकार, । तैसा नव्हे तत्पदाचा उच्चार, । यज्ञदानतपःक्रियादि प्रकार । "तदिति" म्हणजे करिती तत्पदवाच्य जाणोनी. ॥ २१६ ॥ तरी 'तत्' म्हणोनी हें जें नाम, या नामेंकरूनी । यज्ञ, दान इत्यादि क्रिया जाल्या, म्हणोनी । तत्पदवाच्य ब्रह्मची कर्म जाणोनी, । मोक्षाभिलाषी ज्ञानी आचरती; हा अर्थ. ॥२१७॥ तत्पदवाच्य ब्रह्म। कां यज्ञतपादि कर्म? । शंका ऐशी, यावरूनी हें अनुभवगम्य वर्म । बोलणें लागलें. ॥ २१८ ॥ कीं तत्पदें जडें सकळ, । तें ब्रह्मची, त्यांत वेदोक्त केवळ । कर्म उपजलें तत्पदमूळ, । तें तत्पदवाच्य ब्रह्म म्हणोनी यालागीं आचरती. ॥ २१९ ॥ ते मोक्षार्थी ज्ञानी । कर्म करिती ब्रह्म जाणोनी, । "ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ"[१] या वचनीं । चतुर्थाध्यायांत जैसें बोलिलें. ॥ २२० ॥ कोणी ज्ञानपरिपाकार्थ, । कोणी लोकसंग्रहार्थ, । अपक्व आणि पक्वही समर्थ, । कर्म करिती, ज्ञानी ये रीती. ॥ २२१ ॥ तेही आरंभिती कर्म, । प्रथम उच्चारिती प्रणव एकाक्षर ब्रह्म, । तें कर्म तत्पदवाच्य चित्स्वरूप परम । म्हणोनी आचरती. ॥ २२२ ॥ ऐसेंच सत्पदही देव । बोलेल, ज्यांस ब्रह्मानुभव, । तेंच सत्पदार्थवैभव । कर्मीं देखती, म्हणोनी. ॥ २२३ ॥ एवं ज्यांस नाहीं आत्मज्ञान, । तींहीं आइकोनी ऐसें अनुसंधान, । 'कर्म ब्रह्मची'

---

१. अ० ४, श्लो० २४.

म्हणोनी समाधान । मानूनी, ओंकार उच्चारूनी, आचरावें. ॥ ३२४ ॥ अंतीं 'ओं तत्सत्ब्रह्मार्पण' । म्हणोनी करावें कृष्णार्पण, । हा भाव दावी श्रीकृष्ण; । कीं अर्पणविधि मागें बहुधा बोलिला. ॥ ३२५ ॥ प्रस्तुत यज्ञतपक्रिया । आणि दानक्रिया विविधा अगा! धनंजया! । 'तदिति'. म्हणजे तत्पदवाच्य ब्रह्मची, म्हणोनियां, । जे मोक्षार्थी, तिहीं करिजेतें, देव म्हणे. ॥३२६॥ ऐसें तत्पदाच्या अर्थानुभवें । जें कर्म या श्लोकीं बोलिलें देवें, । हेंची सत्पदाच्या अर्थवैभवें । "कर्म चैव तदर्थीयं सदिति" ऐसें बोलेल. ॥ ३२७ ॥ यां तत्पदाचा एकची ऐसा अर्थ, । तो नेत्रकरसंकेतें समजला पार्थ, । अर्थ सत्पदाचे दोनी ते समर्थ । प्रथम बोलतो या श्लोकीं. ॥ ३२८ ॥

**पूर्वार्ध ॥ सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।**

अगा! तिहीं नांवांत जो सच्छब्द, तो । सद्भावीं आणि साधुभावीं योजतो, । 'तथा' म्हणजे तसा, त्याची क्रमें, बोलिजेतो । सच्छब्द प्रशस्त कर्मीं, देव म्हणे. ॥ ३२९ ॥ श्लोकार्थ इतकाच, परी । कळेल स्पष्ट जालियावरी, । दों अर्थीं म्हणतो हरी । सच्छब्द योजतो. ॥ ३३० ॥ एक सद्भावीं, । एक साधुभावीं, । विवरणें दोंहीचीं करावीं । ये रीती. ॥ ३३१ ॥ 'आहे' म्हणावे जेथें, । सच्छब्द बोलावा तेथें, । विचारितां अध्यात्मशास्त्रीं येथें, । ब्रह्मची आहे, नाहीं जड जग. ॥ ३३२ ॥ ज्याकरितां जें प्रकाशतें, । तें प्रकाशकची त्या दोहींत आहेसें दिसतें, । कीं सोनेंची आहे नुसतें, । ज्याकरितां प्रकाशतो अलकार. ॥ ३३३ ॥ नाहींच तो अलकार, । सोनेंची आहे निर्विकार, । असद्भाव तो आकार, । सद्भाव सोनें. ॥ ३३४ ॥ असद्भाव जड चराचर, । सद्भाव ब्रह्म परात्पर, । त्या सद्भावीं म्हणे सर्वेश्वर । सच्छब्द योजतो. ॥ ३३५ ॥ सच्छब्दें सत्य । असच्छब्दें असत्य, । सत्य असे, नसे असत्य, हें पाडित्य । सच्छब्दाचें सत्यत्वीं. ॥३३६॥ सत्य तें, जें असे, । असत्य तें, जें नसोनी दिसे, । अतएव सच्छब्दें ब्रह्म गवसे, । वेदही ऐसेंची बोलती. ॥३३७॥ एवच ब्रह्मभाव तो सद्भाव, । जडभाव तो असद्भाव, । विचारितां जडीं लागतो अभाव, । सद्भाव ब्रह्मीं लागतो. ॥ ३३८ ॥ कीं ब्रह्मीं सत्यत्व असे, । म्हणोनी सद्भाव ब्रह्मीं गवसे, । त्या सद्भावीं योजतां, ऐसा दिसे । सच्छब्द. ॥ ३३९ ॥ अर्थ ऐसा एक, । स्वयें बोले शेषपर्यंक; । अर्थ दुसरा तोची श्रीवत्सांक । बोलतो, कीं साधुभावींही योजतो. ॥ ३४० ॥ साधुभाव म्ह-

---

१. पुढें श्लोक २७.

णजे बरा भाव, । तो बरा भाव म्हणावा साधुभाव, । ऐशा साधुभावींही म्हणे देव । सच्छब्द तो योजतो. ॥ ३४१ ॥ आतां, हे दोनी अर्थ । सत्कर्मीं लागती जे रीतीं यथार्थ, । ते रीती उत्तरार्धें आणि उत्तरश्लोकीं समर्थ । बोलतसे. ॥ ३४२ ॥

**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥**
**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥**

प्रशस्तकर्मीं पार्था ! तैसा । सच्छब्द योजतो, कीं जैसा । क्रमें द्विविध बोलिलों, ऐसा । तथा सच्छब्दें पूर्वोक्तां दों अर्थांचा क्रम सुचवी. ॥ ३४३ ॥ आधीं योजतो म्हणे सद्भावीं, । मग योजतो म्हणे साधुभावीं, । त्या क्रमेंची कर्मांचिया दों भावीं । दोन्ही अर्थ योजिती. ॥ ३४४ ॥ त्या क्रमें प्रशस्तकर्मीं । सच्छब्द योजतो, म्हण स्वामी, । तरी प्रथम सच्छब्दाचा सद्भाव अर्थ ब्रह्मीं । योजिला. ॥ ३४५ ॥ तेव्हां प्रशस्तकर्मीं ब्रह्म, । अर्थ ऐसा बोले पुरुषोत्तम, । एवंच ब्रह्मरूप देखणें कर्म, । प्रशस्तकर्मीं सच्छब्द ऐसा योजला. ॥ ३४६ ॥ प्रशस्त म्हणावें तें कर्म, । जें करिती ज्ञानी निष्काम, । त्या कर्मीं जें सद्भावार्थरूप ब्रह्म, । तें सच्छब्दें योजतें. ॥ ३४७ ॥ हाच अर्थ याचा, परी । दुसरा सच्छब्दार्थ बोलिल्याउपरी, । उत्तरश्लोकीं उत्तरार्धीं हरी । स्पष्ट बोलेल. ॥ ३४८ ॥ **"कर्म चैव तदर्थीयं सदित्येव । अभिधीयते"** म्हणेल देव, । प्रस्तुत दुसरा सच्छब्दार्थ देवाधिदेव । उत्तरश्लोकीं पूर्वार्धीं बोलतसे. ॥ ३४९ ॥ कीं, यज्ञ, तप, दान, । इत्यादि सर्वही सत्कर्मानुष्ठान, । त्याच्या अनुष्ठानीं स्थिति–मनःसमाधान- । तेंही **'सत्'** ऐसें बोलिजेतें. ॥ ३५० ॥ म्हणजे साधुभावीं सच्छब्द । म्हणूनी दुसरा अर्थ बोलिला गोविंद, । तो कर्मांचियाही दुसरिया भावीं विशद । सच्छब्द साधुभावार्थरूपें योजतो. ॥३५१ ॥कीं **'तथा'** म्हणोनी । जैशा क्रमें बोलिलों, तैशा क्रमेंकरूनी । प्रशस्तकर्मीं योजतो सच्छब्द, म्हणे, त्यावरूनी । साधुभावाचा अर्थ दुसरिया भावीं कर्मांच्या. ॥३५२॥ सच्छब्दाचे अर्थ बहुत, । त्यांत दोनीच बोले अच्युत, । ते **'तथा'** म्हणोनी यथाक्रमें भगवंत । दोनी अर्थ दों कर्मभावीं बोलिला. ॥ ३५३ ॥ आतां सद्भावीं सच्छब्द प्रथम, । प्रशस्त कर्मीं योजतो, हें वदला सर्वोत्तम, । त्याचा अर्थ 'सत्कर्मीं सद्ब्रह्म । देखणें' ऐसा लागला. ॥ ३५४ ॥ परंतु सच्छब्देंही जें जडाभासरूप ब्रह्म, । तेंनी ब्रह्म म्हणूनी, फळ टाकूनी, करिती

कर्म, । '**तदिति**' या श्लोकीं बोलिला **पुरुषोत्तम**, । तोची हा अर्थ, ऐसी पुनरुक्ति लागली. ॥ ३५५ ॥ यालागीं ह्मणी । प्रथम **सच्छब्दाचा** अर्थ कोणी । इतर अर्थीं वाखाणिती, म्हणूनी **चक्रपाणी**, । 'तोची अर्थ हा,' ऐसें बोलतो. ॥ ३५६ ॥ या श्लोकाच्या उत्तरार्धेकरूनी । त्याच अर्थीं **सच्छब्द** बोलिजेतो, म्हणोनी । बोलतो, आणि सुचवितो ऐसें यावरूनी, । कीं **ब्रह्म** नामत्रयेंच उपजलें सत्कर्म. ॥ ३५७ ॥ त्यांत जो **ओंकार** । त्याचा आरंभींच बोलिला उच्चार, । **तच्छब्दें सच्छब्दें** तें **ब्रह्म** सर्वाधार । कर्मीं पाहावें ज्ञानियांनीं. ॥ ३५८ ॥ या भावेंकरूनी । **तच्छब्दार्थाचें** कर्म तेंची '**सत्**' म्हणोनी, । ऐसें मनीं धरूनी । बोलतसे उत्तरार्ध. ॥ ३५९ ॥

**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥**

अगा! तदर्थी जें कर्म, । तें सत् म्हणूनीच बोलिजेतें, म्हणे **सर्वोत्तम**, । '**तदर्थीयं**' म्हणजे **तच्छब्दार्थाचें** जें उत्तम, । तेंही सद्ब्रह्मचि बोलिजेतें. ॥ ३६० ॥ **तच्छब्दाचा** जो अर्थ, । तो म्हणावा '**तदर्थ**,' । त्या तदर्थाचें जें काय बोलणें, तें यथार्थ । '**तदर्थीय**' म्हणूनी म्हणावें. ॥ ३६१ ॥ तरी प्रस्तुत बोलणें कर्म, । तें तदर्थाचें जें '**तदिति**' या श्लोकीं बोलिला **सर्वोत्तम**, । कीं यज्ञादि क्रिया '**तदिति**' म्हणजे **तच्छब्दार्थ ब्रह्म**, । ऐसें जाणोनी मोक्षार्थी करिती, फल टाकूनी. ॥ ३६२ ॥ एवंच **तच्छब्दवाच्य ब्रह्म** । तेंची हें यज्ञदानतपक्रियाकर्म, । ऐसें जें केलें कर्म उत्तम, । तें तदर्थीयही '**सत्**' म्हणूनीच म्हणिजेतें. ॥ ३६३ ॥ म्हणजे **तच्छब्दें ब्रह्म** । तेंच म्हणूनी जें केलें कर्म, । तेंही **सच्छब्दवाच्यच** परम । **ब्रह्म** ऐसें बोलिजेतें. ॥ ३६४ ॥ हें पुनरुक्ति न कळत । अगा! अर्जुना! म्यां नाहीं बोलिजेत, । दोंही नामेंकरूनी निश्चित । 'कर्म **ब्रह्म**' म्हणूनी अनुभवें ज्ञानी पाहती. ॥ ३६५ ॥ ऐसें हें नामत्रय, । त्यांत ज्ञानी कर्म **ब्रह्ममय** । पाहती, आचरती, ऐसा निर्णय । साधारणीं "**ओं तत् सत् ब्रह्मार्पण**" म्हणावें. ॥ ३६६ ॥ व्याख्यान या नामत्रयाचें ये रीती, । याचे अर्थ आणखीही बोलती, । परंतु मुख्य अर्थ होतां, झांकती । इतर अर्थ. ॥ ३६७ ॥ **ब्रह्मांचीं** नामें तिनी, । त्यांत **प्रणव** आधीं उच्चारुनी, । कर्में करिती, म्हणूनी । **देवें**ची ऐसें निवडिलें अतिस्पष्ट. ॥३६८॥ उरलीं नामें दोनी, । तीं मोक्षार्थी **तच्छब्दापासूनी**, । '**तदिति**' यज्ञ दान तप आचरती, म्हणूनी । **देव** बोलिला. ॥ ३६९ ॥ सोनें म्हणूनी नग पाहती, । याचा अर्थ येची रीती, । कीं सोनें ज्याचें नाम तेंची लक्षिती, । नाममात्र पाहती न म्हणावें. ॥३७०॥ आणि म्हणे मोक्षार्थी तेव्हां ते ज्ञानी, । मोक्षार्थी

म्हणजे ज्ञानपरिपाकार्थ कर्मी ब्रह्म लक्षूनी। आचरती, ते सत्पदेंकरूनी। नामद्वयार्थ कर्मी पाहती ब्रह्म. ॥ ३७१ ॥ त्यांत सच्छब्दाचे अर्थ दोनी, । ते दोंपरी कर्मी लावूनी, । 'तथा'-शब्दें क्रमेंचीकरूनी । आधीं सद्भाव, मग साधुभाव, कर्मी लाविला. ॥ ३७२ ॥ तो जैसा तच्छब्दार्थ, । तैसाच जाला सच्छब्दार्थ, । तरी दोहींचा एकची तत्त्वार्थ, । म्हणूनी शेवटीं सिद्ध केलें. ॥ ३७३ ॥ ऐसा अनुभवसिद्ध अर्थ, । आणि 'तथा'शब्द नव्हतां व्यर्थ, । आणि 'सदित्येव' हा एवशब्द कृतार्थ । होऊनी अनुभवार्थ मुख्यार्थ तोच बरा. ॥ ३७४ ॥ प्रथम व्याकरणसिद्ध, । तदुपरि प्रमाणप्रसिद्ध, । आणि आत्मानुभवसमृद्ध, । तोच मुख्यार्थ या अध्यात्मशास्त्रीं. ॥ ३७५ ॥ इतर अर्थ कांहीं संमत, । आणि कांहीं असंमत, । ते दूषितां ग्रंथ अत्यंत । वाढतो, तें असो. ॥ ३७६ ॥ ऐसें हें प्रकरण । नामत्रयाचें विवरण । बोलिला विश्ववंद्यचरण । कर्मी अंगहीनादि दोषपरिहारार्थ. ॥ ३७७ ॥ कीं हरिनामें कर्म सांग सफल, । हरिनामें कर्म निर्मळ, । हरिनामें कर्म ब्रह्म दाखवी केवळ, । चित्तशुद्धि करूनी. ॥ ३७८ ॥ त्यांत हीं तिनी । नामें गहनभावेंकरूनी । बोलिलीं, कीं या जातीचींच नामें म्हणोनी । त्रिविधत्व सुचविलें नामाचें. ॥ ३७९ ॥ वेदाचें मूळ ओंकार, । वेदार्थवाचकें नामें अपार, । गोविंद, गोविदांपति, वेदवेद्य, इत्यादिप्रकार । ओंकारीं आटला. ॥ ३८० ॥ तच्छब्दें जडांश चित्रविचित्र, । सृष्टिस्थितिप्रलयचरित्र, । ज्या ज्या नामीं, तें तें नाममात्र । तच्छब्दीं आटलें. ॥ ३८१ ॥ कीं जडाचाच कर्ता, । जडजगपालक म्हणोनीच स्थितिवार्ता, । जडाचाच संहर्ता, । द्रष्टा साक्षी जडाचाच. ॥३८२॥ जड जगीं वसे वासुदेव, । मथी जडसमुद्रची देव, । जड मंदर धरी देवाधिदेव । उचली जडाच गोवर्धनातें. ॥ ३८३ ॥ जडा वृंदावनीं वास, । जड जगीं जगन्निवास, । इत्यादि लीला नामास । तच्छब्दीं अवसान सुचविलें. ॥ ३८४ ॥ सच्छब्दें स्वरूप निखळ, । सच्चिदानंद, आत्मा, परमात्मा इत्यादि सकळ । नामाचा पसारा ज्यांत चिन्मात्र केवळ, । तो सच्छब्दीं आटला. ॥ ३८५ ॥ एवंच सगुण ब्रह्म । जो गीता उपदेशी पुरुषोत्तम, । त्याचें हें नामत्रय उत्तम । सर्व नामें सुचवी. ॥ ३८६ ॥ ऐसा रहस्यार्थ न कळे, । बुद्धि हरिनामनिष्ठेंत न वळे, । त्यांचीही वाचा नामीं आदळे । या प्रसंगीं तरी ऐसा भावार्थ. ॥ ३८७ ॥ कीं या प्रसंगें तरी वाणी । उच्चारो 'चक्रपाणी,' । म्हणोनी अर्जुनरथहयरश्मिपाणी । वैखरी पुराणीं ऐसी बोलिला. ॥ ३८८ ॥ कीं भक्तिहीन नर । कोणी कर्ममात्रीं तत्पर, । तेही 'ओंतत्सत्'

ऐसें नामत्रयाक्षर. । म्हणोत आणि कर्म तरी सांग त्यांचें हो; हा भाव. ॥३८९॥ परंतु त्यांमध्यें श्रद्धधान जे का नर, । तेची या गोष्टीस होतील तत्पर, । अश्रद्धधान नर ते वानरखर, । व्यर्थ त्यांची सत्क्रिया. ॥ ३९० ॥ म्हणोनी या भावें देव । अध्यायसमाप्ति करितां देवाधिदेव । ऐसें आतां बोलतसे वासुदेव । या श्लोकीं. ॥ ३९१ ॥

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥**

श्रद्धेवांचूनी होमिलें, दिधलें, तप केलें, । अथवा जें कांहीं सत्कर्म केलें, । तें **असत्** म्हणजे वाईट बोलिलें, । अगा ! **पार्था** ! ॥ ३९२ ॥ तें फळ नेदी मेलियाउपरी, । अथवा जीवंतही आहे जोंवरी, । ईश्वरप्रसादास हेतूही न करी, । व्यर्थची तें सर्व. ॥ ३९३ ॥ सर्वांस कारण **पार्था** ! । श्रद्धा असावी सर्वथा, । अश्रद्धेनें केलें तितुकें वृथा, । म्हणे **देवाधिदेव**. ॥ ३९४ ॥ ऐसा अध्याय सप्तदश, । ज्यांत श्रद्धात्रयाचा उपदेश । करिता जाला हृषीकेश । तोची कर्ता टीकेचाही. ॥ ३९५ ॥ जो जगीं **गीताकार**, । तोची स्वयें **टीका**कार, । विजयी मारूनी **कौर**वांचा भार, । तैसा **टीकाकार वामनही**. ॥ ३९६ ॥ **कौर**व मारूनी दावी, । तोची अर्जुनहस्तें मारवी, । **वामनमुखें** तैसी करवी । टीका तोची **विश्वतोमुख**. ॥ ३९७ ॥ आतां बोलोनी काय फार ? । श्रीकृष्णची **यथार्थदीपिकाकार**, । त्याच्या चरणीं समर्पावा हा व्यापार । आणि समर्पणार तोची, **वाम**नरूपें तोची म्हणे. ॥ ३९८ ॥ **वामन** अर्पी चरणीं, । तों हृदयकमळीं ठेवी **चक्र**पाणी, । म्हणे जैसी बोलिली माझी वाणी, । तैसीच वाखाणिली हे गीता. ॥ ३९९ ॥

---

## अध्याय अठरावा.

जय[2] जयाद्वय ! । जय जयाव्यय ! । जय जयानन्याश्रय ! । सर्वाश्रय ! श्री-भगवान् ! ॥ १ ॥ जय जय निगममूल ! । जय जयाशेषमूलामूल ! । जय जय स्वजनानुकूल ! । **पार्थरथहयरश्मिपाणे** ! ॥ २ ॥ जय जय परमसंन्यास ! । जय जयाशेषकाम्यन्यास ! । जय जयाखिलकर्मविन्यास ! । जगद्विन्यास ! श्रीगुरो ! ॥ ३ ॥

---

१. या अध्यायाचें '**श्रद्धात्रयविभागयोग**' असें नांव आहे. २. या ओवीपूर्वी पुढील गद्य-मंगलाचरण आढळतें:—श्रीमते भगवत्तमाय सर्वोत्तमाय श्रीवत्सांकाय शेषपर्यंकाय श्री-कृष्णाय नमः ॥

जय जयानादिगुरो ! । जय जयाद्यपरमगुरो ! । जय जय चरमदेह ! चरम गुरो ! । परमपरम ! ॥ ४ ॥ जय जय **पांडु**पुत्रदूत ! । जय जय **पांडु**पुत्रसूत ! । जय जय स्वजनकल्याणजीमूत ! । **दे**वकीसुत ! श्रुतिगम्य ! ॥ ५ ॥ जय जय कम-लानायक ! । जय जय कमलाकमलसायक ! । जय जय कमलासनज्ञानदायक ! । जगन्नायक ! जगदात्मन् ! ॥ ६ ॥ जय जय सनातन ! । जय जय नित्य ! नूतन ! । जय जय पुरुहूत ! पुरातन ! । पुराणपुरुष ! पुण्यगते ! ॥ ७ ॥ जय जय पुण्यापुण्यबंधहर ! । जय जयानाद्यविद्याबंधसंहर ! । जय जय गोपीमनोहर ! । **दा**मोदर ! सत्पते ! ॥ ८ ॥ जय जय चक्षुरादिगोपाल ! । जय जय, भूमन् ! ऋगादिगोपाल ! । जय जय **नं**दनंदन ! **गो**पाल ! । **'न मे भक्तः प्रणश्यती'**ति गोपाल ! । पाहि, पाहि. ॥ ९ ॥ होसी तूं देवाधिदेव, । होसी तूं देवदेव, । होसी तूं एकची देव **वा**सुदेव, । कीं सदैव मज केलें. ॥ १० ॥ पाषाणाची नाव केली, । ते जगासी तारूं लागली, । स्वयें बुडणार, त्यास दिधली । तारकशक्ति, **दे**वदेवा ! ॥ ११ ॥ जें जें तुझें अद्भुत, । तें काय बोलों बहुत, । नश्वर प्रपंच होऊनी, अच्युत । अविनाशी तूं स्वयें. ॥ १२ ॥ होऊनी नाना-रूप । तूं मागुती अरूप, । कालत्रयीं सारिखा चित्स्वरूप, । स्वयें तूं जड प्रपंच होऊनीही. ॥ १३ ॥ नवल तैसाची हाही विक्रम, । कीं **वामन** केला त्रिविक्रम, । **गी**ताव्याख्यान आक्रम । मज मूढास दिधला. ॥ १४ ॥ सृष्टि-स्थितिप्रलयादि कार्य । ज्याच्या संकल्पमात्रें, तो तूं **वि**धीचा आर्य, । तोची तूं स्वयें माझा आचार्य, । ऐश्वर्य माझें अतर्क्य, देवा ! ॥ १५ ॥ नामें आणि रूपें । तूं **सच्चिदानंद**स्वरूपें । मजनिमित्त रूप अरूपें । प्रगट केलें **मलय**-पर्वतीं. ॥ १६ ॥ दों मुहूर्त्तांची संगती, । परी अनाद्यनत अनन्यगती । जा-लासि आणि बहुतां जनांतें सद्गती । या मुखें देसी तूं **वि**श्वतोमुख. ॥ १७ ॥ तूंची बोलसी हे बोल, । परी अष्टादशाध्यायार्थ खोल । त्या ज्ञानसागरांतूनी अमोल । रत्नकदंब या रूपें काढों पाहसी. ॥ १८ ॥ म्हणूनी भ्रूनयनसंकेत । दाविसी घननीळ **श्री**निकेत, । आतां पूर्वानुसंधानसमवेत । पुढें **यथार्थदी-पिका** चालवावी. ॥ १९ ॥ चाले· **यथार्थदीपिका** जिकडे, । यथार्थ **गी**-

---

१. भक्तांवर कल्याणाचा वर्षाव करणाऱ्या मेघा ! २. लक्ष्मीचे कटाक्ष बाण ज्यावर आहेत अशा ! ३. महादेवास ज्ञानोपदेश करणाऱ्या. ४. डोळे इत्यादि इंद्रियांच्या स्वामी ! ५. ऋग्वेदादि वाणीच्या पते ! ६. विश्वपते ! ७. भाग्यशाली. ८. खुजा, ठेंगू; (पक्षीं) वामनपंडित. ९. विश्वव्या-पक. १०. पिता. ११. वामनपंडितांना मलयाचलावर भगवान् 'सच्चिदानंद' यतिरूपानें भेटले व त्यांनींच पंडितांना तेथें गुरूपदेश केला. (पहा निगमसार, अध्याय १.)

तार्थ उघडे तिकडे, । निर्मत्सरांचिया दृष्टी पडे, । सांपडे अबाधित अचुंबितार्थ. ॥ २० ॥ शीघ्र टीकासमाप्तिप्रतिज्ञा, । तदनुरूप हे आज्ञा, । कीं वरकड बोलणें ठेवूनी, आधीं प्रज्ञा । टीकेकडे लावावी. ॥ २१ ॥ स्वयें आज्ञाकार । भगवंत गीताकार, । स्वयें गीता, स्वयें टीकाकार, । तुम्हीही श्रोते हे तो स्वयें. ॥ २२ ॥ आतां करितो अर्जुन । आधीं संन्यास आणि त्यागतत्वाचा प्रश्न, । त्या प्रश्नहेतूविषयीं वचन । पूर्वानुसंधानें बोलावें. ॥ २३ ॥ द्वितीयाध्यायापासूनी भगवंत । सप्तदश अध्यायपर्यंत । स्वस्वरूप सत्य ज्ञानानंत । वेदांतगुह्य उपदेशिता जाला. ॥ २४ ॥ तों शंकला अर्जुन मनीं, । कीं हें श्रवण करावें संन्यासियांनीं, । श्रुति **"संन्यस्य श्रवणं कुर्यात्"** म्हणोनी । श्रवण यतीतें बोलते. ॥ २५ ॥ तरी आपण नव्हे संन्यासी, । स्त्रीपुत्रराज्ययुक्त गृहवासी, । गृहस्थधर्मीं या श्रवणासी । मी अधिकारी केंवी जालों ? ॥ २६ ॥ आणि मीच नव्हे एकला, । जनक जितांची मोक्ष पावला, । संन्यास त्यासही नाहीं ऐकिला, । ऐसाची ज्ञानी गृहस्थ याज्ञवल्क्य. ॥ २७ ॥ जो ऐसा याज्ञवल्क्य, तया । वेदीं प्रसिद्ध मैत्रेयी गार्गी या स्त्रिया; । वसिष्ठ उपदेशी वेदांत श्रीरघुराया, । अरुंधतीचा जो पती. ॥ २८ ॥ इत्यादि गृहस्थ जन । वेदांतशास्त्रश्रवणें जगत्पावन । जाले, आणि वेदवचन । **'संन्यस्य श्रवणं कुर्यात्'** म्हणोनी. ॥ २९ ॥ व्यास वेदांतसूत्रकार, । स्वयें सर्वेश्वर गीताकार, । वेदांतप्रवृत्ति गीतानुसार, । गीताविरुद्ध तो वेदांतची म्हणवेना. ॥ ३० ॥ गीता गुह्य वेदांत । मज वदला रमाकांत, । आणि मी तों सुभद्राकांत, । संन्यासी नव्हे सर्वथा. ॥ ३१ ॥ आतां आम्हां गृहस्थांस जन्मांतरीं । संन्यास होता, यापरी । समाधान मानूं अंतरीं, । तरी श्रुत्यर्थ ऐसा योजेना. ॥ ३२ ॥ कीं **'संन्यस्य'** म्हणोनी । श्रुति बोले या पदेंकरूनी, । पूर्वजन्म संन्यास कल्पूनी । श्रवणयोग्यता कैसी बोलवेल ? ॥ ३३ ॥ ऐसा अर्जुन शंकला, । आणि विचारितां हाची पक्ष सिद्ध जाला, । कीं जन्मांतर सन्यास जन्मांतरींच गेला, । तो कामा नये या जन्मीं. ॥ ३४ ॥ जन्मांतरउपनयन । करावया वेदाध्ययन । योग्य करी, तरी वेदांतश्रवणमनन । जन्मांतरसंन्यासें घडों शके. ॥ ३५ ॥ जैसें **'स्नात्वा भुंजीयात्'** म्हणोनी, । तैसें **"संन्यस्य श्रवणं कुर्यात्"** या तीहीं पदेंकरूनी, । वेद म्हणे, 'श्रवण करावें संन्यासी होउनी,' । पूर्वदिनस्नान तैसा पूर्वजन्मसंन्यास. ॥ ३६ ॥ सोवळें होऊनी जेवावें, । तरी विटाळ होतां पुन्हा सोवळें व्हावें, । सोवळेपणास भोजनास न पडावें । मध्यें अंतर. ॥ ३७ ॥ 'बैसोनियां

निजावें,' । या वचनें सद्य बैसावें, । आणि त्याउपरी जैसें' निजावें, । तैसा संन्यास घेऊनी श्रवण कर्तव्य. ॥ ३८ ॥ बैसलोंच होतों पहिलें, । म्हणोनी, जो उभा, त्याणें आंग टाकिलें, । तों त्याचें डोकें फुटलें, । गात लागोनी बाजेचें. ॥ ३९ ॥ 'अन्न खाऊनी पाणी प्यावें,' । हें वैद्याचें वचन ठावें, । तरी काय कालचें आठवावें, । पाणी पितां, भोजन? ॥ ४० ॥ अन्न नसे पोटीं, पाणी । पितां कष्टी होणार प्राणी; । गतदिनभोजनाची काहाणी । कामा नये. ॥ ४१ ॥ हा संन्यासाचा बडिवार । केला सन्यासियांनीं फार । कीं जनकादिकां गृहस्थां अधिकार । श्रवणीं देखिला. ॥ ४२ ॥ तेव्हां आश्रमसंन्यास अगत्य । श्रवणास पाहिजे, हें जालें असत्य; । म्हणूनी केलें पांडित्य । श्रुतीच्या बळें. ॥ ४३ ॥ कीं जन्मांतरसंन्यास । होता म्हणूनी जनकादिकांस । अधिकार झाला श्रवण करायास । गृहस्थपणीं. ॥ ४४ ॥ असो तें प्रस्तुत । अर्जुन शंकला बहुत, । कीं 'संन्यासावांचूनी अच्युत । अध्यात्मश्रवण करवितो मजला. ॥ ४५ ॥ तों पंचमादि अध्यायात । गृहस्थधर्मीच भगवंत । संन्यास बोलिला तो हृदयांत । आठविला अर्जुनें. ॥ ४६ ॥ कीं कर्मफळीं अनाश्रित, । आणि करावें तें करी वेदविहित, । तो **संन्यासी,** तोची **कर्मयोगी** निश्चित, । ऐसा श्लोक षष्ठाध्यायआरंभीं. ॥ ४७ ॥ तो संन्यास आठवला, । परंतु शंकित पुन्हा जाला, । कीं कर्मयोगांत देखिला । संन्यास. ॥ ४८ ॥ तेव्हां कर्ममूळ संन्यास । उपयोगी मोक्षमार्गास, । ऐसें वाटतां अर्जुनास । **"न कर्मणा न प्रजया"** हे श्रुति आठवली. ॥ ४९ ॥

श्रुति—**न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ॥**

कर्में नव्हे अमृतत्व, । अथवा संतानवृद्धीनें न कळे मोक्षाचें तत्त्व, । अथवा जालें सधनत्व, । तरी दानधर्मे मोक्ष नव्हेची. ॥ ५० ॥ मोक्ष एका त्यागें म्हणोनी । श्रुति बोले ये रीतीकरूनी, । आणि एका त्यागेंची मोक्ष म्हणे, यावरूनी । त्याग आणि सन्यास अर्थ एक. ॥ ५१ ॥ आणि कर्मीच संन्यास । पंचमीं षष्ठीं वदला विस्तारें श्रीनिवास; । श्रुति, कर्मास उडवूनी, त्यागास । मोक्षप्रधानांग बोलते. ॥ ५२ ॥ कर्मांचें फळ चित्तशुद्धी, । मग संन्यासें श्रवणाधिकारसिद्धी, । आणि कर्मीच संन्यासाची समृद्धी । देव गीतेंत बोलतो. ॥ ५३ ॥ तरी त्याग संन्यासाहुनी । वेगळाची असेल, म्हणोनी । गीता आणि श्रुति विरोध परिहरूनी । मानिता जाला. ॥ ५४ ॥ परी **'संन्यस्य श्रवणं कुर्यात्'** हे श्रुती । काय संन्यासाश्रमाप्रती । बोलते, कीं जो

---

१. अध्याय ५, श्लोक १–२, ६, १३ इ०.

कर्मीच संन्यास बोलिले श्रीपती, । हा संन्यास श्रवणाधिकारी बोलते. ॥ ५५ ॥ तरी संन्यास बहुतां रीती । श्रुति बोलती, आणि श्रीपती ! । यांत तत्त्व संन्यासाचें कोणतें? ये रीती । प्रश्न करूं, म्हणे, देवातें. ॥ ५६ ॥ आणि संन्यासाहुनी । त्याग वेगळा तो कोण ? म्हणोनी । प्रश्न करूं, ऐसें चिंतूनी । बोलता जाला अर्जुन. ॥ ५७ ॥

**संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥**

अर्जुन म्हणे, संन्यासाचें । जें काय असेल तत्त्व साचें, । तें मी जाणों इच्छितों, आणि त्यागाचें । तत्त्व तेंही जाणों इच्छितों. ॥ ५८ ॥ ऐसें अर्जुन बोलता झाला, । परी म्हणे, कीं, देव पुसेल मजला, । कीं, "कोण संदेह पडला तुजला ? । कीं संन्यासतत्त्व आयकोनी, मागुती पुससी. ॥ ५९ ॥ कीं संन्यास निष्कामकर्मीं । बोलिलों षष्ठीं, पंचमीं, । आणि तृतीयाध्यायांत सगुण ब्रह्मीं । अर्पितां, कर्मबंध न घडे, बोलिलों. ॥ ६० ॥ निष्काम आणि ईश्वरार्पित । त्या कर्मीं बंध नाहीं निश्चित, । तोची संन्यास बोलिलों, आणि पुन्हा अत्यंत । सादर 'तत्त्व जाणों इच्छितों, कां म्हणसी ? ॥ ६१ ॥ कोण संदेह तुजला । वाटला ? तो सांग मजला.' । तेव्हां संदेहनिवृत्तीच्या बोला । बोलेन मी." ॥ ६२ ॥ भगवंत बोलेल ये रीती, । म्हणूनी जाणे सुमती, । यालागीं बोलतो, जी हृषीकेशा ! तूं हृषीकपती । धणी चालक हृषीकां इंद्रियांचा. ॥ ६३ ॥ म्हणतां रथाचा चालवणार, । सिद्ध होतें कीं दोर अश्वांचे धरणार, । कीं दोरे धरूनी अश्वांचा फिरवणार, । तोची सारथि रथाचा. ॥ ६४ ॥ हृषीकें इंद्रियें । तीं फिरती बुद्धीच्या निश्चयें, । त्या हृषीकांचा चालक तोची स्वयें । बुद्धीचाही चालक. ॥ ६५ ॥ एवं हृषीकेश म्हणे । तोची बुद्धीचा चालक ऐसेंही जाणे, । म्हणूनी 'हृषीकेश' म्हणतां बाणे । खूण ऐसी देवातें. ॥६६॥ कीं, 'बुद्धीतें संदेह पडला, । तो वागिंद्रियद्वारा उघडला, । त्याचा साक्षी तूं म्हणूनी मजला । अर्जुन बोलतो.' ॥ ६७ ॥ देवास वाटो ये रीती । म्हणूनी हृषीकेश म्हणे त्याप्रती, । कीं संशययुक्त माझी मती । तें तूं हृषीकेश जाणसी; हा भाव. ॥ ६८ ॥ हेंही बोलोनी शंकला । कीं देव म्हणेल तत्त्वची तुजला । मी बोलिलों, आणि मागुती कां उपजला । संदेह अर्जुना ! ये रीती ? ॥ ६९ ॥ शंका होतां ये रीती, । म्हणों पाहे कीं संदेहांत चित्तवृत्ती । प्रवेशविली तुवांची, आणि निवृत्ती । तूंची करिशी तया संशयाची. ॥ ७० ॥ ऐसें जें स्पष्ट.

बोलावें, । तें न बोलतां, या भावें । भगवंताप्रति दों नांवें । आंळवितो अर्जुन. ॥ ७१ ॥ 'अगा! महाबाहो!' म्हणे अर्जुन, । आणि म्हणे, 'तूं केशिनिषूदन' । या दों नामीं तों भाव गहन । अर्जुन सुचवी. ॥ ७२ ॥ कीं नामें केशी म्हणोनी । दैत्य अश्वाचें रूप धरूनी । भगवंत गाई चारितां वृंदावनीं । आला सखा कंसाचा. ॥ ७३ ॥ तो अश्वरूपी विशाळ । पुच्छ फिरवी तेव्हां मेघजाळ । गुंडाळती तत्काळ । पुच्छास त्याच्या. ॥ ७४ ॥ त्याच्या हेषितें शब्देंकरूनी । देव पळती स्वर्ग टाकुनी, । तो कंसें धाडिला म्हणूनी येउनी । वृंदावनांत हिंसला. ॥ ७५ ॥ तें एकतां हेषित, । गाई पळाल्या भयभीत; । त्यासन्मुख येऊनी, अच्युत । म्हणे, 'कां पशूंस भय दाविशी'! ॥ ७६ ॥ दुष्टा तुझा गर्वपरिहार । मी भगवंत करणार.' । म्हणतां तो लोटला आणि अग्रपादप्रहर । करी श्रीवत्सयुक्त हृदयावरी. ॥ ७७ ॥ तें चुकवूनी, दोंही करीं, । अग्रचरण त्याचे हरी । धरूनी, त्यानें टाकी दूरी, । तों तो उठला, होऊनी मूर्च्छित. ॥ ७८ ॥ बळ कळलें अत्यंत । परी आकृतीनें लाहान वाटला भगवंत, । मग म्हणे, 'भांडतां हा बळवंत । मारील मजला. ॥ ७९ ॥ तरी याचा करीन कवळ, । गिळीन, मग काय याचें बळ? । बळवंत जरी प्रबळ । अत्यंत लहान आकृतीनें.' ॥ ८० ॥ संकल्प ऐसा करूनी, । धांवला जबडा पसरूनी, । अत्यंत निकट येउनी । गिळूं पाहे. ॥ ८१ ॥ तों त्याचें आयतें पसरलें तोंड, । त्यांत भगवंत निज बाहुदंड । घालितां, जाले खंड खंड । दंत गिरिशिखरांसारिखे. ॥ ८२ ॥ हिमाचलाची दरी थोर । तैसें मुखाचें तें विवर, । त्यांत बाहु भगवंताचा सत्वर । वाढला त्याच इतका. ॥ ८३ ॥ कोंडला प्राण, फुटलें पोट, । मांसचर्म करी तटतट, । कांकडी पिकोन निपट । उले, तैसा तो उलला. ॥ ८४ ॥ दैत्याचे मुखीं ऐसा थोर बाहू । क्षण न लागतां वाढला बहू, । तें स्मरोनी म्हणे, 'अगा! महाबाहू! । केशिनिषूदना!' ॥ ८५ ॥ कीं बाहू वाढवूनी जैसा । केशी मारिला, जगन्निवासा! । वृत्तिसंदेहांत माझ्या तूंच तैसा । प्रवेशवुनी, केशी मारिला तैसा परिहरिसी. ॥ ८६ ॥ एवंच तूंची संदेह उठविसी, । आणि तूंची त्यातें नाशिसी; । संदेह न उठे, तों कैसी । संदेहनिवृत्ति होणार? ॥ ८७ ॥ उत्पन्न करूनी क्षुधा, । मग देवा पाजिसी सुधा, । इत्यादि दृष्टांतें बहुधा । स्मरोनी, बोलिला हीं दोनी नामें. ॥ ८८ ॥ एवंच या श्लोकीं पार्थ । बोलिला हाची मथितार्थ, । कीं, 'संन्यासाचें आणि त्यागाचें यथार्थ । तत्त्व काय? तें जाणों

१. किंकाळण्यानें. २. किंकाळला.

इच्छितों.' ॥ ८९ ॥ तें **पृथक्** म्हणजे वेगळें वेगळें, । तत्त्व संन्यासाचें आणि त्यागाचें निराळें, । जाणों इच्छितों म्हणूनी **अर्जुनप्रश्नवाक्य** सगळें । इतकियासाठीं. ॥ ९० ॥ आतां यानंतर । या प्रश्नाचें उत्तर । देतसे **सर्वेश्वर** । **श्रीभगवान्.** ॥ ९१ ॥

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**

**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥**

श्री**भगवान्** षड्गुण । म्हणे, संन्यासतत्त्वाची हेची खूण । जाणती कविज्ञानी निपुण । कीं त्याग काम्यकर्मांचा. ॥ ९२ ॥ **"पुत्रकामो यजेत । स्वर्गकामो यजेत"** । ऐसें जें जें कर्म वेदविहित । तें कर्मची टाकणें तत्त्व संन्यासाचें. ॥ ९३ ॥ जे कवि ज्ञानी । ते जाणती हें संन्यासतत्त्व म्हणोनी, । कीं जनकादिक गृहस्थ होउनी । या संन्यासेंची योग्य जाले श्रवणातें. ॥ ९४ ॥ कीं शुद्ध चित्ताविण । त्याग हा करूं शके कवण ? । ऐसियासची योग्य श्रवण । वेदांताचें. ॥ ९५ ॥ **"संन्यस्य श्रवणं कुर्यात्"** म्हणोनी । हे श्रुति याच संन्यासेंकरूनी । श्रवण करावें म्हणे, कीं, चित्तशुद्धीवांचुनी । न घडे हा सन्यास. ॥ ९६ ॥ चित्त निष्काम होय जरी, । घडे काम्यकर्मत्याग तरी, । त्या त्यागाउपरी । अधिक तीव्र उपजे मुमुक्षा. ॥ ९७ ॥ तीव्र मुमुक्षा जयातें उपजे, । त्यातेंची आत्मतत्त्व उमजे, । वेदांतवाक्यार्थ समजे, । तयाच शुद्धचित्तातें. ॥ ९८ ॥ यालागीं ऐसा शुद्धचित्त, । श्रवण तोची करी मोक्षानिमित्त, । तोची संन्यासी, जो निवृत्त । काम्यांपासुनी. ॥ ९९ ॥ ऐसे जे कवी, । ते जाणती अनुभवी, । कीं, काम्यत्याग संन्यासपदवी । अधिकारी करी श्रवणातें. ॥ १०० ॥ ज्या श्रवणावरूनी **अर्जुन** शंकला, । कीं, संन्यासावीण आपणास कैसा अधिकार जाला ? । त्याचें उत्तर समजला, । कीं, या संन्यासें आपण श्रवणायोग्य. ॥ १०१ ॥ अन्यथा, जन्मांतरसंन्यासकल्पना, । ते विवेकियांच्या न ये मना, । **जनकादिकां** आश्रमसंन्यासाविना । श्रवणीं देखिला अधिकार. ॥ १०२ ॥ आणि संन्यास हाची खरा, । कीं याच करितां आश्रम चतुर्थ बरा, । शिखा बोडोनी, तोडिला दोरा, । आणि काम्य मनीं, तो नरक पावे संन्यासी. ॥ १०३ ॥ काम्य त्यागावांचुनी । आश्रम सन्यास उत्तम म्हणोनी, । कोण बोलेल ? यावरूनी । आश्रमसंन्यास गोमटा या संन्यासें. ॥ १०४ ॥ जरी काम्यत्याग केलियावरी । संन्यास आश्रम तदुपरी, । तरी काम्यत्यागी त्याची शिखादोरी । काय खाऊं मागते ? ॥ १०५ ॥ **जनकें** शिखा बोडिली, । कीं **अर्जुनें** दोरी

तोडिली ? । जन्मांतर संन्यासाची गोष्टी जोडिली, । प्रमाण त्यांस कोठें नसे. ॥ १०६ ॥ आश्रमसंन्यासाविना । काम्यत्यागसंन्यासें गृहस्था जना । अधिकार देखिला, कीं टाकितां कामना । आश्रमसंन्यासावांचूनी संन्यास. ॥१०७॥ तेव्हां आश्रमरूपही संन्यास । बरा, जरी असे काम्यसंन्यास; । आणि संन्यास काम्यत्यागरूप, यास । संन्यासपण चतुर्थाश्रमावांचूनीही. ॥ १०८ ॥ आतां वैराग्य उपजे जे दिनीं, । संन्यास घ्यावा तेच दिवशीं, म्हणोनी । श्रुति बोले त्याहीवरूनी । काम्यत्यागसंन्यासेंची गोड आश्रमसंन्यासें. ॥ १०९ ॥ तोही संन्यास । न देखिला विरक्त जनकास, । एवं पुन्हा विषयासक्त होऊं शकें यास । उपाय शिखासूत्रत्याग बोलिला. ॥ ११० ॥ एवं चतुर्थाश्रम परतंत्र, । काम्यत्यागसंन्यास स्वतंत्र, । इत्यादि अर्थशतांचें सूत्र । पूर्वार्ध या श्लोकाचा. ॥ १११ ॥ षष्ठाध्यायश्लोक प्रथम । तेथें म्हणे पुरुषोत्तम, । कीं, अनाश्रित कर्मफळीं आणि नित्यकर्म । करील तो योगी संन्यासीही. ॥ ११२ ॥ जो निरग्नि आश्रमसन्यासी, । आणि काम्य वसे मानसीं, । संन्यास पदवी नसे तयासी, । ऐसा षष्ठीं श्लोक प्रथम. ॥ ११३ ॥ या श्लोकाची टीका । पाहतां यथार्थदीपिका, । परिहरेल संशय तितका । येविषयीं. ॥ ११४ ॥ आश्रमसंन्यासाविना । श्रवणाधिकार असेना, । तदर्थ जन्मांतरसंन्यासकल्पना । हा चतुर्थाश्रमाचा बडिवार मात्र. ॥ ११५ ॥ जन्मांतरसंन्यास श्रुती, । अथवा बोलत्या स्मृती, । तरी ही गोष्टी सिद्ध होती; । उगाच जन्मांतरसंन्यास क्लिष्टकल्पना. ॥ ११६ ॥ आतां "**संन्यस्य श्रवणं कुर्यात्**" हे वेदवाणी, । तरी तिचा अर्थ बोलतो चक्रपाणी, । कीं, काम्यत्याग संन्यास आणि गांडीवपाणी । सुभद्रापति श्रोता गृहस्थ. ॥ ११७ ॥ वेदांतसूत्रवक्ता व्यास, । वक्ता गीतेचा जगन्निवास, । जो अधिकारी या श्रवणास । तोची वेदांतश्रवणास अधिकारी. ॥ ११८ ॥ गीतेस जें जें संमत, । तें तेंची वेदांतमत, । गीतानुरूप जो सिद्धांत, । तोची वेदांत जाणावा. ॥ ११९ ॥ एवंच गीताश्रवणीं अधिकार । गृहस्थासी देखिला श्रुत्यनुसार, । कीं काम्यत्याग संन्यास निर्धार, । तेव्हां हाची श्रवणाधिकार संन्यास श्रुति बोले. ॥ १२० ॥ इत्यादि भाव पोटीं । तों भगवंत म्हणे, अगा! किरीटी! । संन्यासाचें तत्त्व हेंची शेवटीं, । कीं, त्याग काम्यकर्माचा. ॥ १२१ ॥ हें कवि अनुभवी जाणती, । श्रवणाधिकार याच संन्यासें म्हणती, । या शब्दांत जगत्पती । सुचवी इत्यादि अर्थ. ॥ १२२ ॥ आतां ज्या प्रश्नाचें हें उत्तर । देता जाला सर्वेश्वर, । त्या प्रश्नांत पांडुकुमार । पुसे तत्त्व दों गोष्टींचें. ॥ १२३ ॥ एक तत्त्व संन्या-

सार्चे, । उत्तर त्याचें हेंची साचें; । दुसरें तत्त्व त्यागाचें, । अर्जुन म्हणे, जाणों इच्छितों. ॥ १२४ ॥ तरी व्यास म्हणावें संन्यास, । त्यागही म्हणावें त्यास, । व्याकरणसिद्ध उपन्यास । ये रीतीचा. ॥ १२५ ॥ परी मुमुक्षूंस दोंपरी । त्याग पाहिजे अंतरीं, । एक **काम्यत्याग,** दुसरा ईश्वरीं । कर्मे अर्पिता **फलत्याग.** ॥ १२६ ॥ त्यागाच्या ह्या दोनी रीती, । परी **"न कर्मणा न प्रजया"** हे श्रुती । त्यागेंची एका, म्हणे, म्हणती । अमृतत्त्व. ॥ १२७ ॥ तरी हे एका त्यागींच श्रुती । सुचवी त्यागाच्या दोन्ही रीती, । आणि म्हणे, कीं, 'म्हणती.' । तरी, 'म्हणती ते कोण?' हें विचारावें. ॥१२८॥ **"त्यागेनैके अमृतत्त्वमानशुः"** ऐसी श्रुती । म्हणे, 'त्यागेंची एका मोक्ष बोलती.' । 'बोलती' म्हणतां अवतार आणि ऋषि ये रीती । तात्पर्य श्रुतीचें. ॥ १२९ ॥ '**इतिहास** वेद पंचम' । ऐसें बोलती **निगम,** । त्यांत हे **गीता** स्वयें **पुरुषोत्तम** । मथितार्थ उपनिषदांचा बोलतो. ॥ १३० ॥ येथें **त्याग**-शब्दार्थ । देव बोलतो उपनिषदांचा मथितार्थ, । त्या उपनिषदांतीलची हे श्रुति, ज्या श्रुतीकरूनी **पार्थ** । त्यागविषयीं शंकला. ॥ १३१ ॥ कीं काम्य-कर्मत्याग । आणि ईश्वरार्पित कर्मयोग । तृतीयाध्यायांत बोलोनी **श्रीरंग** । संन्यास म्हणे या त्यागातें. ॥ १३२ ॥ एका त्यागीं त्याग दोनी । देव बोलिला सुचवूनी, । परी तो कर्ममूळ संन्यास म्हणोनी । **"न कर्मणा न प्रजया"** या श्रुतीनें **पार्थ** शंकला. ॥ १३३ ॥ कीं अमृतत्त्व न घडे कर्मेंकरूनी, । अमृ-तत्त्व एका त्यागेंची, म्हणोनी । श्रुति बोलते, यावरूनी । त्यागाचेंही तत्त्व जाणावें. ॥ १३४ ॥ परी **भ**गवंत बोलिला जो अर्थ, । तोची हे श्रुति बोलते परमार्थ, । एकवाक्यता नेणोनी **पार्थ** । तत्त्व पुसे त्यागाचें. ॥१३५॥ **"न कर्मणा"** म्हणे श्रुती, । तें काम्यकर्म; त्याग त्याचाच सांगे **श्री**पती । **"काम्यानां कर्मणां न्यासं"** म्हणे प्रस्तुतीं, । कीं, श्रवणाधिकार काम्यत्याग संन्यासें. ॥ १३६ ॥ तें काम्यकर्म करणें जोंवरी, । श्रवणाधिकारची न घडे तोंवरी, । यालागीं काम्यकर्म पडे दूरी । अमृतत्त्वास. ॥ १३७ ॥ **"न कर्मणा"** म्हणे श्रुती, । अर्थ त्याचा ये रीती, । या **गीतें**त कर्मकांडीं **श्री**पती । काम्यत्यागची बोलिला.' ॥ १३८ ॥ बोलोनी काम्यत्याग, । बोले ईश्वरार्पित कर्मयोग, । कीं, नित्य-कर्मांसही फलभोग । ईश्वरीं न अर्पितां. ॥ १३९ ॥ कीं कर्ममात्र गुणत्रयें । उपजे गुण तें बंधरूप स्वयें, । सत्त्वादिकां गुण म्हणती याच निर्णयें, । कीं, गुण नांव दोराचें. ॥ १४० ॥ तीनी गुणांचे तीन दोर, । कर्मप्रपंच जाळें पसरलें थोर, । त्रिगुणात्मक कर्म घोर । बंधक असे. ॥ १४१ ॥ ज्यांच्या

आंगीं बंधक शक्ती, । त्या कर्मे अपेक्षिली जरी मुक्ती, । तरी न घडे, यास युक्ती । प्रत्यक्षसिद्ध. ॥ १४२ ॥ जाळियामध्ये निघोनी, । म्हणे, 'मज बंध न लगे' म्हणोनी, । तरी तो गुंते बंध पावोनी, । बंधक कर्म निष्कामही ऐसें. ॥ १४३ ॥ तेंची बंधक कर्मजाळें । जो शस्त्रें छेदूं शके प्रबळें, । शरण जातां त्यास, विवेकबळें, । छेदूं शकेल तो त्यातें. १४४ ॥ स्वतःसिद्ध वचनागीं । मारक शक्ति आंगीं, । 'मरण नलगे' म्हणोनी त्यालागीं । भक्षितां, न मरे कोण हो? १४५ ॥ तो वचनाग जरी । अर्पिजे वैद्यराजाचे करीं, । तो त्याच बचनागाचा करी । रसराज रोगहर. ॥ १४६ ॥ नित्यकर्मही निष्काम करी, । आणि न अर्पी ईश्वरीं, । तें बधची करी, म्हणूनी या भावें हरी । निर्णय ऐसा बोलिला तृतीयाध्यायांत. ॥१४७॥ **"यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र । लोकोयं कर्म-बंधनः"** म्हणे कमलनेत्र, । कीं विष्णूसी अर्पिलें एकची मात्र । न करी बध सर्वथा. ॥ १४८॥ विष्णुसमर्पणावेगळे जितके, । कर्म बधक तितकें, । तृतीयांत हें इतकें । निर्णयपूर्वक बोलिला. ॥ १४९ ॥ नित्य निष्काम कर्मी बध नसता, । तरी देव ऐसें न बोलता, । कीं, यज्ञार्थां कर्मावांचूनी बधकता । सर्वत्र कर्मी.॥ १५० ॥ नित्य निष्काम जरी । न अर्पितां बधची न करी, । तरी कां ऐसें बोले हरी? । कीं, एका अर्पितावेगळे सर्व बधक. ॥ १५१ ॥ हेंही असो. श्रुती । **"कर्मणा पितृलोक"** ऐसें बोलती, । निष्कामें नित्यकर्मेही गती । देखिली पुनरावृत्तिरूपें. ॥ १५२ ॥ तृतीयाध्यायात हें विशद । वाखाणिलें प्रतिपद, । नित्यकर्म बंधक म्हणूनी गोविंद । 'यज्ञार्थावेगळे बधक सर्व,' म्हणे. ॥ १५३ ॥ 'तरी यज्ञ विष्णु, तदर्पणार्थ । काम्य करूं,' म्हणेल पार्थ । म्हणूनी उत्तरार्धे बोले समर्थ, । कीं **"तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसंगः समाचर."** ॥ १५४ ॥ म्हणजे विष्णूहीकारणे । कामनासग टाकूनी करणें, । तेंची या पूर्वार्धी बोलिले नारायणें । **"काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः."** ॥ १५५ ॥ आणि **"त्यागेनैकेन"** हे श्रुती । **"न कर्मणा"** म्हणे येच रीती, । कीं, काम्यकर्मे अपुनरावृत्ती । अमृतत्त्व न घडे. ॥ १५६ ॥ आणि 'एका त्यागेंची मोक्ष,' म्हणे श्रुती । कीं नित्यकर्म जे ईश्वरीं अर्पिती । त्या एका त्यागेंच अमृतत्वगती । ईश्वरप्रसादे. ॥ १५७ ॥ जो काम्य टाकूनी वैदिकें, । नित्यकर्मे आणि लौकिकें । जीं शरीरनिर्वाहार्थ आवश्यकें । समर्पी सर्वेश्वरातें, ॥ १५८ ॥ त्यास होतां ईश्वराचा प्रसाद, ।

---

१. अ० ३, श्लो० ९.

होय अद्वैतानुभव आनंद, । इतकें ऐशा एका त्यागेंची म्हणोनी वेद । त्यागमात्रेंची मोक्ष म्हणे. ॥ १५९ ॥ त्यागाचें तत्त्व ये रीती । प्रश्नानुरूप श्रीपती । बोलेल आतां अर्जुनाप्रती । उत्तरार्धे. ॥ १६० ॥

उत्तरार्ध—**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥**

त्याग सर्वा कर्मफलाचा, । त्यास '**त्याग**' म्हणती विचक्षणांच्या वाचा, । वाक्यार्थ तों इतकाच साचा, । परी विचक्षण काय समजोनी बोलती. ॥१६१॥ त्याग काम्यकर्माचा समूळ । बोलिला, आतां कैंचें फळ ? । नित्यकर्म तो केवळ । उगीच वेदाज्ञा. ॥ १६२ ॥ तरी तें नित्यकर्म आवश्यक, । त्यास कर्म म्हणणें पुरे शब्द एक, । सर्व कर्म म्हणूनी सर्वशब्दपूर्वक । कां फलत्याग बोलतो ? ॥ १६३ ॥ आणि उगाच फलत्याग, । त्याला विचक्षण म्हणती म्हणे त्याग, । परी कोण्या योगें त्या फलाचा भाग । कर्म करूनी त्यागावा ? हें न बोलिला. ॥ १६४ ॥ इतकेही प्रकार । विचक्षण जे टीकाकार । ते बोलतील, या भावें सर्वेश्वर । म्हणे विचक्षण बोलती. ॥ १६५ ॥ प्रथम काम्यकर्म टाकिल्यावरी । फळ नित्यकर्मी कोणे परी ? । तरी नित्यकर्मासही वेदवैखरी । पितृलोकादि फल बोले. ॥ १६६ ॥ आणि फलबंध कर्माच्या आंगीं, । जैसी मारक शक्ति बचनागीं, । त्यावेगळें देह निर्वाहालागीं । तेंही कर्म बंधक. ॥ १६७ ॥ म्हणूनी 'सर्वकर्मफळ । त्यागावें,' म्हणे मेघनीळ । सर्वशब्दप्रयोग केवळ । लौकिककर्माच्याच उद्देशें. ॥ १६८ ॥ मुमुक्षु जरी जाला, । देहनिर्वाह लागला, । फलत्याग दोहींचा बोलिला । परी त्याग कैसा करावा ? हा विचार. ॥ १६९ ॥ तरी सर्वज्ञ जगदाधार । तृतीयाध्यायापासूनी वारंवार । बोलिला हाची निर्धार, । कीं, 'बंध ईश्वरार्पणावेगळा.' ॥ १७० ॥ ईश्वरार्पणीं नसे फलबंध, । तरी तो नित्यकर्मविषयीं संबंध । लौकिक कर्मबंधाचा बंध । कैंवी फिटे ? ॥ १७१ ॥ तरी नवमाध्यायांत । '**यत्करोषि यदश्नासि**' या श्लोकांत । 'जें करिसी, तें' म्हणे भगवंत । 'मदर्पण करीं. ॥ १७२ ॥ शुभाशुभ फळापासुनी । सुटसी,' या रीतीवरूनी । परी एका काम्यावांचुनी । ऐसें तृतीयांतची सिद्ध जालें. ॥ १७३ ॥ काम्य शुद्ध तें न सोसे जेथें, । निषिद्ध काय सोसेल तेथें ? । सिद्धांत अर्पणीं हाची येथें, । कीं नित्य आणि देहनिर्वाह आवश्यक. ॥ १७४ ॥ म्हणोनी सर्व लौकिकें । आणि कर्में नित्यें वैदिकें, । यांचा फलत्याग म्हणतां सुचवी इतकें, । कीं, सर्व करावें मदर्पण. ॥ १७५ ॥ एकदा पाकलक्षण, । सांगोनी मग म्हणे विचक्षण, । कीं, 'तंदुलाचें तंदुलत्व त्यागूनी, मग भक्षण । करावें,' म्हणोनी. ॥१७६॥ तरी पूर्वोक्त पाक करितां, ।

जाणार तंदुलत्व अन्न होतां । हें विचक्षण जाणती, न सांगतां[1] । पाकलक्षण मागुती. ॥ १७७ ॥ एवं पूर्वार्धीं काम्यकर्माचा त्याग, । उत्तरार्धीं नित्य वैदिकलौकिककर्मफलत्याग; । त्यांत काम्यत्यागें संन्यासयोग, । तेणें श्रवणाधिकार वेदांतीं. ॥ १७८ ॥ काम्यत्यागें विरक्ती; । ईश्वरार्पण फलत्यागें भक्ती; । मग ईश्वरप्रसादें मुक्ती; । आत्मत्वसाक्षात्कारअनुभवें. ॥ १७९ ॥ त्याग ऐसा द्विप्रकार, । परी दोनी त्यागची हे करितां विचार, । म्हणूनी दोनी दाखवुनी श्रुति करी निर्धार, । कीं, 'त्यागेंची एका अमृतत्व.' ॥ १८० ॥ त्यांत कर्मांचा समूळ त्याग, । तो संन्यास हा एक भाग; । दुसरा भाग ईश्वरार्पण कर्मयोग; । एवं त्याग एकची दोन्ही मिळोनी. ॥ १८१ ॥ एवंच श्रवणाधिकार । अर्जुनास सिद्ध होय, तत्प्रकार । संन्यास बोलिला जगदाधार । काम्यकर्मत्याग तो. ॥ १८२ ॥ विशेषें आश्रमसंन्यास । घडे. तरी कोण उत्तम न म्हणे त्यास? । कीं, पुन्हा त्या संन्यासियास । वार्त्ताही कानीं न पडे प्रपंचाची. ॥ १८३ ॥ जे दिवशीं विचारयुक्त । होय अत्यत विरक्त, । तेची दिवशीं त्यास श्रुत्युक्त । उचित संन्यास घेणें. ॥ १८४ ॥ ऐसें श्रुती । मुमुक्षूतें बोलती, । कीं, 'आश्रम जे अवलंबिती । ते न शकती परतों पुन्हा.' ॥ १८५ ॥ कदाचित् मन । करूं लागे विषयचिंतन, । तरी तें दंडावेंची, परी गृहधन । आतळों नये. ॥ १८६ ॥ पुन्हा न शके धरूं विषयाशक्ती, । हे श्रुतिसिद्ध अनादि युक्ती; । म्हणूनी जे दिवशीं उपजे विरक्ती, । ते दिवशींच संन्यास उक्त. ॥ १८७ ॥ परंतु जें त्यासही वैराग्यमूळ, । तेंची टाकणें काम्यकर्म सकळ, । तेव्हांची तो संन्यासी केवळ, । विशेष आश्रमही घेतां बहु बरें. ॥ १८८ ॥ 'नव्हे आश्रमसंन्यास उत्तम,' । ऐसें म्हणे तोची अधम; । परी आत्मविचार परम । आयकाया आश्रमसंन्यासची करणें, हें न घडे. ॥ १८९ ॥ काम्यत्याग संन्यासाविना । आत्मोपदेशश्रवणीं जना । अधिकार नाहीं, हे अर्थरचना । **'संन्यस्य श्रवणं कुर्यात्'** या श्रुतीची. ॥ १९० ॥ याज्ञवल्क्य, जनक, । अर्जुन, उद्धव, इत्यादिक । गृहस्थची अधिकारी बहुतेक । आत्मोपदेशश्रवणातें. ॥ १९१ ॥ तेथें जन्मांतरकल्पना । प्रमाणावीण बरी दिसेना, । आणि भगवद्वचन वेदवचना । विरुद्ध न दिसे लेशही. १९२ ॥ जो उपदेशी अर्जुनास, । तोच काम्यकर्मत्याग म्हणे संन्यास, । **'संन्यस्य श्रवणं कुर्यात्'** या वेदवचनास । विधिवाक्यत्व आणिलें ये रीती. ॥ १९३ ॥ भगवंतें ये रीती । स्वयें वाखाणिली श्रुती, । अपरोक्षानुभव अर्जुनाप्रती । याच संन्यासें उपदे-

१. 'आयका या' असा पाठ आढळतो.

शिला. ॥ १९४ ॥ श्रेष्ठत्व संन्यासाचें । यथास्थित ठेवूनी साचें, । श्रवण गृहस्थांस करवूनी विधिवचनाचें । व्याख्यान केलें तदनुरूप. ॥ १९५ ॥ कीं ऐसाच विधिवाक्यार्थ, । तरी आपण उपदेशिला पार्थ, । ऐसा अर्थ टाकूनी कां व्यर्थ । अर्थ आणखी कल्पावा? ॥ १९६ ॥ जे निर्मत्सर यती, । ते तों हाची अर्थ अंगीकारिती; । जे साभिमान, त्यांची भीड किती! । कीं, त्यांस भिउनी, बोलावें अन्यथा. ॥ १९७ ॥ हे यथार्थदीपिका । यथास्थित अर्थाची प्रकाशिका; । स्वयें भगवंत करितो टीका, । भीड येथें कोणाची! ॥ १९८ ॥ आतां त्याग बोलतां जें श्रीपती । बोलिला कीं, 'विचक्षण सर्वकर्मफलत्यागातें ये रीती । अगा! अर्जुना! प्रकर्षे बोलती । पूर्वापरविचारें.' ॥ १९९ ॥ त्याचा ऐसा सिद्धांत । पोटीं धरूनी, बोलिला भगवंत, । कीं कर्म नित्य वेदोक्त तें निश्चित । करावें, आणि फल त्याचें त्यागावें. ॥ २०० ॥ सिद्धांत ऐसा अंतरीं, । आणि गोष्टी टाकिली विचक्षणांवरी, । कीं, विचक्षण ऐसें बोलती, म्हणूनी, परी । जनास अविचक्षणही वाटती विचक्षण. ॥२०१॥ कीं निपट अन्ध, त्याहुनी । श्वेतास 'पीत' म्हणे तो बरा; या न्यायेंकरूनी । नाना मतकार बुद्धिमंत म्हणोनी । मानिती जन. ॥ २०२ ॥ यांत कोणी आपणास संमत । येविषयीं तैसें बोलती निश्चित, । परी त्याचें मत कुमत । अंगीकारूं नये सर्वही. ॥ २०३ ॥ याकारणें या गोष्टीस जे प्रतिकूळ, । आणि या गोष्टीस जे सानुकूळ, । दोन्ही आधीं बोलतो विश्वमूळ । या श्लोकीं. ॥ २०४ ॥

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।
यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥

दोष जो बंधरूप अत्यंत, । त्या दोषें युक्त तें दोषवंत, । तें टाकावेंच, ऐसें बुद्धिमंत । कोणी एक बोलती. ॥ २०५ ॥ म्हणजे कर्ममात्रीं बंध असे, । कर्ममात्रीं दोष दिसे, । यालागीं कर्म सर्व टाकावें, ऐसें । बोलती कोणी. ॥ २०६ ॥ कोणी यज्ञदानतपकर्म । न टाकावेंची म्हणती, म्हणे पुरुषोत्तम, । एक सांख्य, एक मीमांसक, ऐसें सर्वोत्तम । सुचवी, दोन्ही पक्ष बोलतां. ॥ २०७ ॥ सांख्य म्हणती, 'सदोष कर्म । सर्व टाकावें, हा मोक्षधर्म.' । मीमांसकाचे मतें, 'कर्मची ब्रह्म, । वेदोक्त कर्म सदा आचरावें.' ॥२०८॥ यांत सांख्यास भगवंत । म्हणे, कीं, 'बुद्धिमंत,' । कीं, कर्मास म्हणती 'दोषवंत,' । हे गोष्टी खरी. ॥ २०९ ॥ कीं, जें नित्य निष्काम, । बंध करी तेंही कर्म, । हें त्यांस कळलें वर्म, । 'बुद्धिमंत' ते म्हणावे या भावें. ॥ २१० ॥ मीमांस-

सर्कास 'अपरे' म्हणोनी । म्हणे देव, यावरूनी । ते केवळ अल्पबुद्धि ऐसें सुचवूनी, । देव बोलिला. ॥ २११ ॥ कीं काम्यची त्यांच्या मतें करावें, । कां मोक्षमार्गात भरावें? । मोक्षमार्गीच्या नांवें । शून्यची जिहीं घातलें- ॥ २१२ ॥ मीमांसासूत्रकार । जैमिनि व्यासशिष्य हा निर्धार, । तो गुर्वाज्ञेनेंच वेडेचार, । मोक्ष निंदूनी, बोलिला. ॥ २१३ ॥ कीं, 'अद्वैततत्त्वीं अनधिकारी । प्रवेशोनी नाशतील दोन्ही प्रकारीं, । ज्ञान बिंबेना अंतरीं । आणि कर्मी धरितील अनादर. ॥ २१४ ॥ त्यांस कर्मीच योजावें, । तिहीं काम्यास आधीं भजावें, । निषेधूनी मोक्ष; या भावें । जैमिनि बोले हें सूत्र. ॥ २१५ ॥

## आम्नायस्य क्रियार्थत्वादानर्थक्यमतदर्थानाम् ॥

'आम्नाय' म्हणजे नाना शाखारूप वेद । प्रवर्तला सांगावया क्रियाभेद, । याकारणें त्या कर्माविगळा जो वेदीं अभेद, । त्यास 'आनर्थक्य' म्हणजे निरर्थकता. ॥ २१६ ॥ जैमिनि ऐसें बोलिला, । तेव्हां तो गुरुद्रोही जाला, । कीं, गुरूचें मत उडवूं लागला, । वचन त्याचें अप्रमाण. ॥ २१७ ॥ परंतु गुर्वाज्ञेंकरूनी । अशुद्धचित्तीं काम्यें करावीं म्हणोनी । ऐसें वेदविरुद्ध मत बोलिला, यावरूनी । तेंही शास्त्र मान्य जालें. ॥ २१८ ॥[१]परंतु त्याचे वार्तिक भाष्यकार, । हा न जाणोनी गुह्य प्रकार, । मोक्षमार्गातें निषेधूनी वारंवार । कर्मची थोर म्हणती. ॥ २१९ ॥ यालागीं सांख्य बुद्धिमंत । म्हणोनी बोलूनी भगवंत, । त्यावेगळे बुद्धिहीन अत्यंत । ते दुसरे बोलिला. ॥ २२० ॥ परंतु एकेच गोष्टीवरूनी । बोलिला सांख्यही बुद्धिमंत म्हणोनी, । कीं, दोषयुक्त कर्म टाकावें म्हणती, यावरूनी, । परी मान्य न करी सर्व मत त्यांचें. ॥ २२१ ॥ आणि मीमांसक ज्या भावें । म्हणती कर्म सर्वथा न टाकावें, । त्या भावें देवाधिदेवें । न करिजेल मान्य. ॥ २२२ ॥ [१]ते यज्ञदानादि सकळ । करावें म्हणती अपेक्षूनी फल, । तैसें यज्ञदानादि केवळ । संमत नव्हे देवास या. ॥ २२३ ॥ 'संग काम्याचा टाकुनी, । आणि नित्यकर्मफल त्यागुनी, । म्हणजे ईश्वरार्पणविधि करूनी, । नित्यें करावीं तें', म्हणेल, 'मत माझें.' ॥ २२४ ॥ एवंच आरंभीं श्लोकीं दुसरिया । काम्यकर्मत्याग आणि नित्यफलत्याग धनंजया । जो बोलिला, त्यागातेंची तया । बोलों पाहतो. ॥ २२५ ॥ आतां प्रस्तुत । तें सांगायाची प्रतिज्ञा भगवंत । आणि त्यागाचेही प्रकार बहुत । सांगेन म्हणतो या श्लोकीं. ॥ २२६ ॥

---

१. मीमांसक. 'तें' असा पाठ आढळतो.

**निश्चयं श्रृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥**

अगा! एक कर्मत्याग बोलती, । वैदिक कर्में करावीं म्हणती, । परी माझा निश्चय सांगतों तुजप्रती । आईक तो. ॥ २२७ ॥ त्या दोहीं पक्षांवेगळा । पक्ष माझा आगळा, । भरतवंशांत पुरुषशार्दूळा ! । तूं जैसा सत्तम. ॥२२८॥ कीं एक पक्ष कौरव, । पक्ष दुसरा पांडव, । त्यांचमध्यें परंतु अभिनव । तूं पुरुषव्याघ्र अधिक सर्वांहुनी. ॥ २२९ ॥ ऐसा त्यागविषयक । निश्चय माझा जो एक, । तो या दोहीं पक्षांहुनी अधिक, । ऐसें अर्जुनाच्या या दों नामीं सुचवी. ॥ २३० ॥ आतां त्यागविषयीं माझा निश्चय । तो मी सांगतची आहें निर्णय, । त्या प्रसंगें प्रकारत्रय । त्याग बोलिला, तोही सांगतों.॥२३१॥ परंतु आधीं अर्जुना । निश्चय आमुचा ऐकावा, ऐसी मना । उत्कंठा तुझिया दिसते, तरी ते रचना । ऐक या श्लोकीं. ॥ २३२ ॥

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥**

अगा! यज्ञ दान तप इत्यादि कर्म । टाकूं नये, हे करावेच धर्म, । 'कां?' म्हणसी, तरी याचें वर्म । सांगतों तुजला. ॥ २३३ ॥ यज्ञ आणि दानें । आणि तपें हीं पावनें, । कीं बुद्धिमंताचीं मनें । पवित्र होती हीं करितां. ॥ २३४ ॥ ऐसें देव बोलिला, । तों अर्जुन नवल मानूनी पाहों लागला, । कीं हा यज्ञादि विधिच जाला, । त्याग नव्हे. ॥ २३५ ॥ त्याग म्हणजे टाकणें, । देव म्हणतो न टाकावें हें करणें, । तेव्हां नव्हे हें बोलणें । त्यागविषयीं. ॥ २३६ ॥ अर्जुनाचा ऐसा भाव । जाणोनियां, देवाधिदेव । तो कांहीं पुसे तों स्वयमेव । त्यागपण साधितो या श्लोकीं. ॥ २३७ ॥

**एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥**

अगा! हींची कर्में करावीं, परी । संग काम्यकर्मांचा टाकोनी दुरी, । आणि नित्यकर्मांचें फल जें बंध करी, । त्यागोनी तींही फलें, करावीं हीं. ॥ २३८ ॥ निश्चय आमुचा अत्यंत । त्यागविषयीं हा निश्चित, । त्यागविषयीं माझें मत । हेंची वारंवार बोलतों. ॥ २३९ ॥ काम्य समूळ कर्मची टाकावें, । नित्यकर्म फल टाकूनी आचरावें, । हें तों मागेंही स्थळस्थळीं देवें । बोलिलें येथें म्हणतो माझें हें मत. ॥ २४० ॥ आणि नित्यकर्माचा फलभोग, । त्याचा कैसा करावा

त्याग ? । तरी ईश्वरार्पित नित्य निष्काम हा राजमार्ग । एकदा दाविलाच भगवंतें. ॥ २४१ ॥ आतां तामस, राजस, सात्विक, । त्याग बोलतां, हेंची एक । मत आपुलें म्हणूनी श्रीवत्सांक । बोलतो. ॥ २४२ ॥ दुसरें संन्यासशब्दें काम्यकर्माचाच त्याग, । आणि फलशब्दें नित्याचा फलभोग, । त्यागाचा ऐसा जो बोलिला विभाग, । तो स्पष्ट बोलतो या श्लोकीं. ॥ २४३ ॥

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥**

अगा ! **त्याग**शब्दें टाकणें कर्म, । म्हणोनी नित्य वर्णाश्रमोचित धर्म । टाकी, तरी हा त्याग अधर्म । तामस म्हणावा. ॥ २४४ ॥ कीं तमोगुण मोहक, । त्याकरितां न कळे युक्तायुक्तविवेक, । अविचारें ऐसाही त्याग एक । करी, तो तामस बोलिला. ॥ २४५ ॥ कीं जें कर्म नियत, । त्याचा तों संन्यास न घडे निश्चित, । त्याग काम्याचा घडेल अत्यंत, । परी नियताचा तों घडों शकेना. ॥ २४६ ॥ **'नियतस्य तु'** या शब्देंकरूनी । आणि काम्याचा त्याग मागें स्पष्ट बोलिला, म्हणोनी । नियताचा तों त्याग न घडे म्हणे, यावरूनी । बोले कीं काम्याचा घडों शके. ॥ २४७ ॥ आणि त्यागास । म्हणावें **न्यास,** । देव म्हणे संन्यास । नियताचा तों घडेच ना. ॥ २४८ ॥ न्यास न घडे म्हणतां घडेना त्याग, । तरी नित्यकर्मेंकरूनी त्यागावा फलभाग, । तेव्हां दों भागांचा करितां विभाग, । त्याज्यांश फळभाग होतसे. ॥२४९॥ फळभाग त्याग होउनी, । कर्मभाग उरतो, म्हणोनी । संन्यास न घडे, म्हणतो यावरूनी । त्याग सम्यक् प्रकारें न घडे, अर्थ ऐसा. ॥२५०॥ सम्यक् प्रकारें न्यास । म्हणजे बरा त्याग तो संन्यास, । ऐसा संन्यास न घडे, कीं त्यागास । एकच भाग योग्य होतो. ॥ २५१ ॥ कीं काम्यकर्माचा न्यास, । तो द्वितीय श्लोकीं बोलिला संन्यास, । कीं कर्मासहित कामनेचा निरास । तो संन्यास, कवि जाणती. ॥ २५२ ॥ ऐसें मागें उत्तमश्लोक । प्रश्नाचे उत्तराचा जो प्रथम श्लोक । तेथें बोलिला करुणावलोक[1] । **"काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः"** म्हणोनीं. ॥ २५३ ॥ येथें म्हणे अर्जुनास । कीं नियताचा तों न घडे संन्यास, । म्हणजे बरा न घडे न्यास, । फलभागींच घडे याकरितां. ॥ २५४ ॥ काम्याचा त्याग घडतो जैसा, । दोहीं भागीं नियत कर्माचा न घडे तैसा, । आणि नियता कर्माचाही त्याग कोणी करितो

---

१. दयापूर्ण आहे दृष्टि ज्याची तो.

ऐसा, । तरी तो बोलिला तामस. ॥ २५५ ॥ फलत्यागाचें तों लक्षण । ईश्वरार्पित म्हणूनी कमलेक्षण । बोलिलाच, आतां क्षणक्षण । कां बोलावें? ॥ २५६ ॥ तें असो, त्याग बोलोनी तामस, । आतां त्याग जो कां राजस । बोलतसे जगन्निवास । या श्लोकीं. ॥ २५७ ॥

**दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।**
**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥**

दुःख वाटे करितां कर्म, । कोणें करावे श्रम? । म्हणोनी वर्णाश्रमोचितधर्म । टांकी भयें शरीरकष्टांच्या. ॥ २५८ ॥ हाही राजसत्याग ओंगळ, । त्यागी तोही अमंगळ, । न पावे सात्त्विका त्यागाचें फल, । तो सात्त्विक ऐसा आईक या श्लोकीं. ॥ २५९ ॥

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।**
**संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ ९ ॥**

हें कर्म नियत । करावेंची वेदविहित, । म्हणूची करिजेतें, तो त्याग निश्चित । सात्त्विक गा! अर्जुना! ॥ २६० ॥ म्हणसी, 'करणें लागलें । तेव्हां त्यागपण कैंचें आलें? । तरी येविषयीं मागेंही बोलणें जालें, । पुन्हा सांगतों म्हणूनी या भावें सांगतसे. ॥ २६१ ॥ कीं टाकूनी संग आणि फल, । त्यांत संग टाकावा समूळ, । आणि फलही टाकावें, परी केवळ । फलची टाकावें देव म्हणे. ॥ २६२ ॥ "संगं त्यक्त्वा फलं चैव" । या'चैव' शब्दीं देव । चकारें फल टाकावें म्हणे वासुदेव । म्हणजे संग टाकूनी फलही टाकावें. ॥ २६३ ॥ आणि एवशब्देंकरूनी । फल मात्रच टाकावें म्हणोनी । बोले भगवंत, ऐसें सुचवुनी । कीं फलची टाकावें आणि टाकूं नये कर्म. ॥ २६४ ॥ स्पष्ट अर्थ ऐसा, कीं, श्रीरंग । म्हणे नियत करावें टाकूनी संग, । संग कामनेचा प्रसंग, । म्हणजे काम्यकर्म अवघें. ॥ २६५ ॥ कीं संगशब्दें कामनाची टाकिली, । तेव्हां काम्याची गोष्टी कोठें राहिली? । यालागीं काम्यत्यागाची गोष्टी बोलिली । स्थळस्थळीं संगशब्दें. ॥ २६६ ॥ कीं टाकिला काम्यप्रसंग, । न करी काम्य, परी कामना न सोडी अंतरंग, । तो काम्यत्याग बरवा नव्हे, म्हणूनी संग । जेथेंतेथें काम्यास श्रीरंग म्हणतसे. ॥ २६७ ॥ एवं "संगं त्यक्त्वा" म्हणजे संगातें टाकुनी, । म्हणजे काम्य आणि कामना निःशेष सोडुनी, । नित्यकर्म करी त्याचें फलही त्यागुनी, । तो त्याग सात्त्विक, ऐसें चकारें बोलिला. ॥ २६८ ॥ आणि 'चैव' शब्दांतील एवशब्द । 'फलमेव' म्हणूनी अन्वय त्याचा गोविंद । दावूनी बोले विशद ।

कीं फल टाकूनी नित्यकर्म करिजेतें. ॥ २६९ ॥ तो सात्त्विक त्याग निश्चित, । ऐसें माझें मत मज संमत, । अगा! अर्जुना! म्हणूनी अच्युत । त्याग सात्त्विक ऐसा बोलिला. ॥ २७० ॥ आतां सात्त्विक त्याग ये रीती । करितां, जेव्हां बाणे त्यागस्थिती, । तेव्हां तो कैसा होतो? म्हणूनी अर्जुनमती । जाणों इच्छितांची, देव बोले हा श्लोक. ॥ २७१ ॥

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥**

अगा! जें कर्म अकुशल, । म्हणजे बंध तोडावया जें नव्हे कुशल, । स्वर्गादि अमंगळ फल । ज्या काम्य कर्मी, ॥ २७२ ॥ त्या कर्मचा द्वेष न करी, । कोणास करितां देखे जरी, । तरी म्हणे कीं मोक्षमार्गी अनधिकारी । करिती काम्य हें बरें. ॥ २७३ ॥ परंतु काम्याचा बंधक दोष । स्मरोनी, त्याचा न करी द्वेष, । म्हणूनी बोले परमपुरुष, । कीं तृतीयाध्यायांतही ऐसेंची बोलिला. ॥ २७४ ॥ "न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां"[1] या श्लोकेंकरूनी । बुद्धिभेद अज्ञानियांचा करूं नये म्हणूनी । भगवंत बोलिला, कीं, त्यांच्या हातेंकरूनी । काम्येंच करवावीं ज्ञाननिष्ठें. ॥ २७५ ॥ नरक चुके, स्वर्गास जाय, । त्याहूनी बरें त्यास आणीक काय? । दरिद्री व्हावा तो सभाग्य होय । जन्मांतरीं. ॥ २७६ ॥ जो होणार अपुत्र, । तो जरी पावे सुपुत्र, । त्यास त्याहूनी काय उत्तम? कीं मन अपवित्र । मोक्षमार्गी त्याचें भरेचिना. ॥२७७॥ कीं जो अनेक जन्म । करी काम्यकर्म वेदोक्तकर्म, । मग तो निष्काम मोक्षधर्म । करावया अधिकारी होतसे. ॥ २७८ ॥ याकारणें जो ज्ञानी, । तो जरी काम्य वाईट म्हणोनी । अनधिकारियांस काम्यापासुनी । भ्रष्ट करी, तरी ते होती उभयभ्रष्ट. ॥ २७९ ॥ काम्यकर्म करूं नेदी ज्ञानी, । मोक्षमार्ग न रुचे मनीं, । तेव्हां उभयभ्रष्ट होउनी, । वायांच जावें. ॥ २८० ॥ जेवूं न घाली माता, । भिक्षा मागों नेदी पिता, । काय करावें? सांगा आतां । त्या पोरें. ॥ २८१ ॥ देखोनी भाग्यवंत राजे, । दरिद्री मोळी विकावया लाजे, । त्याचें काळीजची भाजे । जठराग्नीकरूनी. ॥ २८२ ॥ याकारणें मोक्षीं अनधिकारी । तो काम्यकर्मे न करी जरी, । नरक भोगूनी जन्मांतरीं । दरिद्री पशुयोनि तो पावे. ॥ २८३ ॥ त्यास तेंच कर्म कुशल, । परी मोक्षमार्गीच्या पुरुषातें तें अकुशल, । कीं बंधकरूप त्याचें फल, । परी सात्विकत्यागी द्वेष न करी तयाचा. ॥ २८४ ॥ मोक्षप्रकरणीं काम्य निंदिती, । कीं ज्ञानी मुमुक्षूंची मती ।

---

[1] अ० ३, श्लो० २६.

काम्यांकडे लागेल ये रीती । भाव शास्त्रकारांचा. ॥ २८५ ॥ आतां त्यागी न निंदी कर्म अकुशल, । आणि आपलें करी कर्म कुशल, । कीं न करी बंध ईश्वरार्पित केवळ, । तथापि आसक्त नव्हे त्या कर्मी. ॥ २८६ ॥ म्हणूनी भगवद्वाणी बोलते, । कीं, "**कुशले नानुषज्जते**" । सात्त्विक त्यागाची बाणते । स्थिति जेव्हां. ॥ २८७ ॥ कीं त्यागी सत्त्वसमाविष्ट, । म्हणजे सत्त्व बरविया प्रकारें आविष्ट, । म्हणजे सत्त्व त्याच्या देहीं प्रविष्ट, । जालें बहुत बरें. ॥ २८८ ॥ सत्त्व बरें[1] प्रवेशलें कशावरूनी ? । तरी ब्रह्मविद्येंकरूनी, । ऐसें अर्जुनातें कळावें, म्हणोनी । '**मेधावी**' म्हणतसे देव. ॥ २८९ ॥ **मेधा** आत्मविद्यायुक्त बुद्धी, । जीकरितां अद्वैतानुभवाची सिद्धी, । कीं बरी सत्त्वप्रवेशाची समृद्धी । आत्मविद्येवीण घडेना. ॥ २९० ॥ कनकीं अलंकार जैसा, । ब्रह्मीं प्रपंच त्रिगुण तैसा, । परंतु सत्त्वावांचुनी ऐसा । अनुभव न घडे. ॥ २९१ ॥ अनुभव ऐसा ज्याच्या शरीरीं, । सत्त्व प्रवेशलें त्याच्याच अंतरीं, । सत्यसमाविष्ट त्यातेंची म्हणे, यापरी । जो त्यागी सात्त्विक. ॥ २९२ ॥ हेंही असो तो छिन्नसंशय, । कीं कळलें ज्यास अद्वय, । अद्वैतबोधावांचूनी आशय । छिन्नसंशय नव्हे कदापी. ॥ २९३ ॥ श्रुति म्हणे जो सुज्ञ । जाला गुरुमुखें आत्मज्ञ, । तोची जाला सर्वज्ञ, । ऐसा उपनिषदीं **याज्ञवल्क्यमैत्रेयीसंवाद**. ॥ २९४ ॥

**मैत्रेय्यात्मनि खल्वरे दृष्टे मते विज्ञाते इदं सर्वं विदितम् ॥**

मैत्रेयीप्रती । म्हणे **याज्ञवल्क्य** तिचा पती, । कीं, आत्मा कळलिया त्रिजगती । सर्व कळली. ॥ २९५ ॥ सर्व कळलें जया, । मग ठाव कैंचा संशया ? । हेंही असो; जाणतां अद्वया । सर्व संशयच्छेद, श्रुति म्हणे. ॥ २९६ ॥

**भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः ।**
**क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥**

ग्रंथि हृदयाची भग्न होय, । छिन्न होती सर्व संशय, । सर्व कर्मांचा होय क्षय, । आत्मा परावर देखतां. ॥ २९७ ॥ थोरां ब्रह्मांडादिकांस म्हणावें **पर**, । सूक्ष्म स्तंबादिकां म्हणावें **अवर**, । ऐसें सकळ चराचर । जो आत्मा तो **परावर** बोलावा. ॥ २९८ ॥ श्रुत्यर्थ ऐसाची, परी बोलतां विशद । ग्रंथ वाढेल वाग्वाणितां प्रतिपद, । प्रस्तुतीं म्हणे **गोविंद** । छिन्नसंशय जया, त्यागी जो, तो ऐसा. ॥ २९९ ॥ या लक्षणीं तो ज्ञानी, । तरी श्रुतिही म्हणे "**छि-**

---

१. 'जरी' असा पाठ आढळतो.

च्छिन्ने सर्वसंशयाः" म्हणोनी, । एवंच ऐसिया लक्षणेंकरूनी '। कुशल कर्मीही नव्हे आसक्त. ॥ ३०० ॥ म्हणजे लोकसंग्रहार्थ कर्मे करी, । परी मज हें तारक, ऐसी कर्मश्रद्धा न धरी; । आणि काम्यें करिती अनधिकारी, । द्वेष न करी तया अकुशला कर्माचा. ॥ ३०१ ॥ आतां अध्यायाच्या तिसरिया श्लोकीं। उत्तमश्लोक बोलिला, कीं, । कोणीं सदोष कर्म टाकावें म्हणती, या श्लोकीं । कोणी म्हणती करावें; ॥ ३०२ ॥ दोहीं वेगळा उत्तम । माझा निश्चय म्हणे पुरुषोत्तम, । तें स्वमत जो हा श्लोक दशम । येथपर्यंत बोलिला. ॥ ३०३ ॥ या दों पक्षांत सांख्य एक, । दुसरे कर्ममीमांसक; । ते करावेंच म्हणती आवश्यक, । काम्यकर्म मीमांसकां मुख्य वाटे. ॥ ३०४ ॥ तद्विलक्षण स्वमत । येथवरी बोलिला भगवंत, । परी कर्मत्याग अत्यंत । कां करूं नये? हा संशय राहिला. ॥ ३०५ ॥ टाकितां सर्व कर्म, । उरे आत्मा निर्धर्म, । यापरी त्यागाचें वर्म, । उत्तम हें भगवदुक्त न दिसे. ॥ ३०६ ॥ काम्यमात्र टाकावें, । नित्यकर्म आचरावें, । तेव्हां प्रवृत्तिधर्मी तों भरावें, । टाकिलें फल जरी. ॥ ३०७ ॥ बोलतां स्वमत, । हा संदेह राहिला निश्चित, । म्हणूनी करितो भगवंत । परिहार याचा या श्लोकीं. ॥ ३०८ ॥

नहि देहभृतां शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥

अगा! ऐसा त्याग घडता जरी, । तरी कर्मी कर्मफलत्याग कां तदुपरी? । हा त्याग उत्तम, परी । देहधारियास[1] अशेष न टाकवे कर्म. ॥ ३०९ ॥ भूमी टाकूनी भूचर । कैसा पळों शकेल नर। तरंग उदकासी सोडोनी स्थिर । राहेल कैसा? ॥ ३१० ॥ मातीस सोडूं शकेल घट, । ततूसी सोडूं शकेल पट, । सोन्यास सोडूं शकेल मुकुट, । तरी देहधारी सोडील कर्मातें. ॥ ३११ ॥ नुसत्या कर्माचाच जाला, । तो देह कैसा सोडील त्याला? । इंद्रियें आवरूनी बैसला, । अथवा निजेला, तरी तें कर्म. ॥ ३१२ ॥ बहुत बोलून काय? । देहधारियास कर्म सोडिलेंच न जाय, । विहितकर्म टाकील, परी उपाय । नसे अशेषकर्मत्यागाचा. ॥ ३१३ ॥ म्हणूनी 'अशेष' पद । या स्थळीं योजी गोविंद, । अर्थ याचा विशद । दृष्टांतची बोलती. ॥ ३१४ ॥ अगा! अर्जुना! यालागीं । जो करूनी कर्मे फल त्यागी, । तोची बोलिजेतो त्यागी, । त्याग यावेगळा घडेना. ॥ ३१५ ॥ अगा! गृहकृत्य शके करूं, ।

१. 'देहधारी यास' असा पाठ आढळतो.

आणि राजआज्ञा शिरीं न शके धरूं; । जैसें बडविजे ओढाळ गुरूं, । तैसें प्रत्यवायें फल भोगील. ॥ ३१६ ॥ करी शरीराचा निर्वाह, । आणि टाकी वेदाज्ञाप्रवाह, । त्यास नरकयातनानवरीशीं विवाह, । लागला जाणावा ॥ ३१७ ॥ जों ज्ञान नाहीं आलें, । तों प्रत्यवाय भोगणें लागलें, । ज्ञानें अपक याणें जरी टाकिलें, । तो वायां जाय सद्यः, ज्ञानपरिपाक नव्हतां. ॥ ३१८ ॥ तेही जन्मांतरीं मुक्ति पावती, । परी रोकडी तोंडीं पडे माती, । पकज्ञानियाची तों वेगळीच रीती, । तो स्वतंत्र. ॥ ३१९ ॥ तोही लोकसंग्रहा-निमित्त । कर्में करी, न करी, तरी तो अप्रमत्त, । ज्याच्या पदरीं अनंत वित्त, । त्यास दरिद्री कोण म्हणे ? ॥ ३२० ॥ परंतु त्याग पाहिजे जोंवरी, । त्याग ऐसाच तोंवरी, । कीं काम्य टाकी आणि करी । फलत्यागें नित्यकर्म. ॥३२१॥ दूषिलें ऐसें तें मत, । जें कर्म टाकावेंची म्हणे अत्यंत; । परी तें कर्म दोषवंत, । म्हणूनी म्हणती न करावें. ॥ ३२२ ॥ "त्याज्यं दोषवदित्येके" या श्लोकें करूनी, । तें कर्म टाकावें म्हणती सदोष म्हणोनी, । हा त्यांचा हेतु परिह-रूनी । दूषिलें नाहीं मत त्याचें. ॥ ३२३ ॥ तरी दोष कर्माचें फळ । तेंची बंधक अमंगळ, । तें त्यागियास न घडे, म्हणतो जगन्मंगळ । उत्तमश्लोक या श्लोकीं. ॥ ३२४ ॥

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥**

फळ कर्माचें दुष्ट, । तें त्रिविध, त्यांत एक अनिष्ट, । दुसरें फळ इष्ट, । मिश्र म्हणावें तिसरें. ॥३२५॥ दुःख वाईट, तें अनिष्ट; । सुख बरें वाटे, तें इष्ट; । कांहीं सुख, कांहीं कष्ट, । तें मिश्र, म्हणजे मिश्रित तिसरें. ॥३२६॥ जें सुख म्हणूनी इष्ट अत्यत, । तेंही अनिष्टच अंतवंत, । त्या ईष्टासही अनिष्टची म्हणती संत, । परी जनदृष्टीनें भगवंत इष्ट म्हणे. ॥ ३२७ ॥ एवं त्रिविध कर्मफळ । अनिष्टची सकळ, । तें ऐसें अत्यत प्रबळ, । कीं कर्ता मेला तरी न सोडी. ॥३२८॥ परी जे सकाम अत्यागी, । मेले तरी ते, तें तयांलागीं । होय; आणि मी जे बोलतों त्यागी, । त्यांस कोठेंही तें नव्हे. ॥ ३२९ ॥ जे त्यागातें न जाणती, । ते मेलिया फळ पावती, । स्वर्गादि कामें जे यजिती, । स्वर्गफळ सुवर्णशृंखला तयांतें. ॥३३०॥ आणि पापाचें फळ निरय । मेलिया, ऐसा द्विविध फळाचा निर्णय, । पुन्हां जन्मातरीं पुण्यपापमय । फळ भोगावें, त्रिविध तेंही. ॥ ३३१ ॥ पूर्वार्धीं मि-

---

१. मागें श्लो० ३ पहा. २. नरक.

श्रशब्दापुढें चकार, । उत्तरार्धी प्रेत्यशब्द बोले ईश्वर, । अन्वय दोहींचा एतत्प्रकार । 'प्रेत्य च' म्हणोनी. ॥३३२॥ प्रेत्य म्हणिजे मरोनी, । चशब्दें आणीकही म्हणोनी, । म्हणजे जन्मांतरींही तें भोगिल्यावांचूनी । त्रिविधफळ हें सुटेना. ॥ ३३३ ॥ जे त्यागातें न जाणती, । त्यांस फलभोग ये रीती, । जे संन्यासी त्यांतें म्हणे श्रीपती । कीं त्रिविधफलही नव्हे क्वचित्. ॥३३४॥ कीं जे आपण बोलिलों त्यागी, । ते संन्यासी, मरणची नाहीं त्यालागीं, । मरण देहास, त्या मार्गीं । शून्यची पडलें. ॥३३५॥ स्वप्नदेह स्वप्नदृष्टीकरूनी । दिसे जागृतास कीं स्वप्न मानसकल्पना म्हणोनी, । त्या मनें तो देह मेला ऐसें स्मरोनी, । मेला कोण जागृत? ॥ ३३६ ॥ स्वप्नदेह स्वप्नदृष्टीं ।. जागृत मेला देखोनीही नव्हे कष्टी, । एवं ज्ञानियाचे अदृष्टीं । ये रीती मरण देहाचें. ॥ ३३७ ॥ आपण आत्मा इंद्रियातीत, । तो अजर अमर निश्चित; । परी जे बुद्धीस हें विदित, । तेची बुद्धि इद्रियद्वारा जाणे देहातें. ॥ ३३८ ॥ तेच बुद्धीस स्वप्न होतें अज्ञान, । तेच बुद्धीस आलें ज्ञान जागृतीसमान, । गेला जरी अविद्यारचित देहाभिमान, । तरी प्रारब्धें जाणें जिणें मरणें दोन्हीं तयाचीं. ॥ ३३९ ॥ ते चिदात्मत्वींच रमे, । तीस देह आत्मा कधींच न गमे; । तो मेला, तरी ते न श्रमे । 'मरण आलें' म्हणोनी. ॥ ३४० ॥ तो जीवंत म्हणोनी, । ते कधीं सुख न मानी; । तो मरतां, त्या मरणेंकरूनी । हानिही तीस वाटेना. ॥ ३४१ ॥ एवंच ज्ञानियास मृत्युच नाहीं, । तेव्हां जन्मांतरीं कैचा भोग कांहीं? । अनिष्ट, इष्ट, मिश्र, फळें याही । आणि जन्मांतरींही नसती तयातें. ॥ ३४२ ॥ मरणची नाहीं जया, । जन्मांतर कैंचें तया? । क्वचित्पदें धनंजया । अर्थ इतका सुचवी. ॥ ३४३ ॥ जो स्वमतें म्हणावा त्यागी, तया । त्रिविधफल कोठेही नाहीं, धनंजया! । कीं फल अगा! त्यागाचें या, । ज्ञान होऊनी, व्हावाच मोक्ष. ॥ ३४४ ॥ त्यागी ऐसा, बोले कमलेक्षण, । तें त्यागाचें द्विविधही लक्षण । समजला बरविया प्रकारें श्रोता विचक्षण । क्षणक्षण आइकोनी वदनें देवाच्या. ॥ ३४५ ॥ कीं समूळ काम्यकर्मत्याग, । आणि नित्यकर्माचा जो फलभाग । ईश्वरीं अर्पितां कर्मयोग । त्याग त्याचा होतसे. ॥ ३४६ ॥ तृतीयाध्यायापासूनी । त्याग ऐसा म्हणोनी । अर्जुन ऐके, आणि मनीं । 'मी ऐसें करीन' म्हणतसे. ॥ ३४७ ॥ त्याच्या आशयाकडे । देव पाहे, तों देवास[1] नावडे, । तो अहंकार घेऊनी कडे, । म्हणतो, 'मी करीन, मी अर्पीन.' ॥ ३४८ ॥ निज

---

१. बगलेस मारून.

हृदयीं सर्पिणी अहंता, । म्हणतो, 'तिच्या पिल्यांचा होईन हंता.' । तें देखोनी साक्षी कंसहंता । म्हणे, आत्मा अकर्ता हें, यास नाहीं ठसावलें. ॥ ३४९ ॥ 'मी करीन' म्हणतो, । तेव्हां आत्माच कर्ता मानितो, । राहुयुक्त चंद्रमा दिसतो, । परी न कळे प्रकाशहीन तो राहू. ॥ ३५० ॥ आत्मप्रकाशें 'मी कर्ता' । म्हणतो, तेव्हां कर्ता वाटला, जो अकर्ता; । हे अहंकाराची समूळ वार्त्ता । आत्मयाकडे हा लावितो. ॥ ३५१ ॥ दोरास देखोनी सर्प म्हणतो, । तो दोर सर्पची म्हणूनी जाणतो, । तैसा आत्मा कर्ता म्हणूनी मानितो, । तरीं विशद अकर्त्रात्मत्व यास सांगावें. ॥ ३५२ ॥ मागें अकर्तेपण । वारंवार बोलिलों आपण, । परी पूर्वसंस्कारें ती खूण । नाहीं बाणली यास, देव म्हणे. ॥ ३५३ ॥ कर्ता सर्वही प्रकृतिभाग, । आणि आत्मा अकर्ता, ऐसा विभाग । सैंगट बोलिलों, परी संस्कारत्याग । अद्यापि नव्हे. ॥ ३५४ ॥ तरी याच प्रकृतिभागातें । पांचां भेदंकरूनी यातें । सांगोनी, अकर्त्या आत्मयातें । हा समजे, ऐसें बोलों, म्हणे देव. ॥ ३५५ ॥ म्हणूनी याउपरी । येविषयीं श्लोक चारी । बोलतो सकळ संशयहारी । त्यांत पांच भेद आईक म्हणतो या श्लोकीं. ॥ ३५६ ॥

**पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**
**सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥**

अगा! कर्ता प्रकृतिभाग, । पांच त्याचे विभाग । जाण मजपासूनी, कीं त्याग । तुझ्या कर्तृत्वसंस्काराचा होय, भाव ऐसा. ॥ ३५७ ॥ प्रकृतीचा विचार । सांख्यशास्त्रीं विशद निर्धार, । तेथेंही हेच पांच प्रकृतीचे प्रकार । कर्मसिद्धीकारणें बोलिले. ॥ ३५८ ॥ आणि कृतकर्माचा अंत । ज्या शास्त्रीं तें म्हणावें कृतांत, । ज्यास म्हणती वेदांत, । अंत–निर्णय–वेदांचा ज्या शास्त्रीं. ॥ ३५९ ॥ कृतकर्माचें कर्मपण । तोंच, जों नेणे आपणातें आपण, । अकर्ता आत्मा कळतांची, संचितक्रियमाण । जळे ज्ञानाग्नीकरूनी. ॥ ३६० ॥ कृतकर्माचा अंत । ऐसा तें कृतांत, । ज्याचें नांव वेदांत । आत्मज्ञान श्रवणें जयाचे. ॥ ३६१ ॥ तेथेंही आत्मा अकर्ता । कळावया, प्रकृतिभाग कर्ता, । बोलतां, पंचविध वार्ता । बोलिली हेची त्या शास्त्रीं. ॥ ३६२ ॥ सर्वा कर्मांच्या सिद्धीकारणें । हींची पांच कारणें । बोलिलीं, म्हणोनी बोलिलें नारायणें, । तरी तीं कोणतीं? सांगतो या श्लोकीं. ॥ ३६३ ॥

१. घातकर्ता. २. एकसारखें.

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधा च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥ १४ ॥**

अधिष्ठान एक, कर्ता एक, । करण पृथग्विध एकच, परी अनेक । विविधाच पृथक्चेष्टा, आणि दैव, यांचा विवेक । पांचांचाही ये रीती. ॥ ३६४ ॥ **अधिष्ठान**शब्दें शरीर । कीं शरीरची चरण, कर, । मस्तक, मान, ऊर, उदर, । शरीरनी अवघें. ॥ ३६५ ॥ तेव्हां लटिके करचरणादि अवयव, । रज्जूंत सर्पासी जैसा नाहीं ठाव, । रज्जूच आहे, तैसा देहभाव । कर-चरणादि सर्व मिथ्या. ॥ ३६६ ॥ एवं अवयव अवघे विवर्त, । देह अधिष्ठान, ऐसें कळावें वृत्त, । **अधिष्ठान**शब्द यानिमित्त । योजिला येथें. ॥ ३६७ ॥ कीं इंद्रियें पांचांत लेखिलीं, । तों नेत्रकर्णकरचरणादिगोलकें लेखिलीं, । शरीर म्हणतां तींही आलीं, । अधिष्ठान म्हणतां विवर्तही. ॥ ३६८ ॥ अधिष्ठान भूतपंचक असे, । शरीर नाहीं, परी दिसे, । अवयव अवघे दिसती तैसे । परी असे एकची देह. ॥ ३६९ ॥ देहच अवघे अवयव, । तेव्हां अवयवां न उरे ठाव, । शब्दांत ऐसा दाऊनी भाव, । अधिष्ठान म्हणे देहातें. ॥ ३७० ॥ भासक विवर्ताचें अधिष्ठान, । अधिष्ठान म्हणतां सुचवी हें ज्ञान, । तेव्हां करचरणकर्णनयन । विवर्त या अधिष्ठानाचा. ॥ ३७१ ॥ इंद्रियें लिंगदेहीं, । त्यांचीं गोलकें हीं स्थूलदेहीं, । गोलकावांचूनी शक्ति नाहीं । विषयग्रहणकर्मी इंद्रियां. ॥ ३७२ ॥ येथें म्हणतां अधिष्ठान । गोलकां विवर्ताचें सुचविलें ज्ञान, । गोलकावांचूनी इंद्रियें वृथा, तरी समाधान । या शंकेचें ये रीती. ॥ ३७३ ॥ पांचात एकाची हे वार्ता, । दुसरें कारण म्हणे **कर्ता**, । तो कर्ता अहंकारच तत्त्वता, । कीं मी करितों, मी करीन, म्यां केलें, ये रीती. ॥ ३७४ ॥ आतां अहंकार अचेतन, । म्हणूनी 'कर्ता जीवात्मा,' ऐसेंही जन । कोणी करिती व्याख्यान, । कोणी 'चिज्जडग्रंथि अहंकार' बोलती. ॥ ३७५ ॥ परी चित्स्वरूप परमात्मा जैसा, । चिदंश त्याचा त्यासारिखाच तैसा, । तोही चित्प्रकाश मात्र कैसा । कर्ता म्हणवेल? ॥ ३७६ ॥ मीपणीं तोची स्फुरे, । जैसें मीपणावेगळें निर्धर्म उरे, । मी कर्ता ऐसें स्मरे । बुद्ध्यहंकारयोगेंकरूनी. ॥ ३७७ ॥ बुद्ध्यहंताही अचेतन, । परी चिदंश धरितां म्हणावी सचेतन, । परी 'चैतन्य कर्ता' हें वचन । अनुभवविरुद्ध सर्वथा. ॥३७८॥ वृत्तीसची कर्तेपण, । तें चैतन्यास न घडे वृत्तीविण, । प्रतिबिंबत्वीं ही खूण । निर्धर्मतेची. ॥ ३७९ ॥ जरी उपाधीवांचुनी । 'मी कर्ता' म्हणोनी । चिदंशातें स्फुरे, तरी त्यावरूनी । कर्त्ता म्हणावा जीवात्मा. ॥ ३८० ॥ अहंकारावेगळें सत्त्व, ।

त्यास तों लागेना कर्तृत्व, । याही पलीकडे जीवतत्त्व, । कैसा म्हणावा तो कर्ता? ॥ ३८१ ॥ एवंच जीवात्मा कर्ता, । हे अनुभवविरुद्ध वार्ता, । अहंकारावेगळा अकर्ता । जीवात्माही निश्चित. ॥ ३८२ ॥ प्रतिबिंबातें 'चिदाभास' म्हणती, । त्याचा उपाधि तोच ज्या गुणाच्या वृत्ती, । तो वृत्तीवेगळा, तेंव्हां प्रवृत्ती । कर्तेपणाची कैंची तयातें ! ॥ ३८३ ॥ डळमळी जैसें जळ, । होय सूर्यप्रतिबिंब तैसें चंचळ, । त्या जळीं जो प्रकाश केवळ, । तो तों अक्रिय उदकावांचुनी. ॥ ३८४ ॥ तैसा 'मी कर्ता' म्हणे अहंकार, । चिदंश दुःखी सुखी तदनुसार, । तो कर्ता नव्हे, भोक्ताच, ऐसें वारंवार । याच गीतेंत सिद्ध जालें. ॥ ३८५ ॥ कार्य कारणकर्तृत्वीं प्रकृती, । आणि पुरुष भोक्ता ये रीती, । स्पष्ट दोन्ही भाग श्रीपती । त्रयोदशीं[1] बोलिला या श्लोकीं. ॥३८६॥

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥**

टीका याची विशद । पूर्वींच जाली प्रतिपद, । प्रस्तुत उपयोगी बोलिला या श्लोकीं मुकुंद । कर्तृत्व प्रकृतीचें, भोक्तृत्व पुरुषाचें. ॥ ३८७ ॥ ऐसा दोहीं भागांचा । निवाडा बोलिला भगवत साचा, । येथें कर्ता पुरुष हे विरुद्ध वाचा । सर्वज्ञची बोलेल हें न घडे. ॥ ३८८ ॥ आतां परा[2] प्रकृती । जीव जाली, ऐसें जगत्पती । सप्तमीं बोलिला, तोच तरी श्रीपती । पंचदशीं म्हणे "[3]ममैवांशो जीवलोके". ॥ ३८९ ॥ प्रकृतियोगें जीवत्व । अंशास ऐसें तत्त्व, । परी तेही पराप्रकृति शुद्धसत्व । कीं मन, बुद्धि, अहंकार, अपरा अष्टधा. ॥ ३९० ॥ भेद अपरेचा अहंकार, । परा दुसरी ते शुद्धसत्त्व, हा निर्धार, । तें सत्त्व होतां निरहंकार, । ज्ञानी अकर्ता बोलावा. ॥ ३९१ ॥ जेंव्हां सत्त्वास अकर्तेपण, । तेंव्हां कर्ता चिदंश कैसा आपण? । सर्वथा प्रमाणविरुद्ध, अनुभवविरुद्ध, हे खूण; । कर्ता नव्हे जीवात्मा. ॥ ३९२ ॥ एवंच कर्ता अहंकार, । हेंची सिद्ध होतें वारंवार, । ऐसे पांचांत दोनी प्रकार । अधिष्ठान आणि कर्ता. ॥ ३९३ ॥ आतां तिसरें कर्तृत्व कारण, । ऐसें सांगे नारायण, । कीं 'पृथग्विध करण' । म्हणजे इंद्रियें वेगळालीं. ॥ ३९४ ॥ ऐसीं कर्मसिद्धीचीं कारणें तिन्ही, । चौथें 'विविधा पृथक्चेष्टा' म्हणोनी । प्राणापानादि क्रियाशक्तीवांचुनी । कर्म न घडे. ॥ ३९५ ॥ पांचवें कारण दैव, । म्हणूनी म्हणे देव, । कीं देवता अभिमानी, त्यावीण स्वयमेव । इंद्रियें

---

१. अ० १३, श्लो० २०.　२. अ० ७, श्लो० ४-५.　३. अ० १५, श्लो० ७.

न शकती कर्म करूं. ॥ ३९६ ॥ ऐसीं पांच कारणें । कर्मसिद्धीचीं बोलिलीं नारायणें, । कर्म कांहींच न घडे त्याविणें, । ऐसें बोलतो या श्लोकीं. ॥३९७॥

शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।
न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥

जें कर्म आरंभिजेतें नरें, । मनें, वाचेनें, शरीरें, । तें न्यायसिद्ध बरें । अथवा अन्यायरूप वाईट. ॥ ३९८ ॥ हीं पांचही निमित्तें तया । बोलिलीं अगा! धनंजया! । ऐसें असोनी आत्मयास लाविती क्रिया, । ते मूर्ख, ऐसें बोलतो या श्लोकीं. ॥ ३९९ ॥

तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।
पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥

ऐशा पांचां कारणेंकरूनी । कर्म होत असोनी, । केवळ आत्मयातेंच कर्ता म्हणोनी । जो पाहतो, ॥ ४०० ॥ तो पाहताचि नाहीं, म्हणावा, । कीं खरें न देखे, तो आंधळा गणावा; । कां ऐसें पाहतो? म्हणसी, तरी जाणावा । तो अकृतबुद्धी. ॥४०१॥ कीं म्हणे नाहींच केली बुद्धी, । म्हणजे बुद्धीची नाहीं केली शुद्धी, । आत्मा अकर्ता या ज्ञानाची सिद्धी । नव्हे अशुद्ध बुद्धीकरूनी. ॥ ४०२ ॥ अशुद्धबुद्धि, यास्तव । न कळे आत्मा अकर्ता वास्तव, । तो दुर्बुद्धि म्हणावा, ऐसें देव । निंदी तयातें. ॥ ४०३ ॥ कीं बंधास कारण बुद्धी, । आणि बुद्धीच करी मोक्षसिद्धी; । कर्मरूप बंध, आणि मुक्ति सुखसमृद्धी । कर्मातीत. ॥ ४०४ ॥ ज्ञानाचें मुख्य फळ । आत्मयाचें अकर्तेपण केवळ, । तें आयतेंच परी ज्ञानमूळ, । तें अकर्तृत्व आत्मयाचें कळावें. ॥४०५॥ दीप जैसा प्रकाशी दृष्टी, । आणि दीपची प्रकाशी घटादि सृष्टी, । तैसा आत्मा न कळोनी कष्टी । कर्तृत्वाभिमानें बुद्धि होतसे. ॥ ४०६ ॥ बुद्धीचे शिरीं निश्चय । म्हणूनी तेची अविद्या विद्यामय, । ते भगवत्प्रसादें निर्णय । शुद्ध होऊनी जाणते अकर्तेपणाचा. ॥ ४०७ ॥ जरी आत्मा स्वयें । स्वरूपें असतां इंद्रियें, । तरी तोची करितो म्हणावा निश्चयें । दर्शन, श्रवण, अवघ्राणादि. ॥ ४०८ ॥ आत्मा मनापरता नसता, । स्वयेंच मन असता नुसता, । तरी संकल्प विकल्प करितां दिसतां, । आणि 'मी' म्हणता, जरी स्वयें असता तो अहंकार. ॥ ४०९ ॥ इत्यादि प्रकृतिविकार । तो प्रकाशूनीही निर्विकार, । त्यास कर्तृत्वाचा प्रकार । देखे अशुद्ध ते बुद्धी. ॥ ४१० ॥ ज्याची बुद्धि ये रीती, । तो म्हणावा दुर्मती; । एवं तोची जाणावा सुमती, । ज्याची

बुद्धि आत्मा अकर्ता देखते. ॥ ४११ ॥ ऐसें बोलिला सर्वेश्वर, । परी या पांचांमध्यें जो अहंकार, । तो अकर्त्या आत्मयातें विकार । कर्तेपणाचा दावितो. ॥ ४१२ ॥ आत्मप्रकाशेंच अहंकार, । 'मी कर्ता' म्हणूनी, दाखवी विकार; । तेव्हां राहुरूप राहुग्रस्त सुधाकर, । तैसा अकर्ताही कर्ताच वाटतो. ॥ ४१३ ॥ जरी न धरी मीपण, । तरी न घडेच कर्मस्फुरण; । साहंकार होतां अंतःकरण, । आत्माच कर्ता वाटतो. ॥ ४१४ ॥ 'मी मारीन,' म्हणोनी । जो न प्रवर्ते मीपणातें धरूनी, । तोंवरी अधिष्ठानादि चहूंकरूनी । युद्धची न घडे. ॥ ४१५ ॥ 'यातें मारीन मी,' ये रीती । अहंकार धरी, तेव्हां शरीरादि प्रवर्तती, । मीपणावांचूनी इंद्रियवृत्ती । कैशा करितील युद्धातें? ॥ ४१६ ॥ 'मारीन मी' म्हणेन ज्यातें, । नेत्र लक्षितील त्यातें, । बाण योजूनी गांडीवातें । हाणेन मी, तरी तो मारील. ॥ ४१७ ॥ जरी सांडीन मीपण, । तरी आत्मा अकर्ता आपण, । यास मग मारणार कवण? । ऐसें म्हणतां, युद्धची राहिलें. ॥ ४१८ ॥ युद्ध राहतां भगवंत । 'करीं' म्हणूनी यत्नपूर्वक अत्यंत । म्हणतो, जो स्वयें हा अनंत । अकर्त्रात्मत्व मज सांगतो. ॥ ४१९ ॥ युद्ध करणार कवण? । जरी अहंकार न धरी आपण, । आणि जरी धरूं मीपण । तरी स्वजनहंता मी होतसें. ॥ ४२० ॥ जरी हा नव्हे अधर्म, । क्षत्रियां निंद्य नव्हे हें कर्म; । तरी अहंकारें मी माझा स्वधर्म । मानावा, ऐसेंची होतसे सिद्ध. ॥ ४२१ ॥ जरी आत्मा रज्जु आणि सर्पिणी अहंता, । तरी मीपणावीण तों मी नव्हे यांचा हंता; । हंता नव्हे तरी, हाच नरकहंता । 'मारीं' म्हणतो. ॥ ४२२ ॥ ऐसा आंदोलायमान[1] । जाला, होतां अकर्त्रात्मज्ञान; । कीं, ज्या गोष्टीनें समाधान, । तें मर्म नाहीं ऐकिलें. ॥ ४२३ ॥ कीं मिथ्यात्वें मृगजळास । पाहेल, तें तेव्हां तयास । दिसत असोनीही दृष्टीस, । तयास बुडवूं शकेना. ॥ ४२४ ॥ हें वर्म न कळोनी म्याला, । अहंकार बाधक वाटला, । संदेह मनीं दाटला । अर्जुनाच्या. ॥ ४२५ ॥ हा अर्जुनाचा समजोनी भाव, । मंदहास्य करूनी देवाधिदेव । तो प्रश्न करितो स्वयमेव, । समाधान स्वदृष्टांतें करितसे या श्लोकीं. ॥ ४२६ ॥

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**
**हत्वापि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते ॥ १७ ॥**

अगा! ज्यास नाहीं अहंकाराचा भाव, । कीं, कळला त्याचा अभाव; ।

---

१. झोके खाणारा, संशयानें ज्याचें अंतःकरण डळमळत आहे असा.

आत्मा आपण कर्ता, हा स्वभाव । नाहीं जया. ॥ ४२७ ॥ आणि द्वंद्वस्पर्शे कांहीं । ज्याची बुद्धि लिप्त होत नाहीं, । तो मारूनी लोकां[१] सकळांही, । मारीतची नाहीं आणि बद्ध होत नसे. ॥ ४२८ ॥ श्लोकाचा इतकाच अर्थ, । परी विशद समजला भगवत्सन्निधीकरूनी पार्थ, । तैसाच विशद होतां, यथार्थ । समजेल अर्थ याचा श्रोतयांतें. ॥ ४२९ ॥ देव म्हणे, अर्जुना! । कांहींच या अहंप्रत्ययाविना । न घडे, किंबहुना । मी अकर्त्रात्मत्वें वर्तेन म्हणतसे. ॥४३०॥ आत्मा अकर्ता मजला । बरवे रीतीनें समजला, । ऐसा अक्रिय भाव उमजला, । म्हणूनी प्रत्यय वाटे तोही अहंकार. ॥ ४३१ ॥ तेथेंही न सुटे अहंप्रत्यय, । कीं, कर्ममूळ[१] ऐसा बुद्धीचा निश्चय, । परी आत्मा कळतां अक्रिय, । अभाव जाला मीपणाचा. ॥ ४३२ ॥ कळला मिथ्या अलंकार, । तरी त्याचा दिसतो आकार; । अक्रिय आत्मा उमजला, मगही अहंकार । एतद्रूप स्फुरतसे. ॥ ४३३ ॥ तथापि नाहींच अलंकार, । तैसा नाहीं अहंकार, । अभाव एतत्प्रकार । अहंकाराचा. ॥ ४३४ ॥ आत्मा अकर्ता न कळे जोंपर्यंत, । भाव म्हणजे सद्भाव तोंपर्यंत, । अहंकार त्यासच म्हणावा अत्यंत, । कीं, मीपण स्फुरणची आत्मा मानिला. ॥ ४३५ ॥ सुवर्णाचें केलें केळ, । तें पिंवळे पिकलें वाटे कदलीफळ; । हेम न कळे, तोवरी त्याचा सद्भाव केवळ । तो भाव म्हणावा कदलीफळाचा. ॥ ४३६ ॥ जे नाहींसे कळलें, तो त्याचा अभाव; । जें आहेसें वाटलें, तोच त्याचा सद्भाव; । सद्भावाचेंची नांव भाव; । भाव अभाव तैसे अहंकाराचे. ॥ ४३७ ॥ केळ नाहीं, आहे हेम; । तैसा अहंकार लटिका, सबाह्य अवघें ब्रह्म; । चित्स्वरूपची स्फुरतें परम, । अहंकार नाहीं. ॥ ४३८ ॥ ऐसें कळलें, परी । 'मी करीन' अथवा 'न करीन ऐसें जोंवरी । नव्हे बुद्धिवृत्तीचें स्फुरण, तोंवरी । अत्यंत स्वहित तेंही घडेना. ॥ ४३९ ॥ कीं मी स्वरूपप्रत्ययाविना । कांहींच जडपदार्थ पाहेना, । ऐशासही संकल्प नाहीं मना, । न घडे विना अहंप्रत्यय. ॥ ४४० ॥ या अनुभवेंकरूनी । म्हणतो 'असेन मी' म्हणोनी; । या प्रत्ययतरंगासही चित्सिंधूवांचुनी । वेगळें न पाहें; 'मी मी' म्हणूनी मागुती मी म्हणतों. ॥ ४४१ ॥ इतका जरी गेला सखोल, । तरी मीपणावांचूनी न स्फुरे बोल, । तथापि आत्मा उपादान त्याचा कळतांच, फोल । अहंकार जाला. ॥ ४४२॥ अनुभवाचा निश्चय, । तेथें न सोडी अहंप्रत्यय; । प्रवृत्ति अथवा निवृत्ति भक्ता[२] निर्णय । अहंप्रत्ययाविना घडेना. ॥४४३॥ तेथें स्वधर्मपरिपालन । युद्ध कैसें घडे अहंप्रत्ययाविण ? ।

---

१. कर्म ज्याच्या मूळाशीं आहे असा. २. कोणताही एक.

परी कळलें अहंकाराचें मिथ्यापण, । आणि स्वअक्रियत्व तो अभाव त्याचा. ॥४४४॥ यालागीं अहंकाराचा भाव, । म्हणजे तो आहे ऐसा सद्भाव । ज्यास नाहीं, ऐसा कळतां अभाव, । तो हे लोक सर्वेही मारी, तरी मारीत नसे. ॥ ४४५ ॥ मारूनियां तिहीं लोकांही, । मारीत नसेच तो कांहीं, । म्हणूनी बद्धही होत नाहीं, । कीं, करी, तोच बद्ध होय. ॥ ४४६ ॥ अर्थ ऐसा सिद्ध जाला, । कीं अहंकाराचा अभाव् जेव्हां कळला, । तेव्हां कर्मी जरी प्रवर्तला, । तरी तो कांहीं करीत नाहीं. ॥ ४४७ ॥ परंतु जरी बुद्धी । लिप्त नव्हे, तरी अक्रियत्वसिद्धी, । कीं, बुद्धि लिप्त होतां, प्रसिद्धी । अहंकाराची पुन्हा दिसतसे. ॥ ४४८ ॥ तें वर्म बुद्धीस कळे तरी, । कीं बुद्धि द्वंद्वातीत होय जरी, । जयापजय समत्व जोंवरी, । तोंचवरी मारूनीही निरहंकारी नसे मारीत. ॥४४९॥ होऊनी अक्रिय आत्मयाचें ज्ञान, । न करी ज्ञानपरिपाकार्थ ध्यान, । स्वरूपसुखें न उपजे समाधान, । पूर्वसंस्कारें इच्छी जय, मान, लाभही. ॥ ४५० ॥ जय व्हावा म्हणूनी मारी, । आणि अक्रियत्व आपुलें विचारी, । बुद्धि लिप्त होतां, निरहंकारी । मग तो न म्हणावे. ॥ ४५१ ॥ वर्म निरहंकाराचें कळलें, । आणि चित्त त्या सुखींच नाहीं वळलें, । द्वद्वलिप्त होतां खवळलें । मीपण तयाचें निश्चित. ॥ ४५२ ॥ अक्रिय आत्मा पाहे, । अहकाराच्या भावावेगळा होऊनी राहे, । आणि बुद्धि जरी क्रियाफळ अपेक्षीत आहे, । तो अहंकारीच जाणावा. ॥ ४५३ ॥ त्रैलोक्यातेंही मारी, । तरी तो मारीत नाहींच निरहंकारी, । हें त्यास साजे, कीं, जयापजयविकारीं । बुद्धि ज्याची लिप्त नव्हे. ॥ ४५४ ॥ **"बुद्धिर्यस्य न लिप्यते"** । हे या भावें **भगवद्वाणी** बोलते. । द्वितीयाध्यायापासूनी उपदेशिते । ऐसी वाणी **चक्रपाणीची.** ॥ ४५५ ॥

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ॥**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥**

टीका याची प्रतिपद । मार्गे जालीच विशद; । सुखदुःख लाभालाभ, जयापजय, म्हणे **गोविंद** । सम करूनी, युद्ध करीं. ॥ ४५६ ॥ ऐसें समत्वें युद्ध करिसी, । तरी पाप तूं, म्हणे, न पावसी; । पापाची प्राप्ति ते ऐसी, । कीं, पापीं अहंकार टाकिला तो प्रगटतो. ॥ ४५७ ॥ म्हणोनी जो निरहंकारी, । आणि बुद्धि लिप्त नव्हे यापरी, । तो जरी या लोकां समस्तांतें मारी, ।

---

१. सुखदुःख, हर्षामर्ष, शीतोष्ण इत्यादि जोड्यांच्या टप्यापलीकडील. २. अ० २, श्लो० ३८.

तरी मारीत नाहीं आणि नसे बद्ध होत. ॥ ४५८ ॥ आतां लोकांतें मारी, । तरी बद्ध नव्हे तो, म्हणे मुरारी, । तरी जो निरहंकारी, । तो कोणास मारील हें अघटित. ॥ ४५९ ॥ अर्थ याचा अबाधित । ऐसा कीं स्वदृष्टांत येथें बोले भगवंत । ये रीती. ॥ ४६० ॥ कीं नित्यमुक्त ईश्वर, । आणि करी सृष्टि, स्थिति, संहार; । तथापि त्यास नाहीं अहंकार, । आणि संकल्प तो सर्व करी. ॥ ४६१ ॥ त्यांत शंका अर्जुनाचे मनीं, । कीं भीष्मादिकांच्या वधें-करूनी । आपण अहंकारी होतों, यावरूनी । स्वदृष्टांतें समाधान करीतसे. ॥ ४६२ ॥ कीं जो प्रलयसंकल्प करी, । तो मीच आपण सृष्टि सारी[1]। संहारितों, तरी निरहंकारी । मारीत नसें, बद्धही होत नसें. ॥ ४६३ ॥ कीं अक्रिय निर्गुण, । तेंची आपण ऐसें अखंड स्फुरण, । आणि सृष्टिस्थिति करूनी, दारुण । लोकसंहारही करीतसें. ॥ ४६४ ॥ तथापि स्वस्वरूपाकडे पाहतों, । आणि अखंड अक्रियपणें राहतों, । तो मी काय लाहतों । लोकसंहारकर्तृत्व ? ॥ ४६५ ॥ आणि मजविण । संहारकर्ता कवण ? । तथापि सर्वदा अक्रियत्वस्फुरण, । म्हणूनी कोणासही नसें मारीत मी. ॥ ४६६ ॥ तथापि सगुणपणीं संकल्प । आणि घडामोडीचे विकल्प । पाहतां नसती अल्प, । तथापि भाव त्याचा मज नसे. ॥ ४६७ ॥ समुद्रास अवघे तरंग । वाटती जळची आपुलें अंग, । तथापि आकार जो तरंगबहिरंग । अभाव वाटे तयाचा. ॥ ४६८ ॥ आणि हीं कर्मे करावीं, । जीं केलीं तीं घडोन यावीं, । विफळ माझीं कर्मे न व्हावीं, । ऐसी चिच्छक्ति माझी लिप्त नव्हे. ॥ ४६९ ॥ यालागीं ईश्वर जो यापरी । प्रलयकाळीं या लोकांतें मारी, । जो 'संहार करीन' ऐसा संकल्पही करी, । तरी तो कोणासही मारीत नसे. ॥ ४७० ॥ कीं जें 'मी करीन' म्हणतो, । त्या असल्याचा अभावची जाणतो, । ज्याला त्याचा भावची नाहींसा वाटतो, । तो काय तेव्हां करितो म्हणावा ? ॥ ४७१ ॥ या भावें म्हणे देव, । कीं, या लोकांतें मारितो देवाधिदेव, । त्याला अहंकाराचा नसे सद्भाव, । आणि बुद्धि चिच्छक्ति लिप्त नव्हे तयाची. ॥ ४७२ ॥ तो या लोकांतें मारूनीही, कांहीं । अगा ! अर्जुना ! मारीत नाहीं, । आणि त्या कर्मे बद्धताही । होत नाहीं तयातें. ॥ ४७३ ॥ ऐसें या भीष्मादिकां । मारितां तुज काय शंका ? । निरहंकारिया निष्कलंका । मारणें कैंचें ? बंध कैंचा ? ॥ ४७४ ॥ आतां अहंकारावांचुनी । यास मारणें न घडे, म्हणोनी । हेही शंका मानूनी ।

---

१. विश्वाची उत्पत्ति व पोषण.

सशंक तूं. ॥ ४७५ ॥ तरी अहंकाराचा दिसे अभाव, । पाहतां अक्रिय आत्मयाचा सद्भाव; । जैळदृष्टी नुरे तरंगांचा भाव, । ठाव कैंचा अहंकारा ! ॥ ४७६ ॥ तो बुद्धीचा निश्चय । निरेंहंकारियास वाटे अहंमय, । कीं 'अमुकें करीन' म्हणूनी जों न वाटे प्रत्यय, । तो अक्रियत्वें संकल्पही घडेना. ॥ ४७७ ॥ आतां, 'अक्रियत्वेंकरूनी । मी कर्ता नव्हे म्हणोनी । वर्तेन,' हाही संकल्प मनीं । अहंप्रत्ययरूपची वाटतो. ॥ ४७८ ॥ परंतु तो प्रत्यय जैसा अलंकार, । त्यांत अक्रिय स्फुरे तें हेम निर्विकार, । अनुभव जयाचा एतत्प्रकार, । भाव त्याला न वाटे अहंप्रत्ययाचा. ॥ ४७९ ॥ आणि अक्रियरूपाचा अनुभवी आनंद, । तेव्हां जयापजयादि द्वंद्ववृंद । कां स्मरेल ! कीं क्षुद्रानंदाचा कंद । स्वयें जाला प्रतीतीनेंच आपल्या. ॥ ४८० ॥ ऐसी अनुभवाची समृद्धी, । त्या मग कां द्वंद्वेंकरूनी लिप्त होईल बुद्धी ? । त्यापासूनी जे जे घडेल कर्मसिद्धी, । घडलीच नाहीं म्हणावी ते. ॥ ४८१ ॥ एवंच कर्मी घडोनीही प्रवृत्ती, । अधिष्ठानदृष्टीकरूनी कर्तृत्वाची निवृत्ती । घडे कीं, अभावातें पावल्या सर्व वृत्ती, । त्यांत अहंप्रत्ययवृत्ति एक हे. ॥ ४८२ ॥ आणि ईश्वरदृष्टांतेंकरूनी । जो निरहंकारी, तो या लोकांतें मारुनी, । नाहींच मारीत, म्हणोनी । साध्य हा अर्थ. ॥ ४८३ ॥ अन्यथा जो निरहंकारी, । तो किमर्थ या लोकांतें मारी ? । तो मारील हें सिद्ध होय जरी, । तरी लागेल हा अर्थ. ॥ ४८४ ॥ आणि ईश्वर विश्व संहारी, । तेंही विना संकल्प न घडे, परी । अहंप्रत्ययाचा भाव निर्विकारी । न धरी, जाणे अभाव वृत्तीचा. ॥ ४८५ ॥ यावीण इतर अर्थ । येथें होती व्यर्थ, । कीं, 'मी मारीन' ऐसें जो न म्हणे पार्थ, । तो कैसा मारील कौरवांतें ? ॥ ४८६ ॥ अहंकारेंकरूनी । 'मी मारीन' म्हणोनी, । जो मारणार, तो मनीं धरूनी, । मग मारील कोणाएकातें. ॥४८७॥ यालागीं ईश्वरदृष्टांताविण । निरहंकारी मारील कैसा कवण ? । ईश्वरदृष्टांतभावेंच श्रवण । पार्थें केलें, तेव्हां समाधान पावला. ॥ ४८८ ॥ ऐसा मुख्य अर्थ । अबाधित आणि जो समर्थ, । तो अर्थ सिद्ध होतां, व्यर्थ । कां इतर अर्थ अंगीकारावे ? ॥ ४८९ ॥ एवं ईश्वर संकल्पपूर्वक । कर्में करितो सृष्टिसंहारादिक, । आणि अहंकाराचा अभाव तो उत्तमश्लोक । देखतो जैसा;

---

१. जळाच्या दृष्टीनें, तरंग हा पाण्याचाच एक विकार आहे या दृष्टीनें. २. 'निरहंकारी यास' असा पाठ आढळतो.

॥ ४९० ॥ ऐसा, 'वर्णाश्रमोचित । स्वधर्म करीन मी वेदविहित । म्हणूनी, 'युद्ध करीं' हा संकल्प मायारचित । तरंग पाहें अक्रिय चित्स्वरूपसमुद्राचा. ॥ ४९१ ॥ तरंग होऊनीही नसे अत्यंत, । तैसा तूं अकर्ता करूनी निश्चित,। तुवां तो संकल्पही नाहींच केला जाणों म्हणे अच्युत । भाव ऐसा. ॥४९२॥ कीं देखसी ऐसा अहंकाराचा अभाव, । आत्मा कर्ता हा सुटेल स्वभाव, । तेव्हां तूं अकर्ता बद्ध नव्हसी, म्हणे देव, । भीष्मद्रोणादिकां मारूनीही. ॥ ४९३ ॥ परी जयची व्हावा, । अपजय माझा न घडावा, । ऐसी तुझी, पांडवा! । क्षणीं होऊं देसी बुद्धि लिप्त; ॥ ४९४ ॥ संकल्प युद्धाचा करूनीं, । मारिसी यांस शस्त्रें उचलुनी, । त्यांत अहंकाराचा अभाव मानूनी, । आणि जय अपजय सम मानसीं जेधवां; ॥ ४९५ ॥ स्वधर्म करावाच अगत्य, । भाव इतकाच चित्तीं सत्य, । तेव्हां यांस तूं मारूनी मारणें असत्य । होईल, अगा! अर्जुना! हा भाव. ॥ ४९६ ॥ या भावें हा श्लोक बोलिला उत्तम-श्लोक, । तो पूर्वानुसंधानें पार्थ पुण्यश्लोक । सापेक्ष देखोनी, उत्तर श्लोक । प्रवर्तवितो. ॥ ४९७ ॥ कर्मसिद्धीचीं कारणें । पांच सांगतां नारायणें । उप-देशिला, कीं, या पांचांविणें । कर्म कांहीं घडेना. ॥ ४९८ ॥ "**न्याय्यं वा विपरीतं वा**" । या वचनीं देव बोलिला, कीं, पांडवा! । न्याय्य कर्म हो अथवा । तद्विपरीत हो अन्याय्य, ॥ ४९९ ॥ भलती कर्मसिद्धि तेधवां, । कीं पांच हेतु हे मिळती जेधवां, । ऐसें असोनी ज्या मानवां । आत्मा कर्ता वाटतो, ते मूर्ख. ॥ ५०० ॥ ऐसें देव बोलिला, । तेथें अर्जुन मनीं ऐसें मानिता जाला, । कीं, अहंकारें मी यांला । केवीं मारूं? ॥ ५०१ ॥ ऐसें मा-निलें, त्यावरूनी । "**यस्य नाहंकृतो भावो**" म्हणोनी । या श्लोकें अहंकार-मिथ्यात्वेंकरूनी, । समाधान केलें श्रीकृष्णें. ॥ ५०२ ॥ परंतु न्याय्यकर्म को-णतें म्हणावें? । कीं तद्विपरीत तें अन्याय्य मग गणावें, । म्हणूनी न्याय्यकर्माचें तत्त्व जाणावें, । ऐसें वाटलें अर्जुना. ॥ ५०३ ॥ तरी वेदोक्त कर्म । स्ववर्णाश्रमास उचित धर्म, । तें म्हणावें न्याय्य परम, । प्रमाणें ज्यास विधि-वाक्यें. ॥ ५०४ ॥ त्या कर्मसिद्धीचे प्रकार तीन, । याकारणें विधिही तीं प्रकारेंकरून । प्रवर्तले वेदीं, म्हणोन । न्याय्यकर्म सांगावया प्रवर्तला हा श्लोक. ॥ ५०५ ॥

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।**
**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥**

ज्ञान, ज्ञेय, ज्ञाता, । त्रिविध कर्माचे विधि अगा! पांडुसुता! । कीं करण, कर्म, कर्ता, । त्रिविध संग्रह कर्माचा. ॥ ५०६ ॥ या क्रमें वाखाणावे हे बोल । प्रतिपदीं अत्यंत खोल, । कीं, **ज्ञानज्ञेय**शब्दें डोल । देऊं नये येथें अनुभवाकडे. ॥ ५०७ ॥ हें नव्हे ज्ञानकांड, । या प्रकरणीं देव बोलतो कर्मकांड, । **ज्ञान**शब्दें साधनरीती ज्या उदंड । त्या येथें देव बोलतो. ॥ ५०८ ॥ ज्ञानकांडीं ज्ञेय आत्मत्व, । त्यास जाणे तें ज्ञान सत्त्व; । ज्ञाता तो, जो जाणतो तत्त्व, । येच रीतीं अर्थ कर्मकांडीं योजावा. ॥ ५०९ ॥ अश्वमेधादि याग प्रसिद्ध, । ते ज्ञेय, आणि ज्या साधनीं होती सिद्ध । तें ज्ञान, आणि यजमान जो फळें समृद्ध । होतो. तो परिज्ञाता जाणावा.॥५१०॥ त्यांत ज्ञान ऐसें, कीं, कुंड कैसें करावें ? । द्रव्य कोण होमावें ? । मंत्र कोण ? इत्यादि जें जाणावें, । तें ज्ञान म्हणजे साधन त्या कर्माचें. ॥ ५११ ॥ अग्नि-होत्रादि नांवें । हें अमुकें कर्म म्हणोनी जाणावें, । **ज्ञेय**शब्दें वाखाणावें । प्रधान कर्म. ॥ ५१२ ॥ जो तें **ज्ञेय**शब्दवाच्य प्रधान कर्म । करूं पाहतो, तोची जाणों इच्छितो साधनधर्म, । आणि जाणतो तें कर्म परम । तो परि-ज्ञाता जाणावा. ॥ ५१३ ॥ ऐसे त्रिविध कर्माचे विधि असती, । कीं साधनें विविध वेदची बोलती, । आणि त्या साधनीं साध्य कर्म वदती । आमुकें म्हणूनी तेच वेद. ॥ ५१४ ॥ त्यास अधिकारी कैसा कवण? । वेदची त्याची सांगती खूण, । त्याणेंची तें करूनी साधनाचें श्रवण, । जाणावीं साधनें तें ज्ञान. ॥ ५१५ ॥ ऐसीं साधनें तीं म्हणावीं ज्ञान, । त्या साधनीं जें ज्ञेय-कर्म प्रधान, । तें परिज्ञातयानें जाणाया योग्य, ऐसें व्याख्यान । त्रिप्रकारां विधींचें. ॥ ५१६ ॥ विधि त्रिविध ऐसे परी; । 'त्रिप्रकारची कां.' म्हणसी जरी, । तरी ऐक अर्जुना! म्हणूनी हरी । उत्तरार्ध या भावें बोलतो. ॥५१७॥

उत्तरार्ध—**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥**

अगा! करायाच्या रीती । ज्या साधनें म्हणूनी **ज्ञान**शब्दें बोलिलों तुज-प्रती, । त्यांस '**करण**'[1] म्हणूनी म्हणती, । कीं, ये रीती या साधनीं तें करणें. ॥ ५१८ ॥ आणि **ज्ञेय**शब्दें कर्म जें मुख्य प्रधान । बोलिलों, '**कर्म**' त्याचेंची अभिधान, । कीं, जें सिद्ध झालें करितां साधन, । तेंच कर्म बोलावें. ॥५१९॥ कीं साधनक्रिया । कर्मेची म्हणती तया, । परंतु कर्म म्हणूनी या नामधेया ।

---

१. 'कारण' असा पाठ आढळतो.

त्या साधनक्रिया न पावती. ॥ ५२० ॥ कीं कुंड सिद्ध केलें, । हविर्द्रव्यही आणिलें, । परी यथाविधि नाहीं जों होमिलें, । तोंवरी अग्निहोत्रकर्म घडलें, ऐसें न म्हणावें. ॥ ५२१ ॥ यालागीं अग्निहोत्राचें साधन, । त्याचें नांव पूर्वार्धीं ज्ञान, । कर्म त्याला न म्हणवे, म्हणूनी प्रधान । अग्निहोत्र जें ज्ञेय त्यातेंच कर्म बोलावें. ॥ ५२२ ॥ आणि जो परिज्ञाता । पूर्वार्धीं बोलिलों पांडुसुता ! । तोची साधन क्रियेंकरूनी कर्ता । प्रधान कर्माचा. ॥ ५२३ ॥ ऐसें करण, कर्म, आणि कर्ता, । त्रिविध सर्व कर्माचा संग्रह तत्त्वता, । या तींवेगळें पांडुसुता ! । काय उरलें कर्मकांड ? ॥ ५२४ ॥ म्हणूनी पूर्वार्धीं । तीनची बोलिलों कर्मविधी, । कीं कर्मसंग्रहाचा अवधी । सर्व याच तीं प्रकारांत. ॥५२५॥ ऐशा तिहीं विधींची एकवाक्यता । तें न्याय्यकर्म, अगा ! पांडुसुता ! । यास जें विलक्षणपण, ते विपरीतता । अन्याय्य म्हणावें तें कर्म. ॥ ५२६ ॥ विधि वेदोक्त सोडोनी, । कर्म करणें अविधीकरूनी, । आणि निषिद्धही तें अन्याय्य म्हणोनी । जाणावें तद्विपरीत. ॥ ५२७ ॥ परंतु अधिष्ठान आणि कर्ता । इत्यादि कर्मसिद्धीच्या पांच वार्ता । तुज बोलिलों पांडुसुता ! । त्यावांचुनी द्विविधही कर्म घडेना. ॥ ५२८ ॥ जें न्याय्य कर्म । यथोक्त वेदविहित धर्म, । अथवा निषिद्ध अविधिही अधर्म । त्यासही हे पांच कर्महेतू. ॥ ५२९ ॥ ऐसें असोनी, आत्मा कर्ता मानी । तो अकृतबुद्धि, म्हणोनी । जाण ये रीतीकरूनी । अनुसंधान पूर्वील. ॥ ५३० ॥ परंतु सापेक्ष धनंजय । कीं कैसें कर्म जाणावें न्याय्य ? । म्हणूनी सांगितलें कीं अन्याय्य । एतद्विपरीत जाणावें. ॥ ५३१ ॥ न्याय्य कर्म ऐसें श्रीपती । बोलतां सुचवी अन्याय्या रीती; । आतां प्रकारांतरें या दोनी जाती । सांगों पाहे. ॥ ५३२ ॥ या प्रसंगें ज्ञानाचे, । आणि कर्माचे, कर्तयाचे, । भेद सांगेन म्हणतो स्ववाचे । या श्लोकीं. ॥ ५३३ ॥

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥**

अगा ! ज्ञानाचेही तीनी, । आणि कर्माचेही तिहीं प्रकारेंकरूनी, । आणि कर्त्याचेही, म्हणोनी । सांख्यशास्त्रीं बोलिजेतें अर्जुना ! ॥ ५३४ ॥ गुणांची संख्या जेथें, । तें सांख्यशास्त्र, तेथें । जे या तिहींचे त्रिविध भेद बोलिले, तेही येथें । तूं आईक मजपासुनी. ॥ ५३५ ॥ ते यथावत्प्रकार । आईक, म्हणे सर्वेश्वर, । कीं न्याय्य तें न्यायानुसार, । अन्याय्य अन्यायानुरूप, अर्थ